# इतिहास

## आशय अध्यापन पद्धती शास्त्र


**लेखक**

**डॉ. अमोल मांडेकर**

**श्री. अरूण धकाते,** पीएच.डी. संशोधक

**श्री. पांडुरंग कोळवते,** पीएच.डी. संशोधक

**श्री. विनोद वाघमारे,** पीएच.डी. संशोधक





**प्रकाशक**

**कुलसचिव**

**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय**





**रामटेक – 441106**

**शीर्षक** – इतिहास आशय अध्यापन पद्धती शास्त्र

**लेखक** – डॉ. अमोल मांडेकर

सहायक प्राध्यापक, कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेकम

श्री. अरूण धकाते, पीएच.डी. संशोधक

श्री. पांडुरंग कोळवते, पीएच.डी. संशोधक

श्री. विनोद वाघमारे, पीएच.डी. संशोधक

**प्रकाशक** - कुलसचिव

कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय

रामटेक



**प्रकाशन वर्ष** – 2020

**आवृत्ती** – प्रथम

ISBN – 978–93–85710–62–9

**मूल्य** – 460.00

**मुद्रक** – अवधूत ग्राफिक्स ॲण्ड प्रिन्टींग,

रामदासपेठ, नागपूर. मो. 9112627944

# प्रस्तावना

आजच्या युगात ज्ञानाचा स्फोट नव्हे तर प्रस्फोट होत आहे. ज्ञान संपादन, प्राप्त करण्याच्या विविध साधनांपैकी एक साधन म्हणजे पुस्तके. पुस्तके ही मानवी जीवनात सुयोग्य मार्गदर्शक व मित्राची भूमिका वठवितात.

तंत्रज्ञानाच्या युगात दररोज अनेक घटना घडतात या घटना घडून गेलेल्या घटनांच्या भागात समाविष्ट होतात. त्यालाच इतिहास म्हणतात. इतिहास हा विषय म्हणून नव्हे तर व्यक्तींना जीवन जगण्याचे शास्त्र म्हणून महत्त्वपूर्ण ठरतो. मानवी जीवन जगण्याचे कौशल्ये इतिहासातून प्राप्त होते. भूतकालीन अनिष्ठ घटनांची पुनरावृत्ती घडू नये याबाबतचे ज्ञान इतिहासातून मिळते. मानवाला शांततामय जीवन जगण्याचे सामर्थ्य इतिहासातून प्राप्त होते. इतिहास म्हणजे युध्द, लढाया, सनावळयाच नाही तर पराक्रम, शौर्य, राष्ट्राभिमान, राष्ट्रभक्ती जागविण्याचे सामर्थ्यशाली साधन होय. इतिहास विद्यार्थ्यांमधून राष्ट्राला उपयुक्त व राष्ट्र घडविणारे सुसंस्कारी, राष्ट्रभक्तीने प्रेरीत असणारे, राष्ट्राभिमान बाळगणारे नागरीक घडविण्यासाठी उपयुक्त असणारे अमृत होय. अशा नानाविध बाबींद्वारे इतिहासाची महती सांगता येईल.

विद्यार्थ्यांमधून सुसंस्कारी पिढी घडविण्यासाठी इतिहासाच्या शिक्षकाची महत्त्वपूर्ण भूमिका ठरते. यादृष्टीने इतिहास अध्यापनाचे शास्त्र, पध्दती याबाबत शिक्षकास माहिती असणे गरजेचे आहे. बदलत्या काळानुसार इतिहास विषयाची व्याप्ती, स्वरुप, अध्यापन तंत्रे व पध्दती यामध्ये सुध्दा बदल झालेला आहे. हा बदल नवीन घटनांशी सांगड घालून विद्यार्थ्यांच्या दृष्टीने स्तरानिहाय, वयोगटानुसार अध्यापन पध्दती, यासोबत आधुनिकतेचा वापर या सर्व दृष्टीने चौकस वृत्ती इतिहासाच्या अध्यापकांत असणे आवश्यक ठरते. इतिहास विषयाच्या अध्यापनाच्या दृष्टीकोनातून

इतिहास शिक्षकास सर्व पध्दती, तंत्रे, शास्त्रीय दृष्टीकोन, साधने, आधार-पुरावे या सर्वांची माहिती व्हावी याकरीता **'इतिहास आशय-अध्यापन पध्दती शास्त्र'** पुस्तकाची रचना करण्याचे औचित्य ठरते. इतिहास शिक्षकांसोबत विद्यार्थी व इतिहास विषयाची आवड असणारे सर्व व्यक्तींना सदर पुस्तक आवडेल याबाबत निश्चित शंका नाही. सदर पुस्तक साध्या व सोप्या भाषेसह मुद्देसूदपणे इतिहास अध्यापनाबाबतच्या सर्व घटकांचे ज्ञान वृध्दिंगत करण्यास उपयुक्त ठरेल. याबाबत आशावाद बाळगण्यास हरकत नसावी.

डॉ. श्री. अमोल मांडेकर (सहाय्यक प्राध्यापक) त्यांचे शिष्य श्री. अरुण धकाते व श्री. पांडुरंग कोळवते यांनी अथक परिश्रमातून शास्त्रीय दृष्टीने व मुद्देसूदपणे सविस्तर चर्चात्मक मांडणी केलेले **इतिहास आशय-अध्यापन पध्दती शास्त्र** हे पुस्तक आपणासारख्या जाणत्या वाचकासमक्ष ठेवतांना अत्यानंद होतोय.

इतिहास विषयाच्या अध्ययन व अध्यापन करणाऱ्या सर्व शिक्षण क्षेत्रातील व्यक्तींना ज्ञानप्राप्तीसाठी सहजमार्ग होईल या अपेक्षेने सदर पुस्तकासाठी शुभेच्छा देणे क्रमप्राप्त ठरते.

**शुभेच्छुक**

**डॉ. ललिता चंद्रात्रे**

अधिष्ठाता,

शिक्षण शास्त्र विद्याशाखा

# मनोगत

**'इतिहास आशय-अध्यापन पध्दती शास्त्र'** हे पुस्तक प्रकाशित करतांना अत्यंत आनंद होत आहे. सदर पुस्तक महाराष्ट्रातील बी.एड., एम.एड., डी.टी.एड. छात्राध्यापक, छात्राध्यापिकांसह सदर विषय शिकविणारे प्राध्यापक वृंद या पुस्तकाचे सहर्ष स्वागत करतील हा आशावाद मनाला वाटतो. सर्व छात्राध्यापक, छात्राध्यापिका व प्राध्यापक यांना हे पुस्तक अत्यंत उपयुक्त ठरेल असा आशावाद ठेवण्यास हरकत नाही.

कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेकचे सन्माननीय कुलगुरु मा. डॉ. श्रीनिवास वरखेडी यांनी दिलेल्या प्रेरणेमुळे सदर पुस्तकाचे लेखन करण्याचे मानस केले. त्यांनी दिलेल्या प्रेरणेमुळेच हया पुस्तकाचे विस्तृत लेखन करता आले. त्याबाबत त्यांचे शतशः आभार. डॉ. ललिता चंद्रात्रे (अधिष्ठाता शिक्षण शास्त्र विद्याशाखा) व शिक्षण शास्त्र विभागातील सर्व सहकारी प्राध्यापक यांच्या विशेष सहकार्यामुळे सदर पुस्तकाचे लेखन पूर्ण करता आले. या करीता त्यांचे आभार व्यक्त करणे महत्त्वाचे ठरते.

कोणत्याही विषयावर पुस्तक लेखन करणे हा खूप मोठा प्रकल्प असतो. या पुस्तकाचे लेखन करतांना संपूर्ण प्रकरणांचे लेखन एका व्यक्तीने करण्यापेक्षा दोन-तीन व्यक्तींनी केल्यास प्रकरणांबाबत सविस्तर माहिती देता येईल. या आशावादाने माझे संशोधक विद्यार्थी श्री. अरुण धकाते व श्री. पांडुरंग कोळवते यांना काही प्रकरणांचे लेखन करण्याची जबाबदारी दिली. त्यांनी आनंदाने सदर प्रकरणांची जबाबदारी व्यवस्थित पार पाडली.

या पुस्तकाचे लेखन करतांना अनेक ग्रंथसंदर्भांचा आधार घ्यावा

लागला. त्या सर्व ग्रंथ संदर्भ लेखकांचे ऋण शब्दांत लेखन करता येणार

नाही. यासोबत माझी पत्नी सौ. किरण मांडेकर व मुलगा चि. अथर्व यांनी मला वेळोवेळी प्रोत्साहन देऊन पुस्तकाचे लेखन करण्यास प्रवृत्त केले. त्याबाबत यांचे आभार व्यक्त करणे क्रमप्राप्त ठरते. सदर पुस्तकाचे प्रकाशन कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेकच्या प्रकाशन विभागाने स्विकारल्यामुळे त्यांचे जेवढे आभार मानावे तेवढे कमीच आहेत.

पुस्तक लेखनात प्रत्यक्ष अप्रत्यक्ष सहकार्य केलेल्या माझे सर्व कुटूंबिय सदस्य, आप्त परिवार, मित्र मंडळी व विद्यापीठातील सर्व सहकारी मंडळी यांचे मी मन:पूर्वक आभार व्यक्त करतो.

**लेखक**

**डॉ. अमोल मांडेकर**

सहायक प्राध्यापक

शिक्षण शास्त्र विभाग

कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय,

रामटेक

# इतिहास आशय-अध्यापन पध्दती शास्त्र

## अनुक्रमणिका

# प्रकरण - १

# इतिहास-स्वरुप, अर्थ व महत्त्व

♦ **इतिहास :**

जगातील प्रत्येक बाबीला कोणती तरी पार्श्वभूमी असते. ही पार्श्वभूमी म्हणजे भूतकाळ होय. वर्तमान काळातील घडलेल्या कोणत्याही गोष्टी किंवा बाबी ह्या भूतकाळातील घटना किंवा बाबींचा परिणाम होय. अर्थात प्रत्येक बाबीचे मूळ कुठेतरी भूतकाळात असते. या भूतकाळातील घडलेल्या, वर्तमानकाळात परिणाम ठरलेल्या व भविष्यात काय परिणाम होऊ शकेल याचा सांगोपांग शास्त्रीय विचार करणारे शास्त्र म्हणजे इतिहास होय.

जगातील मानव समुदायातील असा कोणताही व्यक्ती नाही की ज्याला इतिहास नाही. प्रत्येक समुदाय, व्यक्ती, राष्ट्र, प्रांत, यांना इतिहास आहे. एवढेच नव्हे तर प्रत्येक रुढी, परंपरा, दृष्टीकोन याला इतिहास आहे. यामध्ये होणाऱ्या परिवर्तनालासुध्दा कोणतातरी इतिहास असतोच. आज घडलेल्या घटनांचे पडसाद भविष्यात होतील. तात्पर्य आजचा वर्तमान हा पुढे भविष्यासाठी इतिहास ठरणार. मानवी जीवनाच्या प्रत्येक क्षणाला इतिहास स्पर्श करीत आहे. या अर्थाने घडून गेलेल्या मानवी जीवनातील विविध घटनांचा परामर्श करणारे शास्त्र म्हणजे इतिहास असे म्हणावे लागेल.

♦ **अर्थ :**

इतिहास हा शब्द इति+ह+आस् या शब्दापासून तयार झालेला आहे. त्या दृष्टीने असे घडले हा सोपा अर्थ इतिहास या दृष्टीने घेण्यात येतो.

इतिहासाच्या दृष्टीने व्यक्ती, समाज, स्थळ व काळ हे चार घटक अत्यंत महत्त्वाचे आहेत. इतिहास या चार घटकांभोवती केंद्रित आहे असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही.

भूतकाळातील घडलेल्या घटना मानवाच्या जीवनावर परिणाम करणाऱ्या असतात. त्या घटनांचा मागोवा घेणे, वस्तुनिष्ठपणे अभ्यास करणे, त्यामागील सत्य शोधणे व ती यर्थाथाने मांडणे हे इतिहासात अपेक्षित असते.

इतिहासाचा सोप्या भाषेत अर्थ म्हणजे ऐतिहासिक घटनांचा अभ्यास करणारे शास्त्र होय.

♦ **स्वरुप :**

परिवर्तन हा निसर्गाचा नियम आहे. मानवी जीवनाबाबत आमुलाग्र परिवर्तन झालेले आहे. स्थळ, काळ, समाज व व्यक्ती या चारही घटकात अनेक परितर्वनाने प्रत्येक गोष्ट इतिहास जमा झालेली असते. अर्थात इतिहासाचे स्वरुप सर्वव्यापी व सर्वसमावेशक आहे असे म्हणावे लागेल.

पूर्वी जंगल, गुहेत राहणारा माणूस यंत्रयुगात वावरु लागलेला आहे. कंदमुळे खाणारा आदिमानव आज संगणकाचा वापर करुन यंत्रमानव तयार करण्याइतपत मजल मारलेली आहे. वस्त्रासाठी पाने वापरणाऱ्या माणसाने चंद्रावर व मंगळापर्यंत मजल मारलेली आहे. इतिहासात या सर्व घटनांचा उहापोह होतो. याअर्थाने इतिहासाचे स्वरुप पूर्वी पेक्षा बदललेले आहे.

इतिहासाच्या अभ्यासाच्या स्वरुपात सुध्दा बदल झालेले आहे.

काळानुरुप इतिहासाबाबत मतांतरे सुध्दा निर्माण झालेली आहेत.

## ♦ इतिहास हे शास्त्र आहे ? किंवा नाही ?

इतिहासाच्या अभ्यासाच्या स्वरुपामुळे इतिहास हे शास्त्र आहे की कला याबाबत विविध तज्ञात मत मतांतरे आहे. त्या अनुषंगाने इतिहास हे शास्त्र मानणारे व इतिहास हे कला मानणारे असे दोन गट तयार झालेले आहेत. त्या दोन्ही गटांचा परामर्श घेणे या ठिकाणी आवश्यक ठरते.

**इतिहास हे शास्त्र मानणारे-**

यांचे मते — १) इतिहासाचे स्वरुप भौतिक शास्त्रासारखे शुध्द नसले तरी यामध्ये ऐतिहासिक साधनांचा आधार घेतला जातो. साधने कसोटीवर तपासून पारखली जातात. भौतिक किंवा लिखित साधने ही योग्य किंवा अयोग्य, खरी किंवा खोटी आहेत, तर्कावर तपासून निश्‍चिती केली जातात. पूर्वी साधनांच्या परीक्षणाची उपलब्धता कमी होती. आधुनिक काळात यामध्ये फार मोठी वस्तुनिष्ठता आलेली आहे.

२) इतिहासातील घडलेल्या घटनांचे वस्तुनिष्ठ, नि:पक्ष व वैज्ञानिकतेच्या कसोटीने अर्थ विश्लेषण केले जाते.

३) इतिहासात भौतिक, लिखित साधन सामग्रीचा आधार घेतला जातो. ती परीक्षणाच्या कसोटीवर तपासली जातात.

४) विज्ञानात जी पध्दती अवलंबिली जाते त्या अनुषंगाने इतिहासातही तर्कशास्त्र, गणिताचा वापर केला जाऊ शकतो.

५) इतिहास हा घडलेल्या घटनांच्या तथ्यावर आधारित असतो.

ॲरिस्टॉटलच्या मते मनुष्य हा सामाजिक प्राणी आहे. तो समाजाशिवाय राहू शकत नाही. या अर्थाने इतिहास हे सामाजिक शास्त्र आहे. शास्त्रीय दृष्टीने सामाजिक घटनांचा अभ्यास केला जातो म्हणून इतिहास हे शास्त्र आहे असे काही तज्ञ मानतात.

**इतिहास हे शास्त्र न मानणारे -**

यांचे मते -

१) इतिहासातील घटना ह्या घडलेल्या असतात त्यांचे निरीक्षण वर्तमानात करता येत नाही. पुनरावृत्ती करता येत नाही. प्रयोग वारंवार करता येत नाही या दृष्टीने निरीक्षण वस्तुनिष्ठ होईल असे सांगता येत नाही. त्यामुळे निष्कर्षाचे सामान्यीकरण करता येत नाही.

२) भूतकालीन तथ्यांचे प्रत्यक्ष अवलोकन करता येत नाही.

असे असले तरी इतिहास हे शास्त्र आहे असेच मानावे लागेल. त्यामागील ठोस कारण म्हणजे शास्त्रीय नियमांच्या चौकटीत बसणे होय.

१) इतिहास हे सामाजिक विज्ञान आहे.

२) इतिहासात पुराव्याचा वापर केला जातो.

३) साधने संकलित केली जातात.

४) माहितीचे नि:पक्ष व तर्कशुध्द विश्लेषण केले जाते.

५) व्यक्तिनिष्ठतेला स्थान दिले जात नाही.

६) घडलेल्या घटनांचा कार्यकारणभाव शोधला जातो.

७) वैज्ञानिक पायऱ्यांचा वापर करुन इतिहास संशोधन केले जाते.

यावरुन इतिहास हे शास्त्र आहे. प्राप्त माहिती आकर्षक पध्दतीने मांडणे, शब्दांकन करतांना प्रभावी भाषा वापरणे इत्यादी दृष्टीकोनातून इतिहास ही एक कला सुध्दा आहे.

वरील विश्लेषणातून इतिहास हे शास्त्र व कला दोन्ही आहे असे म्हणावे लागेल.

**♦ इतिहासाच्या व्याख्या :**

इतिहासात घडलेल्या घटना, व्यक्ती चरित्र, स्थळांचा, काळांचा अभ्यास केला जातो. प्रत्येक बाब कुठे तरी संबंधित असते. परस्परावलंबिता सुध्दा असू शकते. अमूक घटना महत्त्वाची व इतर किरकोळ असे आपण म्हणू शकत नाही. घटनांचा झालेला प्रभाव व परिणामाच्या तीव्रतेवर घटनांचे महत्त्व ठरविल्या जाऊ शकते. इतिहासातील प्रत्येक घटना महत्वपूर्ण मानता येईल याबाबत दुमत नाही. त्यादृष्टीने इतिहासाचे खूप महत्त्व आहे. त्याबाबत विविध तज्ञांनी इतिहासाबाबत मांडलेले मत-

१) पंडित नेहरुच्या मते – "निसर्गाविरुध्द युगानुयुगे चाललेल्या मानवी प्रयत्नांची कथा म्हणजे इतिहास होय."

२) डॉ. राधाकृष्णन्च्या मते – "इतिहास राष्ट्राची स्मृती आहे."

३) कार्लाइलच्या मते - "इतिहास म्हणजे थोर व्यक्तींची चरित्रे होय."

४) हॅप्पाडच्या मते – "इतिहास हा अनुभवांचा नंदादीप आहे."

५) बर्कहाटच्या मते – "ज्या भूतकाळातील घटना तद्नंतरच्या अनेक युगात नोंद घेण्यासारख्या असतात. त्याचा वृतांत म्हणजे इतिहास होय."

६) इ.एच.कारच्या मते – "वर्तमानकाळ व भूतकाळ यांच्यातील कधीही न संपणारा संवाद म्हणजे इतिहास."

७) मॅकनिकालच्या मते – "भूतकालीन संस्कृतीची हकीकत बौध्दिक स्वरुपात सादर करणे म्हणजे इतिहास होय."

♦ **इतिहासाचे महत्त्व :**

उपरोक्त विविध तज्ञांच्या व्याख्यांचा परामर्श घेतला असता, कुणी घटनांचा अभ्यास तर कुणी व्यक्तींची चरित्रे या अनुषंगाने इतिहासाच्या व्याख्या केलेल्या दिसून येतात. व्याख्यांबाबत एकवाक्यता म्हणजे इतिहास हा महत्त्वपूर्ण विषय आहे.

इतिहासाचे महत्त्व सर्व विषयासारखेच आहे. इतिहासाला स्वतंत्र दर्जा प्राप्त करुन देण्याचे श्रेय १५ व्या शतकात हिरोडोटसकडे जाते. इतिहासाला महत्त्वपूर्ण स्थान देण्याचे कार्य केले ते साम्यवादाचे जनक कार्ल मार्क्स यांनी. कार्ल मार्क्सने इतिहास व इतर सामाजिक शास्त्रांशी महत्त्वपूर्ण असलेले संबंध जगासमोर आणून दिले.

इतिहासात घडलेल्या घटनांच्या संबंधित, विविध अंगांनी जसे. भौगोलिक, मानसशास्त्रीय, सामाजिक, राजकीय, भौतिक सर्व बाबींचे विवेचन केले जाते. घटनांची कारणमीमांसा व झालेला परिणामाचा सुध्दा अभ्यास केला जातो. त्यामुळे भविष्यात अनुचित बाबी घडू नये, त्यांची पुनरावृत्ती होऊ नये याबाबत भाकीत केली जातात. मानवी जीवन सुलभ, सरल व शांततामय व्हावे यादृष्टीने उपाययोजनांसाठी मानव प्रयत्नरत असतो.

उपरोक्त सर्व बाबींमुळे इतिहासाचे स्थान महत्त्वपूर्ण ठरते.



*****

# प्रकरण – २

# इतिहासाची साधने

भूतकाळात घडलेल्या घटनांची कालक्रमानुसार, शास्त्रशुध्द व पध्दतशीरपणे दिलेली माहिती म्हणजे इतिहास होय. भूतकालीन घटनांचा अभ्यास करतांना तिच्याशी संबंधित अनेक बाबींचा अभ्यास करावा लागतो. आजचा मानव संगणक युगात वावरतोय, प्रत्येक गोष्टीची शहानिशा करणे, चौकस बुध्दीने विचार करणे ही मानवी प्रवृत्ती आहे. प्राप्त माहिती योग्य की अयोग्य हे तपासण्याचे कौशल्य त्याला प्राप्त आहे. कोणतेही विचार किंवा तर्कशुध्दतेने मांडलेले स्पष्टीकरणाच्या पृष्ठार्थ पुरावा देणे गरजेचे असते. त्याशिवाय दिलेले स्पष्टीकरण किंवा बाबी ह्या अर्थहीन ठरतात. समर्थनार्थ मांडलेल्या बाबी म्हणजेच पुरावा होय. इतिहासाच्या दृष्टीने पुरावा म्हणजे साधने. इतिहासात घडलेल्या घटना, बाबी असतात म्हणून इतिहासात पुराव्यार्थ विविध साधनांना फार महत्त्व आहे. पुराव्याशिवाय इतिहासातील दिलेल्या स्पष्टीकरणास अर्थ ठरत नाही म्हणूनच साधनांना इतिहासात अनन्यसाधारण महत्त्व आहे.

♦ **साधनांचे महत्त्व :**

इतिहासात साधनांचे महत्त्व पुढीलप्रमाणे विशद करता येईल.

१) साधनांमुळे घटनेला वस्तुनिष्ठता येते.

२) साधनांमुळे पक्षपातीपणा, व्यक्तिनिष्ठता निर्माण होत नाही.

३) साधने घटनेची साक्ष देतात.

४) साधनांमुळे घटनेचे चिकित्सक अभ्यास करता येते.



५) साधनांमुळे घटनेच्या बाबतीत सत्यार्थता अभ्यासता येते.

६) भावी पिढीला साधनांमुळे मार्गदर्शन मिळते.

७) इतिहासात घडलेल्या बाबी असल्यामुळे साधने हाच दुवा ठरतो.

८) सर्व विषयाला, व्यक्तीला, पुरातत्त्व विभागाला साधने उपयोगी ठरतात.

**♦ साधनांचे प्रकार :**

साधनांचे खालील प्रमाणे वर्गीकरण केले जाते.




**अ) भौतिक साधने :**

भौतिक साधनामध्ये किल्ले, ताम्रपट, स्मारके, इमारती, लेणी अवशेष, नाणी, भांडी, शिलालेख यांचा समावेश होतो. किल्ल्यांमध्ये गिरीदुर्ग, वनदुर्ग, जलदुर्ग, भुईकोट, उदा. सिंधुदुर्ग, विजयदुर्ग. स्मारकामध्ये समाधी जसे रायगडावरील शिवाजीमहाराजांची समाधी, कबर-जसे औरंगजेबाची कबर. दर्गा-जसे पीरशहाची दर्गा. इमारतीमध्ये कुतुबमीनार, राजवाडे, मंत्रीनिवास, स्नानगृह, राणीवसा सामान्य जनतेची घरे इत्यादींचा समावेश होतो. उदा. हडप्पा संस्कृतीची घरे. वास्तुशिल्पामध्ये लेणी जसे कैलासलेणी, घारापूरी लेणी. शिलालेख जसे अशोकस्तंभ इत्यादींचा समावेश होतो. नाणी यामध्ये शिवकालीन, गुप्तकालीन नाणी इत्यादींचा समावेश होतो. भांडी यामध्ये विविध राजांच्या काळातील भांडयांचे प्रकार यांचा समावेश होतो.

इतिहासाचे साक्ष पुरावे म्हणजे भौतिक आधार स्त्रोत होय. इतिहासाच्या अभ्यासासाठी उत्खननात वास्तूचे, वस्तूचे अवशेष इत्यादी भौतिक आधारात समाविष्ट होतात. याशिवाय विविध साम्राज्यांच्या काळात वास्तू, इमारती, पुतळे, स्तंभाचे निर्माण केले गेले ते सुध्दा भौतिक आधार होय. या आधारांच्या सहाय्याने इतिहासाचे यथार्थ दर्शन करता येते.

भौतिक आधारात पुढील बाबींचा समावेश होतो.

**१) इमारती व वास्तू :**

या भौतिक आधारात राजवाडे, किल्ले, स्तंभ, महाल, गढी, पूल, रस्ते, पाणपोया, तुरुंग, कारंजे, संग्रहालय यासारख्या वास्तू व इमारतींचा समावेश होतो. या वास्तूंना भेटी दिल्यानंतर तत्कालिन काळातील स्थापत्यकलाशास्त्र, वास्तूकलाशास्त्र, आर्थिक संपन्नता, सामाजिक व राजकीय बाबींची माहिती मिळते. लोकांचे धार्मिक व सांस्कृतिक बाबींची सुध्दा माहिती होते.

नागपूरचा सिताबर्डी किल्ला, पुणे येथील आगाखान पॅलेस, गांधीजींचे साबरमती आश्रम, क्रांतिकारकांना डांबून ठेवलेले तुरुंग, अंदमान येथील सेल्युलर जेल इत्यादी बाबींचा समावेश इमारती व वास्तूं मध्ये होतो. याबाबी आजही ऐतिहासिक घटनांची साक्ष देतात.

**२) पुतळे व स्मारके :**

मध्ययुगीन कालखंड असो किंवा स्वातंत्र्योत्तर कालखंड यामध्ये पुतळे व स्मारके विशिष्ट व्यक्तींच्या स्मरणार्थ बांधल्या गेली आहेत. महापुरुष, थोर संत, क्रांतिकारक स्वातंत्र्यासाठी आहुती दिलेले शहीद यांचे पुतळे त्यांच्या कार्याचा झरा जीवंत ठेवतात. पुतळयावरुन

त्यांच्या कार्याची, जन्म मृत्यू, जीवनपटांची माहिती मिळते. भारतात छत्रपती शिवाजी महाराज, छत्रपती संभाजी महाराज यासोबत महात्मा गांधी, महात्मा फुले, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, छत्रपती शाहू महाराज, चंद्रशेखर आझाद, भगतसिंग, सुभाषचंद्र बोस आदींचे पुतळे त्यांच्या कार्याची महती व्यक्त करतात.

पुतळयांसोबत थोर व्यक्ती, प्रिय व्यक्तींच्या स्मृती प्रित्यर्थ, कार्याची आठवण म्हणून कबर, थडगे, स्मारके उभारली आहेत. उदा. ताजमहल, हुतात्मास्मारके इत्यादी.

पुतळे व स्मारकावरुन व्यक्तीच्या कार्याची माहिती मिळते. इतिहासातील त्यांचे महत्त्व कळते.

**३) वस्तुस्वरुपातील आधारस्त्रोत :**

यामध्ये दगड, विटामूर्ती, दागिने, ताम्रपट यांचा समावेश होतो. इतिहासाचा अभ्यास करतांना उत्खनन कार्यात विविध वस्तुरुपातील साहित्ये सापडली त्यांच्याद्वारे आर्थिक जीवन, संस्कृती, प्रगती धार्मिक जीवन व परंपरा इत्यादी बाबत माहिती मिळते. उदा. ताम्रपटावर तत्कालिन राजा, त्यांचे वंशज इत्यादी संबंधी माहिती प्राप्त होते. गुप्तकालीन दागिने, मूर्त्या आदी. ताम्रपटावर कायमस्वरुपी भूमीदान इत्यादी नोंदी करण्यात येत होत्या.

**४) नाणी :**

प्रत्येक कालखंडात नाणी बदललेली आढळून येते. नाण्याच्या स्वरुपावरुन तत्कालिन आर्थिक सुबत्ता कळते. नाण्यावर विविध अक्षरे, लिपी, मुद्रा, चिन्हे अंकित केली जात होती. त्यावरुन भौतिक सुबत्ता, आर्थिक जीवन, व्यवहार इत्यादीची माहितीसह धातूचा वापर, प्रतीके

याबाबत सविस्तर माहिती मिळते. उदा. गुप्तकाळातील नाण्यावरुन राजे वैष्णव पंथी होते कि शिव उपासक, दूर देशाशी संबंध याबाबत माहिती प्राप्त होते. तुघलकचा तांब्याच्या नाण्याचा प्रयोग जगप्रसिध्द आहे.

**५) आलेख व शिलालेख :**

ऐतिहासिक शिल्पकलेची साक्ष पुरावे म्हणजे शिलालेख. लेण्या, शिल्पस्तंभ यांचा समावेश यामध्ये होतो. कोरलेल्या विविध लेण्या जसे अजिंठा, वेरुळ, कार्ले. या लेण्यांवरुन तत्कालिन शिल्पकलेच्या माहितीसह जीवन, धार्मिकता, कलारसिकता बाबत माहिती प्राप्त होते. शिलालेख इतिहास आधारस्त्रोतांतील महत्त्वपूर्ण आधार मानले जातात. जसे अशोक स्तंभ, सांचीचा स्तूप, इत्यादी. शिलालेख इतिहासाच्या आधारस्त्रोतात महत्त्वपूर्ण भूमिका वटवितात.

या भौतिक साधनांचे इतिहासात खूप महत्त्व आहे. यावरुन -

१) तत्कालिन आर्थिक व्यवस्थेचा अभ्यास करता येते.

२) सामाजिक स्थितीचे विश्लेषण करता येते.

३) तत्कालिन कला, बांधकाम इत्यादी कलेची माहिती मिळते.

४) धार्मिक बाबींची माहिती मिळते.

५) राजकीय परिस्थितीचे विश्लेषणात्मक माहिती घेता येते.

६) लोकांचे राहणीमान, भौगोलिक बाबींची माहिती मिळते.

**ब) लिखित स्त्रोत :**

इतिहासातील घटनांच्या नोंदीचे लिखित स्वरुप म्हणजे लिखित साधने होय. लेखनबध्द केलेला पुरावा म्हणजे लिखित स्त्रोत होय. या साधनांमध्ये -



१) धार्मिक साहित्ये

२) पत्रव्यवहार

३) वृत्तपत्रे व नियतकालिके

४) प्रवासवर्णने

५) चरित्रे व बखर

६) नकाशे आराखडे

७) **युध्दनोंदी** आदींचा समावेश होतो.

**१) धार्मिक साहित्ये :**

धार्मिक जीवन, धार्मिक परंपरा, रुढी, संहिता यावर लिहिलेल्या साहित्यांचा समावेश धार्मिक साहित्यात होतो. याद्वारे लोकांची धार्मिक प्रवृत्ती, रुढी, धर्मपालन प्रथा, राहणीमान, जीवनशैली याबाबत सविस्तर माहिती मिळते. सामाजिक जीवनाचा अभ्यास करता येतो. उदा. बौध्द, जैन, धर्म पुस्तके व लिखाण, वेद, रामायण, महाभारत इत्यादी.

**२) पत्रव्यवहार :**

तत्कालिन काळातील राजांनी दिलेले आदेश, न्यायनिवाडा बाबतच्या नोंदी, सनद, पत्रव्यवहार, गुप्त हेरामार्फतचे संदेशपत्र, फर्मान तह इत्यादींचा समावेश यामध्ये होतो. याद्वारे राजकीय जीवन व्यवहाराबाबत माहिती मिळते. उदा. शिवरायांचे आज्ञापत्र प्रसिध्द आहे.

**३) वृत्तपत्रे व नियतकालिके :**

वृत्तपत्रे लोकशाहीचा चौथा स्तंभ मानली जातात. वृत्तपत्रे, नियतकालिकांद्वारे तत्कालिन सरकारची धोरणे, अंमलबजावणी त्याबाबतची टिकाटिप्पणी, अग्रलेख, मान्यवरांची मते कळतात. यासोबत राजकीय घडामोडी, आर्थिक व सांस्कृतिक घडामोडींची सुध्दा माहिती मिळते.

उदा. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे मूकनायक व बहिष्कृत भारत, लोकहितवादींचे प्रभाकर साप्ताहिक इत्यादी. वृत्तपत्रे व नियतकालिकांनी भारतीय स्वातंत्र्य चळवळीत महत्त्वाची भूमिका बजावून लोकजागृतीचे मोठे कार्य केलेले दिसून येते.

**४) प्रवास वर्णने :**

अध्ययनासाठी, पर्यटनासाठी अनेक प्रवाशांनी अनेक स्थळांना भेटी दिल्या. त्या प्रवाशांच्या वर्णनांचा लिखित आधारामध्ये समावेश होतो.

प्राचीन काळी भारतात भेट दिलेले फाहियान, युवान श्वांग जगप्रसिध्द आहेत यासोबत इब्न बतुता, अल्बेरुनी आदींची प्रवासवर्णने इतिहासाच्या अभ्यासासाठी महत्त्वपूर्ण ठरतात.

**५) चरित्रे व बखर :**

तत्कालिन काळातील सम्राट, राजा, महत्त्वाच्या व्यक्तींवर विविध चरित्र लेखन लिहिल्या गेली आहेत. त्यांच्या अभ्यासाद्वारे तत्कालिन सामाजिक परिस्थिती, राजकीय जीवन, सांस्कृतिक विकासासह व्यक्तीचे जीवनपट कार्ये यांची माहिती होते. यामध्ये काही आत्मचरित्रे सुध्दा महत्त्वपूर्ण ठरतात. तवारिख म्हणजे तारीख तात्पर्य घटनाक्रम अल्बेरुनी, मिर्झा हैदर आदींनी लिहिलेल्या तवारीखा.

बखर म्हणजे खबर अर्थात बातमी तत्कालिन वेळी देण्यात आलेल्या बातम्या जसे. खडर्याच्या लढाईची बखर, चिटणीस बखर इत्यादी समावेश होतो. सुलतानशाहीत, मुगलकाळात लिहिलेल्या बखरी अभ्यासासाठी महत्त्वपूर्ण ठरतात. उदा. अकबरनामा, बाबरनामा, इत्यादी.

**६) नकाशे आराखडे :**

नकाशाचे इतिहासात महत्त्वाचे स्थान आहे. युध्दाची रणनीती करतांना व्युहरचना, सैनिकांची स्थिती, विरुध्द सैन्याची स्थिती, विरोधी राज्याची स्थिती नकाशे रेखाटन केले जात होते. यासोबत विविध साम्राज्यकालखंडातील भूप्रदेश, भौगोलिक प्रदेश, नदया, सीमा, साम्राज्यविस्तार याबाबत नकाशातून माहिती होते. वास्तुविशारद व अभियंत्याद्वारा विकसित केलेली मुंबई नगरी उत्तम उदाहरण आहे.

उदा. मौर्य कालीन भारत, गुप्तकालीन भारत इत्यादी नकाशे

**७) युध्दनोंदी :**

युध्दातील विविध घटनांच्या नोंदी, युध्दाची स्थिती, या युध्दकाळातील लिखित पुराव्याच्या महत्त्वपूर्ण आधारस्त्रोत आहे. जसे पानिपतच्या लढाया.

♦ **परीक्षण :**

लिखित साहित्याचे परीक्षण सुध्दा करणे गरजेचे असते.

१) लिखित पुराव्याची सत्यता तपासणे.

२) लिखित पुराव्याबाबत वस्तुनिष्ठता तपासणे.

३) लिखित पुराव्याची विश्वसनियता तपासणे.

या बाबींसाठी साहित्याचे परीक्षण होणे गरजेचे आहे.

परीक्षणाचे दोन प्रकार



अंतर्गत परीक्षण — बाह्यपरीक्षण

**१) अंतर्गत परीक्षण :**

लिखित पुराव्याचे अंतर्गत परीक्षण करतांना त्या पुराव्यातील मजकूर, नोंदी, माहिती ह्या संबंधितानेच प्रत्यक्ष दर्शीनेच लिहिलेल्या आहेत किंवा नाही ते तपासतात. याबरोबरच त्या मजकुराचा विशिष्ट अर्थ लावला जातो. मजकुरात खाडाखोड, मजकुराचा योग्य अन्वयार्थद्वारे माहितीची सत्यता व वस्तुनिष्ठता तपासणी अंतर्गत परीक्षणाचा मुख्य हेतू असतो.

**२) बाह्यपरीक्षण :**

लिखित पुराव्याचे बाह्यपरीक्षण करतांना तो पुरावा तत्कालिन आहे किंवा नाही, कागद त्या काळातील आहे किंवा नाही की नंतर कागद त्यामध्ये अंतर्भूत केलेला आहे. बाह्य परीक्षणासाठी कागद, छपाई यांची वेळ प्रसंगी रायासनिक परीक्षण किंवा चाचणी सुध्दा केली जाते. तात्पर्य लिखित पुराव्याची विश्‍वसनीयता म्हणजे तो पुरावा विश्‍वास ठेवण्याइतका आहे किंवा नाही हे तपासणे बाह्य परीक्षणाचा मुख्य हेतू असतो.

**♦ लिखित साधनांचे महत्त्व :**

१) लिखित साधने ही सबळ पुरावा म्हणून कार्य करतात.

२) तत्कालिन राजकीय घडामोडी, परिस्थिती, सांस्कृतिक जीवनाविषयी माहिती मिळते.

३) तत्कालिन परिस्थितीचे प्रत्यक्ष चित्र समोर उभे राहते.

४) लोकांचे जीवनमान, राहणीमान, वेशभुषा इत्यादींचा अभ्यास करता येतो.



५) प्राप्त निष्कर्षांना आधार मिळतो.

**क) मौखिक साधने :**

अनेक बाबींचे संक्रमण मौखिक रुपाने झालेले आहेत. अभंग, गीते, श्लोक आदींसारख्या बाबी मुखोद्गत करुन पुढील पिढीला ते हस्तांतरीत करण्यात आलेले आहे. इतिहासाच्या आधारात मौखिक आधारांना तेवढेच महत्त्व आहे जेवढे भौतिक व लिखित आधार महत्त्वपूर्ण आहेत. मौखिक साधनामध्ये पोवाडे, गाणी, भजने, कथा, कवने यांचा समावेश होतो.

एखादया प्रसंगाचे वर्णनासाठी गीत सुध्दा गायले आहे. भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीतील वंदेमातरम् स्फूर्ती गीत जगप्रसिध्द आहे. गीत मौखिक आधार आहे. शिवाजी महाराजांच्या जीवनाधारित पोवाडे प्रसिध्द आहेत. याशिवाय धार्मिक प्रबोधन चळवळीतील भजने, आदींचे मौखिक आधारस्त्रोतात महत्त्वपूर्ण स्थान आहे. या आधाराद्वारे त्या काळातील परिस्थिती लोकांची आस्था, जीवन याबाबत सविस्तर माहिती मिळते.

स्वातंत्र्य चळवळीच्या काळातील भाषणे, चित्रफिते, ध्वनीफिते, गीत, स्फूर्तीगीताने अक्षरश: लोकांना इंग्रजाविरुध्द लढण्याची स्फूर्ती, ऊर्जा मिळाली होती. त्यामुळे त्यांनी स्वत:च्या जीवाची पर्वा न करता स्वातंत्र्यलढयात उत्स्फूर्तपणे सहभाग घेतला होता.

मौखिक साधनांमध्ये -

पोवाडा – तत्कालिन शाहीरांनी केलेले पोवाडे. जसे शिवाजी महाराजाधारित पोवाडे

मिथके – विविध रुजलेल्या बाबी

दंतकथा – आध्यात्मिक व धार्मिक बाबींच्या दंतकथा

गाथा – व्यक्तींबाबत केलेली वर्णने, कथा, म्हणी, अभंग व श्लोक तथा लोकगीतांचा समावेश होतो.

आधुनिक काळात रेकॉर्ड केलेल्या, ध्वनीफिती, चित्रफिती, सी.डी., व्ही.डी.ओ. यांचा समावेश होतो.

♦ **मौखिक साधनांचे महत्त्व -**

१) परंपराबाबत माहिती मिळते.

२) संस्कृती विचार व्यक्तिचित्रण बाबत माहिती मिळते.

३) लोकजीवनाचे विविध पैलूंबाबत अभ्यास करता येतो.

४) संबंधित साधने पिढयान पिढया संक्रमित होतात.

५) वारसा पुढील पिढीला मिळतो.

मौखिक साधने संक्रमित होतांना थोडाफार बदल झालेला दिसून येतो.

याशिवाय इतिहास विषयतज्ञ आधाराचे दोन गटात वर्गीकरण करतात.

अ) प्राथमिक आधार स्त्रोत

ब) दुय्यम आधार स्त्रोत

**अ) प्राथमिक आधार स्त्रोत :**

ज्या आधारांचा प्रत्यक्ष घटना, प्रसंगाशी संबंध आहे. संबंधित घटनेची प्रत्यक्ष साक्ष्य पुरावे वास्तू, शिल्प, इमारती इत्यादीं सोबत पत्रे, वृत्तपत्रे, लेखन यांचा समावेश प्राथमिक आधारात होतो.

तत्कालिन शिलालेख, ताम्रपट, वस्तू, आत्मचरीत्र यांचा समावेश या साधनात होतो.

**ब) दुय्यम आधार स्त्रोत :**

प्रत्यक्ष घटनेशी संबंधित नसलेली परंतु त्या घटनेच्या वेळी उपस्थित असलेल्या व्यक्तींकडून ऐकलेल्या बाबींची नोंद करणारी व्यक्ती किंवा नोंदवलेली माहिती म्हणजे दुय्यम आधार होय. युध्दात सहभागी न

झालेली परंतु ते पाहणाऱ्या व्यक्तीने केलेले वर्णन इत्यादींचा यामध्ये समावेश होतो.

इतिहासात दुय्यम आधारांपेक्षा प्राथमिक आधार स्त्रोतांना अधिक महत्त्वाचे स्थान आहे व राहणार.

♦ **साधनांचे मूल्यमापन :**

इतिहासात भौतिक, लिखित व मौखिक तिन्ही साधनांना महत्त्व आहे. जिथे जे साधन उपयोगी पडेल ते वापरणे गरजेचे असते. यादृष्टीने वापरलेले साधने योग्य आहेत काय हे पाहणे क्रमप्राप्त ठरते कारण इतिहासात त्या घटना त्याच परिस्थितीत पुनरावृत्ती करता येत नाही. या करीता साधने फार महत्त्वाची ठरतात. इतिहासातील सत्य हे साधनांच्या खेळावरच अवलंबून असते म्हणता येईल. सबब साधनांचे मूल्यमापन करणे सुध्दा गरजेचे ठरते. असे यासंबंधात -

१) संबंधित साधने खरी आहेत किंवा नाही हे तपासणे.

२) साधनांची वस्तुनिष्ठता तपासणे.

३) साधनांमधून प्राप्त माहिती एकांगी, विसंगत किंवा अतिरंजक तर नाही हे तपासणे.

४) साधनांमधील विश्वसनियतेसाठी इतर समकालीन साधनांसोबत पडताळा करणे.

५) लेखकाचा नि:पक्षपातीपणा व तटस्थपणा आहे किंवा नाही हे पाहणे.

अशाप्रकारे साधनांचे मूल्यमापन करणे गरजेचे आहे.



*****

# प्रकरण - ३

# इतिहासाचे शालेय अभ्यासक्रमातील स्थान व महत्त्व

मानवी जीवनात इतिहासाचे स्थान महत्त्वपूर्ण ठरलेले आहे. त्यादृष्टीने मानवी जीवन सुखकर व सुलभ व्हावे यासाठी शिक्षणाची गरज असते. याकरीता औपचारिक शिक्षणातून इतिहासाची ओळख देणे क्रमप्राप्त ठरते. म्हणून शालेय अभ्यासक्रमात इतिहासाचे स्थान आगळेवेगळे ठरते.

**♦ इतिहासाचे शालेय अभ्यासक्रमातील स्थान :**

**१) राष्ट्रीय शैक्षणिक धोरणांची अंमलबजावणी :**

काळानुसार जागतिक बदलानुसार राष्ट्राची गरज बदलत असते. त्यानुसार राष्ट्राची गरजांची पूर्तता करण्याचे साधन म्हणजे शिक्षण. शिक्षणातून राष्ट्राची ध्येय, धोरणांचे प्रतिबिंब उमटले जातात. राष्ट्रीय शैक्षणिक धोरणे ठरवणे व त्यानुसार अंमलबजावणीसाठी विविध विषयाचे अभ्यासक्रम आखणी करण्याबाबत इतिहासाचे स्थान महत्त्वपूर्ण ठरते.

देशाच्या इतिहासाची राष्ट्रीय धोरणात मांडणी करुन अंमलबजावणी करण्यात येते. जसे १९८६ चे राष्ट्रीय शैक्षणिक धोरण.

**२) वारसा मूल्ये :**

प्रत्येक मानवाला आपला इतिहास जाणून घेण्याची जिज्ञासा असते. आपल्या पूर्वजांचा इतिहास, घराण्याचा इतिहास, गावाचा, समाजाचा, देशाचा प्रत्येक बाबींचा इतिहासाबाबत जिज्ञासा असते व अभिमानही असतो. शालेय अभ्यासक्रमात देशाची ऐतिहासिक, आर्थिक, सामाजिक परंपरा इत्यादी बाबींसह मूल्ये, संस्कार देण्याचे

साधन म्हणजे इतिहास होय. पुढच्या पिढीला वारसा मूल्ये संक्रमित करण्याचे साधन म्हणजे इतिहास. जसे अशोकस्तंभावरुन ध्वजात घेतलेले अशोक चक्र इत्यादी.

**३) नैतिक मूल्ये :**

इतिहासातून थोर व्यक्ती, संत, समाज सुधारक त्यांच्या कार्याबाबत माहिती मिळते. या व्यक्तींच्या गुणांचा परिचय विद्यार्थ्यांना होतो. त्या थोर व्यक्तीमधील गुणांचा आदर करुन ते गुण आपल्या जीवनात अंगीकारावे ही शिकवण आपल्याला मिळते. मानवता, सर्वधर्म-सहिष्णूता, राष्ट्रीय एकात्मतेची जपवणूक, सांस्कृतिक भिन्नता असूनही तिचा आदर करणे इत्यादी गुणांची जोपासना करण्याचे कार्य इतिहास विषयातून होते. देशाला नैतिक मूल्यांनी परिपूर्ण असणारे नागरिक निर्माण करण्याचे सामर्थ्य इतिहास विषयात आहे. याबाबतीत नैतिक मूल्यांचा विकास करण्यासाठी शालेय अभ्यासक्रमात इतिहास विषयाचे महत्त्वाचे स्थान आहे.

**४) चिकित्सक वृत्ती :**

शालेय विद्यार्थ्यांमध्ये चिकित्सक वृत्तीचा विकास होण्यासाठी इतिहासाचे महत्त्वाचे स्थान आहे. मानवाची उत्क्रांती व त्याचे टप्पे, औद्योगिक क्रांती, आधुनिकीकरण, बाजारपेठा नवनवीन शोध व त्यांचा परिणाम काय झाला ? वसाहतवाद त्यातून साम्राज्यवादी प्रवृत्तीची वाढ कशी झाली ? त्याचा परिणाम म्हणजे पहिले व दुसरे महायुध्द झाले काय? त्याचे विनाशक परिणाम काय झाले? इत्यांदी बाबींबाबत चिकित्सक विचार करण्याची वृत्ती निर्माण होते ती इतिहासामुळे.

तात्पर्य चिकित्सक वृत्ती वाढ करण्यासाठी इतिहासाचे शालेय अभ्यासक्रमात महत्त्वाचे स्थान आहे.

**५) कार्यकारणभाव :**

इतिहासात भूतकालीन घटनांचा अभ्यास केला जातो. घटित झालेल्या या घटना कोणत्यातरी घटनांचा कार्यकारण भाव दर्शवितात. एक घटना दुसऱ्या कोणत्यातरी घटनेची कारणमीमांसा करते किंवा त्याचा परिणाम दर्शविते. असे का घडले ? याबाबत विचार करण्याच्या प्रवृत्तीत वाढ होते ती इतिहासामुळे. कोणत्या घटनेची उकल, कोणती घटना असेल याचा शोध इतिहासात घेतला जातो. तर्कशुध्दपणे विचार करुन त्याबाबत उकल केली जाते. ऐतिहासिक घटनेचे महत्त्व व त्याचा परिणाम यासंबंधी मूळ कारणे इतिहासात शोधली जातात. ही कारणे शोधतांना चिकित्सक, सांगोपांग व सर्वसमावेशक विचार करण्याच्या वृत्तीत वाढ होते. वसाहती युरोपात निर्माण झाल्या त्यामागे औद्योगिक क्रांती, वाढता संघर्ष, नवीन बाजारपेठांचा शोध अशी कारणमीमांसा करता येईल. अर्थात या घटनांचा कार्यकारणभाव शोधण्यासंबंधी आवश्यक तर्कशुध्दता, चिकित्सकपणा विद्यार्थ्यांमध्ये निर्माण करण्यास इतिहास विषय सहाय्य करतो.

**६) सांस्कृतिक वारसांचे जतन :**

प्रत्येक देशाची, प्रातांची, समाजाची संस्कृती भिन्न असते. प्रत्येक व्यक्तीला आपल्या संस्कृतीचा अभिमान असतो. पूर्वजांनी व थोर पुरुषांनी जे आदर्श निर्माण केले त्यांनाच संस्कृती म्हणता येईल. या सांस्कृतिक मूल्यांना व्यक्ती प्राणापेक्षाही जपतो. सांस्कृतिक वारसाचे जतन करण्यासाठी राष्ट्र  सुध्दा प्रयत्न करते. राष्ट्राच्या संस्कृतीची जपवणूक झाली पाहिजे यासाठी महत्त्वाचे साधन म्हणजे इतिहास. देशाचे ऐतिहासिक, सांस्कृतिक मूल्ये प्रत्येक नागरिकास कळाले पाहिजे, त्यांचे अनुपालन झाले पाहिजे हे प्रत्येक देशास वाटते. राष्ट्रीय एकात्मतेची

भावना निर्माण होऊन देशाचा विकास व्हावा हे अपेक्षित असते. त्यासाठी प्रत्येक राष्ट्र अविरत प्रयत्न करते. त्या अनुषंगाने देशाची संस्कृती, त्याबाबत आदर इत्यादी सांस्कृतिक वारसांचे जतन इतिहासातून होत असते.

इतिहास सांस्कृतिक मूल्यांचे जतनच करीत नाही तर त्या वारस्यांचे भावी पिढीला हस्तांतरण करतो. याबाबत इतिहासाचे स्थान अढळ आहे.

**७) बौध्दिक क्षमतांचा विकास :**

प्रत्येक व्यक्तीस ज्ञान प्राप्ती करण्याची लालसा असते. इतिहास विषयातून विविध घटनांचे ज्ञान प्राप्त होते. घटना कशी घडली काय परिणाम झाला या बाबींचे ज्ञान प्राप्त होते. त्याच्या ज्ञानात भर पडत असते. इतिहासाच्या अभ्यासाने व्यक्तीस ऐतिहासिक घटनांची माहिती मिळते. कालखंड, आर्थिक जीवन, राजकीय परिस्थिती, जीवनमान, पोशाख, भांडी, नाणी इत्यादीमुळे व्यवहार ज्ञानाच्या कक्षा रुंदावतात. यासोबत विद्यार्थ्यांमध्ये वस्तुनिष्ठता व चिकित्सक प्रवृत्तींत सुध्दा वाढ होते. अर्थात इतिहासामुळे बौध्दिक क्षमतेत नक्कीच वाढ होते.

**८) चुकांची पुनरावृत्ती टाळणे :**

ऐतिहासिक घटनांचा अभ्यास करतांना संबंधित अनिष्ठ घटना पुन्हा घडू नये, झालेल्या चुकांची पुनरावृत्ती होऊ नये याबाबतची दक्षता इतिहासामुळे घेता येते. दोन्ही महायुध्दामुळे मानवी जीवनात पसरलेली अशांतता, असमाधानता टाळून शांततामय सहजीवन या वृत्तीचा स्वीकार करण्यात आला. 'वसुधैव कुटुंबकम' ह्या वैश्विक संकल्पनेची माहिती इतिहासच देते. अर्थात अरिष्ठ परिणाम झालेल्या चुकांच्या पुनरावृत्ती इतिहासामुळे टाळता येते.

### ९) देशाच्या विकासासाठी सहाय्यभूत :

प्रत्येक देशाच्या आशा, आकांक्षा व अपेक्षा असतात. देशाचा विकासाचा आराखडा असतो. विकासाची दिशा ठरवलेली असते. देशाच्या विकासासाठी महत्त्वाची असतात ते देशहिताचा विचार करणारे नागरिक. देशाचा विकास म्हणजे नागरिकांचा विकास. नागरिकांचा विकास म्हणजे पर्यायाने राष्ट्राचा विकास. एकाच नाण्याच्या या दोन बाजू आहेत. देशाच्या विकासासाठी महत्त्वाचे साधन म्हणजे शिक्षण. देशातून अपेक्षित असलेले नागरिक घडविण्याचे सामर्थ्य फक्त शिक्षणात आहे. या अनुषंगाने इतिहासाचे महत्त्वाचे स्थान आहे. इतिहासातून देशाच्या विकासासाठी आवश्यक असणाऱ्या गुणांची रुजवणूक विद्यार्थ्यांमध्ये करता येते.

### १०) मानसिक शक्तींचा विकास :

इतिहास विषयाच्या अभ्यासाने व्यक्तीच्या ज्ञानातच भर पडत नाही तर मानसिक शक्तींचा सुध्दा विकास होतो. असे का घडले ? काय परिणाम झाला ? असे घडले नसते तर, या ऐवजी असे घडले असते तर, इत्यादी विचार प्रवर्तक प्रश्नांद्वारे मानवी बुध्दीला चालना देऊन विविध मानसिक शक्तींचा सुध्दा विकास होतो. या अर्थाने इतिहासातून विद्यार्थ्यांच्या मानसिक शक्तीला प्रेरित करुन चालना देण्याचे महत्त्वाचे कार्य घडते.

### ११) भावनात्मक विकास :

प्रत्येक व्यक्तीला भावना आहेत. शौर्य, वीरता, राग, लोभ, भीती, प्रेम, इत्यादी भावनांबाबत इतिहासातील घटना साक्ष ठरतात. भगतसिंग, राजगुरु व सुखदेव यांच्या फाशीचा प्रसंग वर्णनाने प्रत्येक विद्यार्थ्यांमध्ये इंग्रजांविषयी राग निर्माण झाल्याशिवाय राहत नाही.

देशाभिमान, राष्ट्राभिमान, राष्ट्रीय एकात्मता, राष्ट्रीय मूल्यांबाबत

जोपासना, देशाचा विकास इत्यादी भावनात्मक विकास करण्यासाठी इतिहास विषय एक सशक्त साधन आहे. इतिहासातून विद्यार्थ्यांमध्ये भावनात्मक विकास होतो.

**१२) आनंद निर्मिती :**

इतिहास हा विषय रोचक व मनोरंजक आहे. त्यामधील काही घटना गोष्टीरुपातून घेतल्यास मनुष्यास आनंद प्राप्ती होते. यासोबत इतिहासाच्या घटनांमधील पुराव्याची साक्ष देणारे साधनांच्या भेटीतून तर आनंद निर्माण होतोच. ऐतिहासिक घटनांची साक्ष देणारे किल्ले, तट, संग्रहालय व लेण्या इत्यादी स्थळी भेटी दिल्या, सहल व पर्यटनाच्या माध्यमातून माहिती घेतली तर मनुष्यास आनंद मिळतो व मनोरंजनही होते.

महाराष्ट्राच्या इतिहासाच्या दृष्टीने विचार केल्यास शिवाजी महाराजांच्या काळातील विविध किल्ले, आदिलशाही व निजामशाही काळातील किल्ले व स्थळे, औरंगाबाद मधील लेण्या, मकबरा, मंदिरे आदि ऐतिहासिक स्थळी भेटी दिल्या, सहल काढली तर प्रत्यक्ष पुराव्यांचा आस्वाद घेता येतो. विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष अनुभव प्राप्त होऊन आनंद निर्मिती मिळते.

मनुष्य कोणतेही कार्य आनंद घेण्यासाठी करतो. अशा मनोरंजक पध्दतीने इतिहासातून विद्यार्थ्यांना आनंद मिळू शकतो. विद्यार्थ्यांमध्ये आनंद निर्मिती इतिहासामुळे होते.

**१३) राष्ट्रीय मूल्यांचा विकास :**

राष्ट्राची मूल्ये जपवणूक करुन, देशाच्या हितासाठी राष्ट्रीय मूल्ये विद्यार्थ्यांमध्ये रुजवणूक करणे व निर्माण करण्याच्या दृष्टीने इतिहासाचे शालेय अभ्यासक्रमात महत्त्वाचे स्थान आहे. देशाच्या

भौगोलिक, सामाजिक, धार्मिक, आर्थिक परिस्थितीनुसार देशहितासाठी कोणती मूल्ये आवश्यक आहे, त्या मूल्यांचा परिपोष करण्याचे सामर्थ्य इतिहास विषयात आहे. सर्वांसाठी जगणे, देशासाठी जगणे व राष्ट्रप्रेम राखणे ह्या शालेय मूल्यांसाठी अभ्यासक्रमातून राष्ट्रीय मूल्यांचा विकास इतिहास विषयातून सशक्तपणे होतो.

अशाप्रकारे इतिहास विषयाचे महत्त्वाचे स्थान आहे.

**♦ इतिहासाचे शालेय अभ्यासक्रमातील महत्त्व :**

इतिहास विषयाचे शालेय अभ्यासक्रमातील महत्त्व पुढीलप्रमाणे दर्शविता येईल.

**१) सर्व विषयाशी संबंध :**

इतिहास हा एकांगी विषय नाही तर त्याचा सर्व विषयाशी समन्वय आहे. इतिहास हे सामाजिक शास्त्र आहे. त्याचा इतर सामाजिक शास्त्रातील विषय जसे राज्यशास्त्र, नागरिकशास्त्र, भूगोल, अर्थशास्त्र, समाजशास्त्राशी सुध्दा समन्वय आहे. यासोबतच मानसशास्त्र, शिल्पकला, संगीत, भाषा, विज्ञान, गणित व इतर सर्व विषयांशी संबंध येतोच.

डॉ. ट्रिव्हेलियनच्या मते – इतिहास हा विषय नसून सर्व विषयांनी राहण्याचे निवास स्थान आहे.

**२) राष्ट्रीय मूल्यांचा परिपोष :**

देशाच्या गौरवशाली इतिहासाची माहिती इतिहासातून होते. राष्ट्रप्रेम, राष्ट्रीय एकात्मता यासारख्या राष्ट्रीय मूल्यांचा परिपोष करण्यासाठी इतिहास विषय महत्त्वाचा ठरतो.

**३) देशाच्या विकासासाठी :**

गतकाळात देशाची परिस्थिती काय होती, वर्तमानात काय आहे व देशाचा सुवर्णकाळ कसा येईल यासंबंधी प्रत्येक राष्ट्र योजना आखतो. त्यानुसार शिक्षणपध्दती ठरविण्यात येते. शिक्षणाची उद्दिष्टे ठरविली जातात. त्याअनुषंगाने देशाच्या विकासासाठी सुजाण नागरिक निर्मिती करण्याचे सामर्थ्य इतिहास विषयात आहे. देशाच्या विकासासाठी भूतकालीन घटनांचा आधार महत्त्वाचा ठरतो. या अनुषंगाने इतिहास विषय देशाच्या विकासासाठी महत्त्वपूर्ण ठरतो.

**४) स्वत:च्या विकासासाठी :**

इतिहास विषयाच्या अध्ययनाने विद्यार्थ्यांना ज्ञान प्राप्ती होते. बौध्दिक क्षमतेसह मानसिक शक्तींचा विकास होतो. तर्कशुध्दता चिकित्सकपणे विचार करण्याची वृत्ती वाढते. यासोबतच मनोरंजन, आनंद मिळतो, भावनात्मक विकास सुध्दा होते. अशाप्रकारे व्यक्तीच्या स्वत:च्या विकासासाठी इतिहास विषय सहाय्यभूत ठरतो. या हेतूने विद्यार्थ्यांच्या बौध्दिक, भावनिक, सामाजिक विकासासाठी इतिहास विषयाचे अनन्यसाधारण महत्त्व आहे.

**५) संशोधनासाठी प्रोत्साहित करण्याच्या दृष्टीने :**

इतिहासात घडलेल्या घटनांचा, स्थळांचा, महत्त्वाच्या व्यक्तींचा अभ्यास केला जातो. त्यासाठी विविध साधनांचा परामर्श घेतला जातो. त्या साधनांबाबत शोध घेणे, आणखी पुरावे सापडतात काय, नवनवीन साधने मिळतील काय, जुन्या साधनांचे जतन कसे करता येईल, तत्कालिन घटनांचे पुन्हा पुन्हा संशोधन करणे. साधनांची

सत्यता पडताळणे अशा विविध बाबींनी विचार केल्यास इतिहास संशोधनासाठी चालना देतो. अर्थात विद्यार्थ्यांमध्ये संशोधनासाठी प्रेरणा देण्याच्या दृष्टीने इतिहासाचे महत्त्व आहे.

वरील विवेचनातून इतिहासाचे शालेय अभ्यासक्रमात महत्त्वाचे स्थान असून देशाच्या हिताच्या दृष्टीने इतिहासाचे महत्त्व अनन्य साधारण आहे.

*****

# प्रकरण - ४

## इतिहास व अन्य विषय सहसंबंध

ज्ञानरुपी वटवृक्षाच्या शाखा म्हणजे विविध विषय. शालेय अभ्यासक्रमात विविध विषय समाविष्ट असतात. प्रत्येक विषयाचा अन्य विषयाशी कुठे न कुठे, थोडा ना थोडा संबंध असतो. प्रत्येक विषयाचा इतर विषयांशी संबंध असतो. कोणताही विषय स्वतंत्र किंवा एकांगी नसतो. विविध विषयांच्या या संबंधाला सहसंबंध किंवा समवाय म्हणतात.

शिक्षणामध्ये सहसंबंध ही संकल्पना सर्वप्रथम **हरबर्ट** ने वापरली.

♦ **विषय सहसंबंधाचा उद्देश :**

१) विषयाच्या सहसंबंधामुळे वेळ व परिश्रमाची बचत होते.

२) विषयाच्या सहसंबंधामुळे एका विषयातील ज्ञानाचा फायदा दुसऱ्या विषयात होतो.

३) प्राप्त ज्ञानाचे उपयोजन करता येते.

४) सहसंबंधामुळे सामाजिक विकास होतो.

५) सहसंबंधामुळे पाठ्यक्रम सुलभ करणे.

६) परस्परसंबंधामुळे सामंजस्यात वाढ होते.

♦ **विषय सहसंबंधाचे फायदे :**

१) कमी वेळ व कमी परिश्रमात जास्त ज्ञान देता येते.

२) अध्ययनाचे संक्रमण होते.

३) एका विषयातील प्राप्त ज्ञानाचे दुसऱ्या विषयात उपयोजन करता येते.



४) अध्ययन व अध्यापन सुलभ होते.

५) ज्ञानात अखंडता निर्माण होते.

६) शिक्षण रोचक व सुलभ होते.

अशाप्रकारे विषयाच्या सहसंबंधामुळे एक विषय दुसऱ्या विषयाशी जोडता येते. इतिहास हे सामाजिक शास्त्र असल्यामुळे त्याचा इतर सामाजिक शास्त्र जसे नागरिकशास्त्र, प्रशासन, राज्यशास्त्र, भूगोल, अर्थशास्त्र या विषयांशी संबंध आहे. यासोबतच मानसशास्त्र, गणित, विज्ञान, कला, भाषा विषयांशी सुध्दा इतिहासाचा खूप जवळचा संबंध आहे.

**समवाय हा दोन प्रकारचा असतो.**

१) दैनंदिन जीवन -

२) इतर विषय -

**१) दैनंदिन जीवन व इतिहासाचा सहसंबंध :**

दैनंदिन जीवनात इतिहासाचा फार जवळचा सहसंबंध आहे. मनुष्य हा सामाजिक प्राणी आहे. मानवी जीवनात कुटूंबाला महत्त्वाचे स्थान आहे. कुटूंबात वडीलधाऱ्यांचा मान ठेवणे, संबंधित कर्तव्यांचे पालन करणे, प्रत्येक सदस्यांची कार्य शैली, कुटूंबाच्या परंपरा, सण, उत्सव, जीवनशैली ह्या त्या कुटूंबाच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीनुसार वर्तमानात प्रतिबिंबित होतात. अर्थात इतिहासाचा परिणाम कुटूंब पध्दतीवर होतो. त्यानुसार कुटूंबातील व्यवहार प्रभावित होतात.

कुटूंबाच्या दृष्टीने विचार केल्यास बाळाच्या गर्भसंस्कारापासून परंपरा, रुढी, चालीरीती प्रत्येक कुटूंबाचा अविभाज्य हिस्सा असतो. त्याअनुषंगाने प्रत्येक देशातील प्रत्येक भागातील वेगवेगळ्या चालीरिती असतात. त्यामागे पूर्वइतिहास असतो. गर्भसंस्काराचा सुध्दा इतिहास असतो. चांगले संस्कार व्हावेत यासाठी

काळजी घेतली जाते. बाळाच्या जन्मानंतर वेगवेगळे संस्कार केले जातात. वेगवेगळया धर्म व समाजानुसार ते वेगवेगळे असू शकतात. कुटूंबात बालकावर चांगले संस्कार व्हावेत याबाबत काळजी घेतली जाते. बालपणापासूनच कुटूंबातून ही काळजी घेतली जाते. त्याकरीता इतिहास खूप उपयोगी ठरतो.

शालेय शिक्षणातून विद्यार्थ्यांवर इतिहास विषयाच्या माध्यमातून संस्कार होतात. कुटूंबात त्याचे प्रतिबिंब तो शोधत असतो. मोठे प्रौढ व्यक्ती यांना कथा, गोष्टीसह कीर्तन, प्रवचन याची आवड असते. याद्वारे प्राचीन थोरपुरुषांची गाथा, आख्यायिका, संत चरित्रे इत्यादीद्वारे प्रौढ व्यक्तींद्वारे मुलांवर कौटुंबिक संस्कार करतात.

पोशाखातूनही इतिहासाचा दैनंदिन जीवनाशी संबंध येतो. पैठणीसाडी, कांजीवरम साडी, बंगाली कुर्ता, रेशीम कापड अशा अनेक माध्यमांनी दैनंदिन जीवनाशी इतिहासाचा समवाय दिसून येतो.

आर्थिक व्यवहार करतांना पूर्वीची वस्तू-विनिमय पध्दती, विविध शासकांच्या कालावधीत वेगवेगळी नाणी चलनात आली. आजी आजोबांच्या काळातील पैश्याचे रुप आज बदललेले आहे. नाणी कशी होती याबाबतचा इतिहासही दैनंदिन जीवनात सार्थ ठरतो.

आपण ज्या ठिकाणी राहतो त्या समाजातील कला, लोकगीत, लोकसंगीत यांना इतिहास असतो. त्याअनुषंगाने परंपरा, श्रध्दा, मूल्ये इत्यादी बाबत दैनंदिन जीवनाशी संबंध येतो.

सहल व पर्यटन यांच्या माध्यमातून विविध स्थळी भेटी देतो. त्या ठिकाणचे कौटुंबिक जीवन, लोकजीवन, परंपरा, श्रध्दा व आपल्या

जीवनाशी काय फरक आहे ह्याबाबत माहिती कळते. जीवनशैली, आहार

याबाबत त्या ठिकाणचा इतिहास व आपल्या भागाकडील असणारा फरक कळतो.

अशाप्रकारे इतिहासाचा संबंध आपल्या व्यावहारिक जीवनाशी क्षणोक्षणी असतो.

**♦ इतर विषयांशी सहसंबंध -**

**अ) इतिहास व भूगोल :**

इतिहास व भूगोल दोन्ही सामाजिक शास्त्राचे विषय आहेत. इतिहासाशी सर्वात जवळचा असणारा विषय म्हणजे भूगोल. इतिहासाचा डोळा भूगोल आहे असे म्हटले जाते. इतिहास व भूगोलाच्या विविध घटक साम्यतेने सहसंबंध प्रस्थापित झालेला आहे.

इतिहासातील घडलेल्या घटनांच्या कारणांमध्ये भौगोलिक परिस्थिती महत्त्वपूर्ण ठरलेली आहे. इतिहासात स्थळ, काळानुसार घडलेल्या घटनांचा अभ्यास करतांना भूगोलातील भौगोलिक घटकांचा अभ्यास करावाच लागतो.

इतिहासात एखादी घटना घडली असेल तर त्याची पार्श्वभूमी भूगोलात सापडते. शिवाजी महाराजांच्या गनिमी कावा तंत्र युध्दामागे त्या प्रदेशातील भौगोलिक परिस्थिती कारणीभूत ठरलेली होती. मराठयांना पानीपत युध्दात आलेले अपयश, युरोपातील औद्योगिक क्रांती, बाजारपेठांचा शोध, नवनवीन बाजारपेठाच्या शोधातून वसाहतवाद जन्मास आला इत्यादी अनेक घटनांमागे भौगोलिक परिस्थिती कारणीभूत ठरलेली आहे.

नदीच्या काठी विविध संस्कृतीचा उदय झाला. तत्कालिन भौगोलिक परिस्थितीचा परिणाम भांडी, नाणी, घरांची रचना यावर झाला.

यासोबतच लोकजीवन, जीवनशैली, खानपानच्या सवयी यामागील इतिहासाचा शोध घेतला तर मूळ कारण भूगोलात सापडते. विविध घटनांमागील अपयशाची कारणेसुध्दा भूगोलात सापडतात. नेपाळच्या पर्वतीय प्रदेशामुळे इंग्रजांना तो जिंकता आला नाही. नेपोलियनला ब्रिटन जिंकण्यात आलेला अपयश.

मानवी प्रगतीचा इतिहास बघितल्यास भौगोलिक स्थितीचा उचित उपयोग झालेला दिसून येतो. ज्या ठिकाणी शेती उत्पन्न, कारखाने, खनिज संपत्ती, मुबलक प्रमाणात असते त्याठिकाणी, वाहतूक, रेल्वे, दळणवळण सोयी, वीजगृह इतर सोयी त्वरीत पोहोचतात.

अशाप्रकारे इतिहास व भूगोलाचा सहसंबंध आहे.

**ब) इतिहास व नागरिकशास्त्र :**

इतिहास व नागरिकशास्त्र दोन्ही सामाजिक शास्त्रे आहेत. इतिहासातून आपल्याला मानवी उत्क्रांती, सामाजिक जीवन, आर्थिक परिस्थिती, लोकजीवन, कला, संगीत, सांस्कृतिक व ऐतिहासिक परिस्थिती त्यानुसार विविध कालखंडात काय परिस्थिती होती याबाबत माहिती मिळते. नागरिक शास्त्रातून राष्ट्र व समाजाकरीता आदर्श नागरिक कसे घडवावेत हे अपेक्षित असते. या दोन्ही शास्त्राचा जवळचा सहसंबंध आहे. दोन्ही शास्त्राचा उद्देश आदर्श नागरिक निर्माण करणे आहे.

जीवन मूल्ये अंगीकारणे व पालन करणे, वारसांचे जतन करण्याचे ज्ञान नागरिकशास्त्रातून मिळते. इतिहासाच्या अभ्यासातून तत्कालिन राजकीय परिस्थिती कशी होती, शासन कसे होते याची माहिती मिळते. शासक व शासित यांचे संबंधाचे ज्ञान मिळते तर नागरिकशास्त्रातून शासकांचे अधिकार व कर्तव्ये, जनतेचे अधिकार व

कर्तव्यांची माहिती मिळते. पूर्वीची शासनव्यवस्था व आजची शासन व्यवस्थाबाबत नागरिकशास्त्रात तुलना करता येते. उत्तम शासन ठरवता येते.

भारतातील इंग्रजकालीन महसूलपध्दती, पोलिस व्यवस्था, खेडेगांवातील प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास इतिहासातून करता येतो. नागरिकशास्त्रात आजच्या महसूल पध्दती, पोलिसव्यवस्था सध्याची खेडेगावातील प्रशासन याबाबतची माहिती नागरिकशास्त्रातून मिळते. तात्पर्य काही कौटुंबिक मूल्ये, सामाजिक मूल्ये, सांस्कृतिक मूल्यांची माहिती इतिहासातून मिळते तर त्याबाबतचे प्रत्यक्ष अनुपालन नागरिकशास्त्रातून होते.

अशाप्रकारे इतिहास व नागरिकशास्त्र यांचा संबंध आहे.

**क) इतिहास व समाजशास्त्र :**

मनुष्य हा सामाजिक प्राणी आहे. तो समाजाशिवाय जगू शकत नाही. समाजशास्त्र म्हणजे मानवी सामाजिक संबंधाच्या जाळयांचा अभ्यास होय. समाजशास्त्रात मानवी समुह, सामाजिक संस्था, सामाजिक जीवन, रुढी परंपरा, सामाजिक परिवर्तन इत्यादींचा अभ्यास केला जातो. त्याअनुषंगाने समाजशास्त्रातील अभ्यास घटकांचा इतिहासाशी जवळचा संबंध दिसून येतो.

इतिहासात घडलेल्या घटना ह्या मानव केंद्रस्थानी आहेत. त्या अनुषंगाने समाजशास्त्राचा अभ्यासाविषय मानव व समाजच आहे. दोन्ही शास्त्रे ही सामाजिक शास्त्रांअंतर्गत समाविष्ट आहेत. समाजशास्त्रात मनुष्य सामाजिक जीवन जगतांना विविध सामाजिक संस्थांशी संबंध येतो. कुटूंब संस्था, समुदाय, विवाहसंस्था इत्यादी संस्था, त्यामध्ये

काळानुरुप झालेला बदल, पूर्वी एकत्र असणारी कुटूंब व्यवस्था आता विभक्त कुटूंबात परावर्तीत झालेली आहे. पूर्वी गावात बारा बलुतेदार, वस्तुविनिमय असणारी पध्दती आता रोख विनिमयात रुपांतरीत झालेली आहे. पूर्वी विवाहदरम्यान असणाऱ्या परंपरा, वेगवेगळया समुदायाची विवाह पध्दती इत्यादींचा अभ्यास समाजशास्त्रात केला जातो. पूर्वी असणाऱ्या श्रध्दा, मूल्ये, सांस्कृतिक बाबी या सर्वांचा समाजशास्त्रात समावेश होतो. हे समाजशास्त्राचे अभ्यास घटक आहेत. इतिहासात पूर्वी काय होते व त्यामध्ये काय बदल झाला याचा अभ्यास केला जातो. समाजातील अभ्यास घटकांचा इतिहास हा इतिहास विषयाचा अभ्यास घटक ठरतो.

आधुनिकीकरण, जागतिकीकरण, त्यांची कारणे इत्यादी घटकांचा अभ्यास इतिहासात केला जातो. तर त्यामुळे सामाजिक संस्था, कुटूंबपध्दती, जीवनपध्दतीत फार मोठा बदल झालेला आहे, याबाबतचा अभ्यास समाजशास्त्रात केला जातो.

अशाप्रकारे इतिहास व समाजशास्त्राचा सहसंबंध दिसून येतो.

**ड) इतिहास व मानसशास्त्र :**

इतिहासात मानवाशी संबंधित घटना, त्यांचा परिणाम यांचा अभ्यास केला जातो. यासोबतच व्यक्तींची चरित्रे, त्यांची कार्ये सुध्दा अभ्यासली जातात. त्यांच्या कार्यांमुळे जगाला प्रेरणा मिळत असते. महात्मा गांधी, डॉ.बाबासाहेब आंबेडकर, सरदार पटेल, महात्मा फुले, सावित्रीबाई फुले यांच्या सारख्या थोर विभुतीमुळे जगाला नवीन विचार व प्रेरणा मिळते. यासोबत काही व्यक्तींच्या कार्यामुळे जगाला विनाश व

विपरित परिणामांची झळ सुध्दा पोहोचली आहे. तात्पर्य मानवी भावना

वृत्ती, प्रवृत्ती, विचारधारा आदींचा परिणाम इतिहासात पाहावयास मिळालेला आहे.

मानसशास्त्रात मानवी मन, भावना, प्रवृत्ती व वृत्ती आदींचा सखोल अभ्यास केला जातो. मानसशास्त्रीय दृष्टीकोनातून अभ्यास करतांना अनुषंगाने झालेल्या वर्तनाचा सुध्दा सखोलपणे चिकित्सक अभ्यास केला जातो. मानसशास्त्रात मानवी मन, भावना यांचा वर्तनाशी संबंध आहे. तसाच तो इतिहासात सुध्दा आहे. विशिष्ट परिस्थिती असतांना मानवाचे वर्तन काय  असते याचा अभ्यास, भोवतालच्या परिस्थितीचा होणारा परिणाम, मानवाची जडणघडण इत्यादी बाबींचा अभ्यास मानसशास्त्र करते तर त्यानुषंगाने झालेल्या परिणामांची नोंद इतिहास घेत असतो.

मानसशास्त्रात मनोवृत्तीचा, व्यक्तिभेदाचा अभ्यास केला जातो तर त्यानुसार राजकीय, सामाजिक परिणामांचा अभ्यास इतिहासात केला जातो.

अशाप्रकारे इतिहास व मानसशास्त्र यांचा सहसंबंध आहे.

### ♦ इतिहासाचा इतर विषयाशी सहसंबंध:

### १) गणित व इतिहास :

गणित हा दैनंदिन जीवनाशी निगडित असणारा विषय आहे. इतिहास सुध्दा दैनंदिन जीवनात संबंध असणारा विषय आहे. संबंधित घटना कोणत्या कालखंडात घडली, लढाईत किती सैन्य होते, यासोबत इतिहास विषयातील संशोधनात सांख्यिकी तंत्राचा वापर करतांना गणित विषयाचा फार उपयोग होतो. गणित विषयाचा इतिहास विषयाला स्पर्श

आहे. गणितातील विविध सिध्दांतामागील इतिहास, संख्यांचे शोध, स्थान इत्यादी बाबत इतिहास उपयोगी ठरते.

गणित व इतिहास सहसंबंध जवळचा आहे हे दिसून येते.

**२) इतिहास व शास्त्र (विज्ञान) :**

आदिकाळापासून ग्रह, तारे, सूर्य, सूर्यमाला, जैविक, अजैविक घटक यांची निर्मिती, त्यानुषंगाने विविध शोध, या सोबत जंगल, गुहेत राहणारा मानव चंद्रावर जाऊन पोहोचला. पायी व तारकाद्वारे प्रवास करणारा व्यक्ती ते अंतराळयान तयार करण्याइतपत प्रगती केली. या सर्वांचे अध्ययन करतांना विज्ञानाचा उपयोग होतो. विविध घटकांचा अभ्यास करतांना त्या शोधाची पार्श्वभूमी, इतिहास पाहणे उपयुक्त ठरते म्हणजे शास्त्राचा इतिहासाशी सहसंबंध येतो.

याप्रमाणे इतिहास विशेषत: संशोधन करतांना प्राप्त स्त्रोतांची तपासणी करतांना जसे नाणी, ताम्रपट, लेखी साधने, पुराव्यांचा अभ्यास करतांना ती खरी आहे काय हे तपासणी करतांना विज्ञानाचा उपयोग होतो त्यासाठी विविध रसायनांचा वापर करतात. अशाप्रकारे इतिहासात विज्ञानाचा उपयोग होतो.

शास्त्र (विज्ञान) व इतिहास यांचा फार जवळचा सहसंबंध आहे.

याखेरीज इतिहासाचा अर्थशास्त्र, साहित्य, कला, नीतिशास्त्र या विषयांशी सहसंबंध आहे.

# प्रकरण - ५

## इतिहास अध्यापनाची उद्दिष्टे

विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास घडविणारे सशक्त साधन म्हणजे शिक्षण. शिक्षणातून विद्यार्थ्यांचा भावनिक शारीरिक, मानसिक व बौध्दिक विकास घडत असतो. शिक्षणामधून देशासाठी, समाजासाठी सुजाण नागरिकांची निर्मिती होत असते. विद्यार्थ्यांमध्ये वैयक्तिक व सामाजिक मूल्यांचे संस्कार करणे फार महत्त्वाचे ठरते. भावी पिढी मूल्यवर्धित असावी यासोबत देशभक्ती, राष्ट्रभावना आदींच्या दृष्टीकोनातून इतिहासाचे अध्ययन करणे, विद्यार्थ्यांना अगत्याचे ठरते. या बाबतीत इतिहास अध्यापनाची भूमिका महत्त्वाची ठरते.

**♦ इतिहास अध्यापनाचे हेतू -**

**१) ज्ञान प्राप्ती करणे :**

कोणत्याही विषयाचा मुख्य हेतू ज्ञान मिळवणे हाच असतो. इतिहासातून विद्यार्थ्यांना ज्ञान मिळावे, आपल्या देशाच्या इतिहासातून गौरवशाली परंपरा, मान, सन्मान, त्याचे वैभव इत्यादी बाबतीत माहिती देणे हा इतिहास अध्यापनाचा मुख्य हेतू होय.

इतिहास अध्यापनातून विद्यार्थ्यांना भूतकाळात मानव कसा होता, राहणीमान, आर्थिक व्यवस्था, सामाजिक व्यवस्था कशी होती. रानटी अवस्थेतून उत्क्रांती होत, नवनवीन शोध लावत, औद्योगिक क्रांती करुन पुढे कसा गेला. त्या काळात घडलेल्या घटना, त्यांचा परिणाम, आधुनिक जगातील प्रत्येक देशातील परंपरा व आधुनिक जगात उगम पावलेले वसाहतवाद, लष्करस्पर्धा, त्यामधून झालेले महायुध्द इत्यादी सर्वांचा झालेला परिणाम. नवीन काळात शांततेचे महत्त्व, त्यानुषंगाने

कार्य करीत असलेल्या आंतरराष्ट्रीय संघटनांची माहिती इत्यादी माहिती मिळवणे. भारताच्या बाबतीत सिंधू संस्कृती, गुप्त घराणे, मौर्य घराणे, धर्मजागृती, प्राचीन संस्कृती, गौरवशाली परंपरा, आधुनिक काळात जगात भारताचे महत्त्व यासोबत सर्व घडलेल्या घटनांची माहिती प्राप्त करणे इतिहासाच्या अध्यापनातून शक्य होते.

ज्ञान मिळवणे हा इतिहास अध्यापनाचा मुख्य हेतू आहे.

**२) ज्ञानाचे उपयोजन :**

प्रत्येक विषयातून ज्ञान प्राप्त होते. ते ज्ञान साठवून ठेवता येते. इतिहासातून विविध घटनांचा अभ्यास करता येते. इतिहासात केवळ घटनाच नव्हे तर व्यक्ती चरित्राचे सुध्दा अध्ययन केले जाते. इतिहासात आधुनिक काळातील गरजा व घटित होणाऱ्या घटना, त्यांच्या परिणामांचा ही परामर्श घेतला जातो. प्राप्त झालेल्या ज्ञानाचा वापर झाला नाही तर ते ज्ञान कवडीशून्य ठरते. विशिष्ट परिस्थितीत ते ज्ञान उपयोगात कसे आणावे हा इतिहास अध्यापनाचा मुख्य हेतू आहे.

नागरिकांचे अधिकार व कर्तव्यांबाबत ज्ञान प्राप्ती करुन ज्ञान कागदोपत्रीच न राहता नागरिकांनी व्यवहारात अधिकार वापरावेत. त्यासोबत प्रत्यक्षात कर्तव्य निर्वाहन ही करावे. देशभक्तीपर गीताने संचारलेली देशभक्ती ही दंगल शांत करण्यात वापरावी तेव्हा ते ज्ञान प्राप्ती सिध्द ठरते.

अर्थात प्राप्त ज्ञानाचे उपयोजन कसे करावे, कोणत्या परिस्थितीत करावे हा हेतू इतिहास अध्यापनाचा ठरतो.

**३) चिकित्सक प्रवृत्तीचा विकास :**

इ. एच. कार च्या मते, "इतिहास हा वर्तमान काळ व भूतकाळ  यांच्यातील कधीही न संपणारा संवाद आहे." त्यानुषंगाने हा संवाद कसा

झाला? वर्तमानकाळातील कोणत्या घटनांची पार्श्वभूमी भूतकाळात आहे, भूतकाळातील महत्त्वाच्या घटना कोणत्या, त्यामागील कारणे काय, त्याचा प्रभाव काय झाला, परिणाम असेच का, हे का घडले इत्यादी सर्व माहिती जाणून घेण्याच्या प्रवृत्तीचा विकास करणे म्हणजेच इतिहास अध्यापनाचा हेतू होय.

पहिल्या महायुध्दातील घटनांची कारणे व त्या महायुध्दामुळे व्दितीय महायुध्द कसे घडले, प्रथम महायुध्दानंतरही जग दुसऱ्या महायुध्दाच्या गर्तेत का उतरले ? या सर्व बाबींसाठी चिकित्सक प्रवृत्ती असणे गरजेचे आहे.

इतिहासाच्या अध्यापनातून ह्या चिकित्सक प्रवृत्तीत वाढ होते.

**४) तार्किक दृष्टीचा विकास :**

कोणत्याही गोष्टीची सखोल मीमांसा करणे गरजेचे असते. घडलेल्या घटनांना वरकरणी पाहणे कधीही योग्य नाही. घटनांच्या कार्यकारणभाव, त्यामागील आधार सामुग्री याबाबत सर्वांचेच यथोचित अध्ययन करणे गरजेचे आहे. इतिहासाच्या अध्ययनातून मर्मदृष्टी विकसित होते. १८५७ च्या उठावा मागील कारणे व त्यासंबंधी सैनिकांचा उठाव, त्यानुषंगाने नियोजनबध्दतेचा अभाव इत्यादी घटनांचा सांगोपांग विचार केल्यानंतरच त्या उठावाचे यश किंवा अपयश ठरविता येणार.

इतिहास अध्यापनातून तार्किक दृष्टीचा विकास करणे हेतू साध्य होतो.

**५) सामंजस्याचा विकास :**

भारत हा विविधतापूर्ण असलेला देश आहे. भारत हा भाषा,

धर्म, रिती-रिवाज, भौगोलिक, सांस्कृतिक, आर्थिक इत्यादी सर्व बाबतीत

विविधता असलेला देश आहे. असे असले तरी सर्व धर्म, प्रांतीय, भाषिक लोक एकतेच्या भावनेने राहतात हेच इतिहासाचे गमक आहे. विविधता असली तरी सर्व धर्मांचा आदर, सर्व धर्मसमभाव, जातिभेद न मानता ऐक्याने राहणे, देशासाठी सर्व एक होणे ह्या भावना वृध्दिंगत करण्यास इतिहासाचा खूप मोठा हातभार आहे. देशात दंगली घडू नयेत, हिंसाचार होवू नये यादृष्टीने राष्ट्रभक्ती, राष्ट्रप्रेम, एकात्मता मूल्यांचे संवर्धन करण्यासाठी, सामंजस्याची भावना निर्माण होण्यासाठी इतिहासाच्या अध्यापनाची गरज आहे.

विद्यार्थ्यांत सामंजस्य वृत्तीचा विकास करणे इतिहासाच्या अध्यापनाचा हेतू आहे.

**६) अभिरुची विकसन :**

'व्यक्ती तितक्या प्रकृती' या म्हणीनुसार प्रत्येकाच्या आवडी निवडी ह्या वेगवेगळया आहेत. अभिरुची म्हणजे आवड. अभिरुची निर्माण झाली की कोणताही विद्यार्थी ते कार्य आनंदाने करतो. त्याच अनुषंगाने अभिरुची निर्मिती करण्याचा मुख्य हेतू इतिहास अध्यापनाचा आहे. भारताला लाभलेल्या गौरवशाली इतिहासाची माहिती देवून आवश्यक समाजगुण भावी पीढीत रुपांतर करण्यासाठी अभिरुची निर्माण करणे गरजेचे असते.

इतिहास अध्यापनातून विद्यार्थ्यांना इतिहास अध्ययनाची अभिरुची निर्माण करणे, रसास्वादन करणे, अर्थग्रहण करणे, ह्या बाबी हेतुपूर्वक साध्य करण्यासाठी महत्त्वाच्या ठरतात.

**७) कौशल्यप्राप्ती :**

ज्ञानाची प्राप्ती करतांना आजच्या शिक्षण पध्दतीत प्रात्यक्षिक,

प्रत्यक्ष अनुभवास खूप महत्त्व आले आहे. त्यानुषंगाने कौशल्य प्राप्ती

करणे गरजेचे ठरते. विद्यार्थी स्वभावत:च कृतीप्रिय असतात त्यांना कृतीयुक्त गोष्टी आवडतात.

कोणत्याही घटनेचे नाटयीकरण केल्यास त्यांना ती आवडेल. सोबत त्या घटनेचे आकलन त्वरित होईल. विद्यार्थ्यांना किल्ले, गड यांच्या प्रतिकृती बनविण्यास सांगितल्यावर ते आनंदाने करतात. अर्थात ज्ञानाला कृतीची जोड देणे आजच्या शिक्षण व्यवस्थेत गरजेचे ठरलेले आहे.

महात्मा फुले चरित्र अभ्यासतांना तत्कालिन संदर्भ, त्यांची पुस्तके, परदेशी व देशी साहित्यिकांची पुस्तके, यासोबत संग्रहालयाला भेट, त्यांच्या जन्म ठिकाणी भेट इत्यादी कृतीयुक्ततेची उदाहरणे ठरतील.

तात्पर्य विद्यार्थ्यांमध्ये कौशल्यप्राप्ती व विकास करणे इतिहास अध्यापनाचा हेतू आहे.

**८) अभिवृत्ती निर्मिती व विकास :**

कोणत्याही बाबतीत अभिवृत्ती निर्मिती करणे हे कसोशीचे कार्य आहे. विद्यार्थ्यांमध्ये इतिहास अध्ययनाबाबत अभिवृत्ती निर्मिती करणे हे एका दिवसाचे कार्य नाही तर त्यासाठी अध्यापनाचे कौशल्य पणास लावावे लागते.

भारतीय प्राचीन संस्कृतीचा इतिहासातील विविध उदाहरणे व दाखले प्रस्तुत करणे, भारतीय विविधतेची व त्यामधून साधलेली ऐक्यता याबाबत माहिती देणे. युद्ध, महापूर, दुष्काळ याप्रसंगी भारतातील जनतेने दाखविलेली संवेदनशीलता, मदत करण्याची प्रवृत्ती, एकता अशा विविध उदाहरणांवरुन अभिवृत्तीचे दर्शन होते. भारतीय स्वातंत्र्य लढयात

सहभागी झालेले विद्यार्थी दशेतील युवक, थोर क्रांतिकारक, समाजसुधारक, थोर महात्मे व त्यांची कार्ये. देशाला स्वातंत्र्य प्राप्ती व स्वातंत्र्य प्राप्ती नंतरची आलेली संकटे. जसे पाकिस्तान व चीनसोबतचे युध्द या युध्दात भारताची कामगिरी. आधुनिक काळातील आव्हाने, भारताचे सामर्थ्य या सर्व बाबी विद्यार्थ्यांना वारंवार विविध उदाहरणाद्वारे स्पष्ट करुन मनवार प्रतिबिंबित केल्यास विद्यार्थ्यांची इतिहासाबाबत अभिवृत्ती वाढते व विकास होतो.

इतिहास अध्यापनातून अभिवृत्तीची निर्मिती व त्याचा विकास करणे महत्त्वाचा हेतू आहे.

**९) मर्मदृष्टीचा विकास :**

कोणत्याही बाबीचे सखोल अध्ययन करुन त्याच्या अंतर्गत श्रृंखलेची मालिका जोडणे, घटनेचा परिणाम, प्रभाव व कारणे यांची मालिका जोडण्यासारख्या सखोल बाबींचे अध्ययन करण्याची मर्मदृष्टी इतिहासाच्या अध्यापनातून प्राप्त होते. अशा मर्मदृष्टींच्या विकासामुळे जीवनातील सर्व बाबींचा सूक्ष्म, सखोल व व्यापक अभ्यास करण्याची प्रवृत्तीचा विकास होतो.

हाच इतिहास अध्यापनाचा मुख्य हेतू आहे.

**♦ माध्यमिक स्तरावरील इतिहास अध्यापनाची उद्दिष्टे :**

देशाचा विकास करण्याचे सक्षम माध्यम म्हणजे शिक्षण. विद्यार्थ्यांच्या विकासाचे साधन म्हणजे शिक्षण. शिक्षणाद्वारे विहीत उद्दिष्टे साध्य करुन देशाला आवश्यक असणारे गुणवैशिष्टयांनी पूर्ण असणारे मानवी संसाधन निर्मिती होते. विद्यार्थ्यांच्या माध्यमातून भावी पिढीला आकारित करण्याचे माध्यम म्हणजे शिक्षण. यामध्ये माध्यमिक

स्तरावरील विद्यार्थ्यांची भूमिका फार महत्त्वाची ठरते. देशहितासाठी आवश्यक गुणांचा परिपोष करण्यासाठी माध्यमिक स्तरावरील शिक्षणाची भूमिका महत्त्वाची ठरलेली आहे. यामध्ये इतिहास विषयाची महत्त्वाची भूमिका असल्यामुळे माध्यमिक स्तरावरुन दिलेल्या बाबी ह्या आयुष्यभरासाठी परिपूर्ण ठरतात. त्यानुषंगाने भारत देशाच्या दृष्टीने माध्यमिक स्तरावरील पुढीलप्रमाणे उद्दिष्टे ठरतात.

**अ) देशाच्या गौरवशाली इतिहासाची माहिती करुन देणे.**

आपल्या देशाच्या गौरवशाली इतिहासाची माहिती करुन देणे हे प्रथम महत्त्वाचे उद्दिष्ट ठरते. भारत देशाला संताचा वारसा प्राप्त झालेला आहे. संत नामदेव, संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम, अर्जुनसिंग, तामिळ संतांची गौरवशाली परंपरा या देशाला लाभलेली आहे. याबाबत स्त्रियांचे सुध्दा योगदान लाभलेले आहे. संत मुक्ताबाई, जनाबाई, मीराबाई, यासारख्या स्त्रियांची परंपरासुध्दा आहे.

भारताच्या गौरवशाली इतिहासाचा परिचय विद्यार्थ्यांना झाला पाहिजे. भारतीय संस्कृती ही प्राचीन संस्कृतीपैकी एक आहे. हडप्पा, सिंधु संस्कृती सारखी प्राचीन व विकसित संस्कृती होती. याबाबत गौरव असणे आवश्यक आहे.

देशाच्या स्वातंत्र्याचा इतिहासाची परंपरा तर गौरवशालीच ठरते. इंग्रजी सत्ता उलथून टाकण्यासाठी १८५७ च्या उठावानंतर सुरु झालेली स्वातंत्र्य चळवळ चंद्रशेखर आझाद, भगतसिंग, राजगुरु, नेताजी सुभाषचंद्र बोस, सुखदेव यांचे सारखे थोर क्रांतिकारकांचे कार्य, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, सरदार पटेल, पंडित जवाहरलाल नेहरु यांचेसारखे महान व्यक्तींचे कार्य व

योगदान अतुलनीय आहे. भारतीय प्राचीन संस्कृती येथील हिंदू धर्माची तात्त्विक बैठक, प्राचीन आयुर्वेद व विज्ञान याबाबत जगात गौरव होतो.

सामाजिक धर्मसुधारणेसाठी निर्माण झालेले जैन धर्म, शीख धर्म व बौध्द धर्म हे जगास मार्गदर्शक ठरलेले आहेत. समाजसुधारकांनी भारतभूमी ओतप्रोत भरलेली आहे. राजा राममोहन रॉय, महात्मा फुले, डॉ. आंबेडकर, महात्मा गांधी, डॉ. कर्वे, आगरकर यांचेसारखे समाजसुधारकांनी दिलेले योगदान महत्त्वपूर्ण ठरते. भारतीय शिक्षण पध्दती, गुरुकुल पध्दती जगाला आदर्श आहे.

अशाप्रकारे भारताच्या गौरवशाली इतिहासाची माहिती करुन देणे. त्याअनुषंगाने विद्यार्थ्यांचे विचार व आचार देशहितासाठी विधायक व्हावे हे मुख्य उद्दिष्ट ठरते.

**ब) वर्तमानकाळाचा आढावा घेणे :**

इतिहासाच्या अध्यापनाचा मुख्य हेतू गतकालीन घटनांचा आढावा घेणे हा असला तरी वर्तमानकाळातील घटनांनुसार त्याचा आढावा घेणे हा दुसरा हेतू आहे. देशाची सध्याची स्थिती काय, समस्या कोणत्या, त्याची कारणे कोणती, संभाव्य योजना कोणत्या करता येतील, त्यानुषंगाने भावी योजना वर्तमानात कशाप्रकारे आखता येतील. या सर्व दृष्टीने इतिहासाचे अध्यापन महत्त्वपूर्ण ठरते.

देशात दिसणाऱ्या सध्याच्या समस्या दारिद्रय, अज्ञान, निरक्षरता, जातीयता, अंधश्रध्दा, भाषावाद इत्यादीचे मूळ कुठे तरी भूतकाळात आहे. त्या समस्यांचे मूळ नष्ट करण्याचा दृष्टीने वर्तमानात काय प्रभावी योजना करता येतील यासंबंधी आढावा घेणे इतिहासाचे



कार्य आहे. आपल्याजवळ वर्तमानकाळात काय आहे. या दृष्टीने

शक्तीस्थानांचा वापर करुन, काय नव्हते यावर मात करण्यासाठी इतिहास उपयुक्त ठरतो.

भविष्य सुंदर निर्माण करण्यासाठी वर्तमानकाळाचा आढावा घेणे. इतिहास अध्यापनाचे मुख्य उद्दिष्ट ठरते.

**क) चिकित्सक वृत्तीचा विकास करणे :**

विद्यार्थ्यांमध्ये चिकित्सक वृत्ती निर्माण करणे व तिचा विकास करणे इतिहास अध्यापनाचे उद्दिष्ट आहे. कोणत्याही घडलेल्या घटनेचा एकांगी विचार न करता तिची पार्श्वभूमी अभ्यासणे. तत्कालिन परिस्थिती त्यानुषंगाने झालेला अभ्यास, विविध मतांचा परामर्श घेणे. यासोबत टिका व समर्थनाच्या दोन्ही बाजूंनी विचार करण्याच्या चिकित्सक दृष्टीकोनाचा परिपोष करण्याच्या दृष्टीने इतिहास महत्त्वपूर्ण ठरतो. विविध देशातील घडलेल्या घटना सारख्या वाटत असल्या तरी त्याबाबत सखोल व सर्व बाजूंनी विचार करण्याची प्रवृत्ती म्हणजेच चिकित्सक वृत्ती इतिहासामुळे निर्माण होते.

जसे भारतीय स्वातंत्र्य युद्ध व अमेरिकेचे स्वातंत्र्य युध्द सारखे वाटत असले तरी कारणे, परिस्थिती समान नाही. अशाप्रकारे चिकित्सक वृत्तीचा विकास करणे हा इतिहासाच्या अध्यापनाचा हेतू आहे.

**ड) तर्कनिष्ठता :**

भूतकाळातील घडलेल्या घटनेचे सत्य जाणून घेतांना प्रामाणिकपणे व शास्त्रीय पध्दतीने अध्ययन करण्याची आवश्यकता असते. त्यादृष्टीने तार्किक विचार करण्याची प्रवृत्ती निर्माण होते ती इतिहासामुळेच. असे का घडले ? या प्रश्नाची उकल करतांना परिस्थिती, तत्कालिन कारणे, त्यानुषंगाने झालेले परिणाम यासर्वांचा तर्कशुध्दपणे

विचार करणे इतिहासाच्या अध्ययनाने शक्य होते. घटनांचे महत्त्व, त्यांचा क्रम, विश्लेषण व विवेचन, विविध मतांतरे या संदर्भात तर्कशुध्दपणे विचार करण्याची प्रवृत्ती इतिहासामुळे निर्माण होते.

**ई) सामाजिक विकास :**

मनुष्य हा सामाजिक प्राणी आहे. तो समाजाशिवाय राहू शकत नाही. समाजात राहतांना त्याच्यात सामाजिक गुणांची आवश्यकता असते. समाजाच्या विकासासाठी आवश्यक ते गुण असलेच पाहिजे समाजात वावरतांना समाजातील इतर व्यक्तींसोबत सहकार्य, संवेदनशीलता, सहनशीलता या वैयक्तिक व सामाजिक गुणांची जाणीव व्यक्तीमध्ये असणे आवश्यक असते.

भारतीय देशाच्या दृष्टीकोनातून भारतात विविध समुदाय एकत्र राहतात. विविधतापूर्व असलेल्या समाजात कसे वागावे, राहावे यादृष्टीने विद्यार्थ्यांमध्ये सामाजिक गुणांचा विकासाच्या दृष्टीने इतिहास महत्त्वपूर्ण ठरतो. येथील कुटूंबव्यवस्था व विवाहसंस्था जगासाठी आदर्श ठरते. विद्यार्थ्यांमध्ये सामाजिक मूल्यांचे संवर्धन करण्याच्या दृष्टीने इतिहासाचे अध्यापन महत्त्वपूर्ण ठरते.

**फ) सांस्कृतिक विकास :**

भारतीय संस्कृती ही प्राचीन संस्कृतीपैकी एक आहे. तिचा गौरवशाली इतिहास आहे. त्यादृष्टीने देशाच्या सांस्कृतिक वारस्यांचे संरक्षण करणे, जतन करुन पुढच्या पिढीला त्या वारस्याची माहिती करुन देणे. तिचे हस्तांतरण करणे. अशा बाबींसाठी इतिहास विषयाचे महत्त्व ठरते. आपल्या सांस्कृतिक मूल्यांचे संरक्षण करणे संवर्धन करण्याच्या दृष्टीने इतिहासाचे महत्त्व खूप आहे.

आधुनिक काळात खूप मोठा बदल झालेला आहे. जग लहान झालेले आहे. एका देशाची संस्कृती आज दुसऱ्या देशापर्यंत गेलेली आहे. बहुसांस्कृतिकता निर्माण झालेली आहे. रुढी, परंपरा, मूल्ये, श्रध्दा यासोबत सांस्कृतिक संकेत चिन्हे यांची जपवणूक करणे व त्यामध्ये आधुनिक काळात होणारा बदलांचा अभ्यास. जुनी सांस्कृतिक मूल्ये टिकवून ठेवण्याचे कठीण कार्य विद्यार्थ्यांवर आलेले आहे. सांस्कृतिक विकासासाठी इतिहास महत्त्वपूर्ण भूमिका बजावतो. त्यासाठी इतिहासाचे अध्यापन करण्याचे उद्दिष्ट आहे.

**ग) लोकशाही बळकटीसाठी :**

शासन व्यवस्थेचे विविध प्रकार आहे. हुकूमशाही, साम्यवादी, भांडवलशाही, एकाधिकारशाही, समाजवादी व लोकशाही. लोकांद्वारे, लोकांकरीता व लोकांसाठी चालविलेले शासन म्हणजे लोकशाही असे अब्राहम लिंकन म्हणतात. आधुनिक जगात लोकशाही ही सर्वात योग्य शासन व्यवस्था ठरलेली आहे. भारत देशाच्या दृष्टीने या देशातील जनता अधिकांश ग्रामीण व गरीब आहे. लोकशाही व्यवस्थेतील कणा म्हणजे मतदान. मतदानाबाबत लोक जागृत व सुशिक्षित असल्याचे दिसून येत नाही. भारतात विविध प्रांत, भाषा, धर्म, आर्थिक इत्यादी बाबत विविधता असल्याने या सर्व घटकांना एकोप्याने बांधण्याच्या दृष्टीने लोकशाही महत्त्वपूर्ण ठरते. ती मजबूत असणेसुध्दा गरजेचे आहे.

सर्व लोक समान असून समान मत मूल्य आहे. अशी जाणीव निर्माण करण्यासाठी लोकांना राज्यकारभार चालविण्यासाठी विविध गुणांचा परिपोष करणे. स्वातंत्र्य, समता, बंधुता हा लोकशाहीचा पाया आहे. संविधान हे मार्गदर्शक असून त्यानुसार जनतेने राज्यकारभार करावा याबाबत लोकशाही बळकटी येणे गरजेचे आहे. अधिकारासोबत

काही कर्तव्य करणेसुध्दा आवश्यक आहे. त्यासाठी विद्यार्थ्यांमध्ये लोकशाहीची भावना निर्माण होणे गरजेचे असते. साहस, शांती, आनंद, सर्वधर्मसमभाव, सत्य, श्रमप्रतिष्ठा यासारखी मुल्ये सुध्दा विकसित करावी लागतात.

सर्व बाबतीत विचार केल्यास लोकशाही ही विचारधारा न राहता विद्यार्थ्यांची जीवनशैली झाल्यास भारतीय लोकशाहीला बळकटी प्राप्त होईल. लोकशाहीची जाणीव व बळकटीसाठी विद्यार्थ्यांना इतिहासाचे अध्यापन करणे हे उद्दिष्ट ठरते.

**ह) राष्ट्रीय ऐक्य निर्मिती करणे :**

कोणत्याही देशाचा, संस्कृतीचा विकास हा ऐक्य, सहकार्य, सहाय्याने, मदतीने होत असतो. राष्ट्राचे ऐक्य असल्यास कोणतीही परकीय किंवा अंतर्गत विनाश शक्ती ही त्या देशाला नष्ट करु शकत नाही. त्यासाठी नागरिकांत राष्ट्रभक्ती, देशप्रेमाचे मूल्य रुजले पाहिजे. राष्ट्रीय ऐक्य निर्मिती आल्यास देशाचा विकास जलद गतीने होतो.

भारत देशाच्या दृष्टीने, समाजात भिन्न-भिन्न धर्मीय, श्रीमंत-गरीब, जातीभेद, प्रांतभेद सोबत भिन्न-भिन्न रुढी परंपरा, श्रध्दा, अंधश्रध्दा दिसून येतात. विविध कुप्रथा, अंधविश्वासाने समाज ग्रस्त झालेला आहे. कुप्रथा, अंधश्रध्दा नष्ट करणे, स्वत:च्या स्वार्थ व हितासमोर राष्ट्रहिताला राष्ट्र उन्नतीला प्राधान्य देणे. सामाजिक व राष्ट्रीय भावनिक ऐक्य निर्माण करणे त्यासाठी राष्ट्रप्रेम, देशप्रेम, भावना निर्माण करण्याच्या दृष्टीने इतिहास अध्यापनाचे उद्दिष्ट आहे.

भारतातील थोर संताची परंपरा, शिकवण, समाजसुधार,  राष्ट्रनिर्माते, थोर पुरुष यांचे व्यक्ती चरित्रे, गौरवशाली ऐतिहासिक

वारसा, परंपरा ह्या लोकांमध्ये ऐक्य निर्माण करण्यास सहाय्यभूत ठरतात त्यासाठी इतिहासाचे अध्यापन करणे उद्दिष्ट ठरते.

**य) आंतरराष्ट्रीय स्तर :**

आधुनिक युगात नवनवीन शोध, क्रांति होत आहे. ज्ञानाचा प्रस्फोट होत आहे. संगणक, इंटरनेट, दळणवळण सर्व माध्यमांनी मानवाने प्रगती केलेली आहे. जग लहान होत आहे. आधुनिकीकरण व जागतिकीकरणामुळे प्रगती झाली आहे. याबाबत भारत देश मागे राहू नये. नवनवीन बदलांचा स्वीकार करणे, आपल्या संस्कृतीचा परिचय जगाला देणे, मानाचे स्थान टिकवून ठेवणे, जगातील सर्व देशांसोबत सहकार्य सामंजस्य प्रवृत्ती ठेवणे.

कोणताही देश स्वयंपूर्ण नसतो. त्यामुळे आंतरराष्ट्रीय स्तरावर आपला देश मानाच्या स्थानावर राहावे. या अनुषंगाने विद्यार्थ्यांमध्ये गुण रुजवणे गरजेचे आहे. यासोबत सर्व जग एक कुटुंबाप्रमाणे आहे. जगातील सर्व मानव समान असून बंधुतेने वागावे, सर्व राष्ट्रांमध्ये सहकार्य, समानाभूती, सहिष्णूता, सहानूभूती, प्रेम राहावे यादृष्टीने योगदान राहावे ही भावना निर्माण करण्यासाठी इतिहास महत्त्वपूर्ण ठरते.

आंतरराष्ट्रीय सहकार्य, सामंजस्य व विश्व एकता निर्माण करण्याच्या दृष्टीने इतिहासाचे अध्यापन उद्दिष्टपूर्ण ठरते.

**ज) नैतिक विकास :**

नैतिकतेशिवाय शिक्षणास अर्थ नाही असे म्हटले जाते. समाजात देशात वावरतांना नैतिकतेने वागावे लागते. अनैतिक वर्तन करणाऱ्यास समाज दंड, शिक्षा करतो. समाज विघातक व देश विघातक अनैतिक कृत्यांना आळा घालण्यासाठी नैतिक गुणांचा विकास

विद्यार्थ्यांमध्ये करणे गरजेचे ठरते. विद्यार्थ्यांमध्ये स्त्रियांबद्दल आदर,

वृध्दांबद्दल आदर, प्रेम, स्त्रियांशी सहिष्णुतेने वागणे, जातीभेद न करणे, अस्पृश्यता न पाळणे, आदर्शांचा आदर इत्यादी सारख्या गुणांचा विकास करणे आवश्यक ठरते.

नैतिक गुणांनी परिपूर्ण असलेली देशातील जनता राष्ट्रविकासासाठी सहाय्यभूत ठरते तीच जनता देशाच्या गौरवशाली इतिहासाची निर्मिती करतात.

विद्यार्थ्यांमध्ये नैतिक गुणांचा परिपोष करण्याच्या उद्देशाने इतिहास अध्यापन महत्त्वाचे ठरते.

**ल) अभिरुची विकास :**

इतिहास विषयाची विद्यार्थ्यांमध्ये अभिरुची निर्माण करणे, त्यांना जीवन कौशल्ये प्रदान करणे, इतिहासासंबंधी शास्त्ररुपाची माहिती देऊन अध्ययनास प्रवृत्त करणे अभिरुची विकासासंदर्भात महत्त्वाचे उद्दिष्ट ठरते.

अशाप्रकारे माध्यमिक स्तरावरील विद्यार्थ्यांमध्ये उपरोक्त उद्दिष्टांच्या दृष्टीने अध्यापन करणे महत्त्वाचे ठरते.

*****

# प्रकरण - ६

# इतिहास विषयाची वर्ग अध्यापनाची उद्दिष्टे व स्पष्टीकरणे

आपले अंतिम ध्येय काय हे ठरवितात उद्दिष्टे. विद्यार्थ्यांमध्ये अपेक्षित वर्तनबदल ठरविण्याचे कार्य शैक्षणिक उद्दिष्टांद्वारे होतात. उद्दिष्टांमुळे काय साध्य करायचे आहे, कसे करावयाचे आहे, कोणती साधने वापरायची आहे हे ठरविता येते. जो बदल मुद्दामपणे घडवून आणावयाचा आहे त्यामध्ये उद्दिष्टे सहाय्यभूत ठरतात. उद्दिष्टे प्राप्तीसाठी दैनंदिन अध्ययन-अध्यापन प्रक्रियेत विविध अनुभव दिले जातात त्यांनाच शैक्षणिक अनुभव म्हणतात.

उद्दिष्टांचे दोन प्रकारे वर्गीकरण करता येते.

अ) शैक्षणिक उद्दिष्टे -

ब) वर्ग अध्यापनाची उद्दिष्टे -

**अ) शैक्षणिक उद्दिष्टे :**

शिक्षण प्रक्रियेत प्राथमिक स्तरापासून तर महाविद्यालयीन स्तरापर्यंत निश्चित उद्दिष्टांना शैक्षणिक उद्दिष्टे म्हणतात. तिचा कालावधी दीर्घ असतो. ती ढोबळमानाने व्यक्त करतात. ही उद्दिष्टे स्थूल असतात. या उद्दिष्टांना सामाजिक तत्त्वज्ञानाची बैठक असते. या उद्दिष्टांसाठी सर्व विषयातून प्रयत्न करावे लागतात. सर्व विषयांचा उद्दिष्टांशी संबंध असतो. ह्या उद्दिष्टांतून विद्यार्थ्यांचे व्यक्तिमत्व विकसित करणे व राष्ट्रांसाठी सुजाण नागरिक निर्मिती करणे हे ध्येय साध्य करता येते. शैक्षणिक उद्दिष्टांतून शैक्षणिक ध्येये साध्य केली जातात. तात्पर्य शैक्षणिक उद्दिष्टांचे स्वरुप व्यापक असते.

**ब) वर्ग अध्यापनाची उद्दिष्टे :**

शैक्षणिक प्रक्रियेत दैनंदिन अध्ययन-अध्यापन करतांना विषयातील पाठयांशातून संबंधित वर्गातून साध्य करावयाची आहे त्यांना वर्गअध्यापनाची उद्दिष्टे म्हणतात. हिचा कालावधी फार कमी असतो. दैनंदिन अध्ययन-अध्यापन करतांना ती साध्य केली जातात. ही उद्दिष्टे सूक्ष्म असतात. या उद्दिष्टांना मानसशास्त्रीय अधिष्ठानाची बैठक प्राप्त असते. प्रत्येक विषयाची वर्ग अध्यापनाची उद्दिष्टे स्वतंत्र असतात. प्रत्येक विषयाला वेगवेगळी उद्दिष्टे ठरविण्यात येते. वर्ग अध्यापनाच्या उद्दिष्टांमधून शैक्षणिक उद्दिष्टांची प्राप्ती करावयाची असते. वर्ग अध्यापनातून विद्यार्थ्यांमध्ये आवड, अभिरुची, ज्ञान प्राप्ती ही उद्दिष्टे साध्य करता येतात.

**♦ वर्ग अध्यापनाची उद्दिष्टे व स्पष्टीकरणे :**

दैनंदिन अध्यापनात प्रत्येक विषयातील प्रत्येक पाठयांशासाठी काही उद्दिष्टे ठरविली जातात त्यांना वर्ग अध्यापनाची उद्दिष्टे म्हणतात. ही उद्दिष्टे ठरविलेल्या निश्चित तासिकेच्या कालावधीतून प्राप्त करावयाची असतात. यामुळे सूक्ष्म स्वरुप असते. ही उद्दिष्टे प्राप्त करण्यासाठी अध्ययन पूरक अनुभव व अभ्यासपूरक कार्यक्रमाचे नियोजन करण्याची आवश्यक असते. यामधून काय अध्ययन निष्पत्ती होणार हे ठरविण्यात येते. अशाप्रकारे वर्ग अध्यापनाची उद्दिष्टे निश्चित करणे गरजेचे असते.

इ.स. १९५९ मध्ये डॉ. बेंजामिन ब्लूम यांनी उद्दिष्टांचे तीन प्रकारे वर्गीकरण केले.




### ♦ **बोधात्मक क्षेत्र (Congnitive domain):**

### **१) ज्ञान :**

प्रत्येक विषयाचे मुख्य उद्दिष्ट असते ज्ञान प्राप्ती. ज्ञान मिळवणे हे शिक्षणाचे ध्येय असते. ज्ञानक्षेत्र स्मरणशक्ती, ओळख याबाबींशी संबंधित असते. एखादया घटकाच्या अध्ययन अध्यापनानंतर त्याबाबत माहिती, विषयाचे तत्व, नियम, संज्ञा, सांगणे म्हणजे ज्ञान. ही माहिती पाठांतराने, ऐकण्याने किंवा लेखनाने व्यक्त करणे म्हणजेच ज्ञान होय. यामध्ये विचार शक्तीचा जास्त वापर करण्याची गरज नसते. प्राप्त माहिती व्यक्त करणे अपेक्षित असते.

**ज्ञान :** ऐतिहासिक माहितीचे, घटनांचे ज्ञान मिळविणे.

१) ऐतिहासिक घटना, स्थळे, प्रतीके, तथ्ये व त्यासंबंधित निगडीत व्यक्तीचे स्मरण करतो.

२) ऐतिहासिक व्यक्ती, घटना, स्थळ व प्रसंगे ओळखतो.

३) विद्यार्थी महत्त्वाच्या संस्कृतीची नावे सांगतो.

४) संबंधित संस्कृतीची वैशिष्टये सांगतो.

५) ऐतिहासिक व्यक्तीचे गुण दोष स्पष्ट करतो.

६) विद्यार्थी चित्रातील, आलेखातील व नकाशातील माहितीचे वाचन करतो.



७) आलेख, चित्र व नकाशातील माहिती स्पष्ट करतो.

**२) आकलन :**

बोधात्मक क्षेत्रात ज्ञान प्राप्त करणे हा महत्त्वाचा हेतू असला तरी ते ज्ञान समजणे म्हत्त्वाचे असते. आकलन ही ज्ञानाच्या वरची पायरी होय. त्यामध्ये प्राप्त झालेले ज्ञान जसे च्या तसे न सांगता स्वत:च्या भाषेत मांडता येणे, व्यक्त करता येणे, माहितीधारीत प्रश्नांची उत्तरे देणे व मध्यवर्ती संकल्पना सांगणे हे अपेक्षित आहे.

माहिती, कार्यकारणभाव स्वत:च्या शब्दात सांगतो.

१) ऐतिहासिक घटनांचा तपशील व त्यामधील संबंध सांगतो.

२) घटनाचे काळानुसार वर्गीकरण करतो.

३) दोन समान घटनांतील फरक स्पष्ट करतो.

४) ऐतिहासिक घटनांची  पार्श्वभूमी स्पष्ट करतो.

५) ऐतिहासिक घटनांचा परिणाम सांगतो.

६) ऐतिहासिक घटनांचा गोषवारा सांगतो.

७) ऐतिहासिक घटनांची तुलना करतो.

**३) उपयोजन :**

एखादया विषयाचे ज्ञानप्राप्तीनंतर त्याचे आकलन झाल्यानंतर त्या ज्ञानाचे विविध परिस्थितीत वापर करता येणे म्हणजे उपयोजन होय.

१) निरनिराळया घटनांमधील परस्परसंबंध शोधतो.

२) त्या घटनांचे पृथक्करण करतो.

३) ऐतिहासिक पुराव्याचा वापर करुन सामान्य निष्कर्ष काढतो.

४) ऐतिहासिक घटना प्रसंग यांचा परिणाम काय झाला किंवा होऊ शकतो याबाबत तर्कसंगत विचार सांगतो.



५) नवनवीन प्रश्नांची मांडणी करतो.

६) संबंधित माहिती, पुरावा पुरेसा आहे किंवा नाही हे ठरवितो.

७) नवीन घटनांबाबत ऐतिहासिक पध्दतीचा वापर करतो.

**♦ क्रियात्मक क्षेत्र :**

**कौशल्ये :**

संबंधित ज्ञानाचे कौशल्यपूर्वक वापरणे याबाबत कृतीमध्ये कौशल्य येणे अपेक्षित आहे. कौशल्य ही मानस कायिक प्रक्रिया आहे.

१) ऐतिहासिक साधनांचा उपयोग करतो.

२) ऐतिहासिक प्रसंग, वास्तू, वस्तू यांचे चित्र काढतो.

३) ऐतिहासिक नाणी, वस्तू, मुद्रा, नकाशे, चित्रे यांचा संग्रह करतो.

४) नकाशे, प्रतिकृती, कालपट साधने तयार करतो.

५) नाटयीकरण प्रसंग सादरीकरणातून तत्कालिन भाषा, पोषाख, जीवनपध्दतीची माहिती देतो.

६) ऐतिहासिक वस्तू तयार करुन प्रदर्शनात मांडणी करतो.

७) ऐतिहासिक गीत, पोवाडे, काव्य यांचे गायन करतो.

८) ऐतिहासिक संदर्भांचा व पुराव्यांचा कौशल्याने वापर करतो.

**♦ भावात्मक क्षेत्र :**

**१) अभिरुची :**

कोणत्याही विषयात आवड निर्माण होणे म्हणजे अभिरुची होय. अभिरुची निर्माण झाली की त्या विषयाचे अध्ययन करण्यास विद्यार्थी प्रवृत्त होतात. प्राविण्य सुध्दा प्राप्त करतात.

१) ऐतिहासिक आधारांचा अभ्यास करतो.

२) ऐतिहासिक प्रदर्शने, स्थळे, वस्तु संग्रहालय यांना भेटी देतो.



३) ऐतिहासिक दृष्टीने महत्त्वाच्या दिनानिमित्त कार्यक्रमात सहभागी होते.

४) शाळेत व शाळेबाहेरील इतिहास विषयक पुरक कार्यक्रमात सहभाग नोंदवितो.

५) ऐतिहासिक घटनासंदर्भात आयोजित चर्चेत सहभाग घेतो.

६) इतिहास अभ्यास मंडळ कार्यक्रमात उत्स्फूर्त भाग घेतो.

७) ऐतिहासिक घटनासंदर्भात, व्यक्तिसंदर्भात विविध संदर्भपुस्तकांचे वाचन करतो.

**२) अभिवृत्ती व दृष्टीकोन :**

विद्यार्थ्यांमध्ये ऐतिहासिक दृष्टीकोनाचा विकास करुन निकोप अभिवृत्ती निर्माण करण्यासाठी इतिहास महत्त्वाचा विषय ठरतो.

१) विद्यार्थी नवनवीन कल्पना स्वीकारतो.

२) स्वदेशाबाबत प्रेम, अभिमान, निष्ठा व्यक्त करतो.

३) विविध संस्कृती, थोर पुरुष, महान व्यक्ती यांचे बाबत आदर बाळगतो.

४) इतरांना सहकार्य करतो.

५) सामाजिक, राष्ट्रीय कार्याला मदत करतो.

६) इतरांच्या संस्कृतीबाबत, मतांबाबत आदर करतो.

७) विश्वबंधुत्वाची भावना जोपासतो.

८) ऐतिहासिक घटनांचा अर्थ लावतांना तत्कालिन परिस्थितीचा विचार करतो.

**३) मानसिक विकास :**

शिक्षणातून चारित्र्यवान व्यक्तिमत्व विकसित करणे उद्दिष्ट अपेक्षित असते. इतिहास अध्ययनातून व्यक्तिमध्ये नीतिमूल्ये, श्रध्दा, विचार इत्यादी गुणांचा विकास होऊन निकोप व्यक्तिमत्वाचा विद्यार्थ्यांमध्ये विकास होतो. याबाबतचे प्रतिबिंब कृतीमधून दिसून येते.

१) जीवनात मानवी मूल्याचे स्थान ओळखतो.

२) मानवी मूल्यांबाबत श्रध्दा बाळगतो.

३) आपला देश, संस्कृती, प्रगती याबाबत अभिमान बाळगतो.

४) राष्ट्रीय मूल्ये, प्रतीके यांचा आदर करतो.

५) देशासाठी विधायक कार्य करण्याचा प्रयत्न करतो.

६) भारतीय संस्कृतीचे जगात योगदानाबाबत महत्त्व जाणतो.

**♦ उद्दिष्टांची स्पष्टीकरणे कशी लिहावीत ?**

कोणत्या विशिष्ट उद्दिष्टांमुळे कोणते अध्ययन बदल होतात हे स्पष्टीकरणात सांगावे लागते. त्यानुषंगाने-

१) स्पष्टीकरणे नेमकी व स्पष्ट असावीत.

२) स्पष्टीकरणे लिहितांना अपेक्षित वर्तन बदल लिहावेत.

३) स्पष्टीकरणे वर्तमानकाळात एकवचनी लिहावेत.

४) स्पष्टीकरणात एका वेळी एकच वर्तन बदल नमूद करावा.

५) स्पष्टीकरणात अलंकारिक, पाल्हाळीक भाषा वापरु नये.

६) मानसिक क्रिया दर्शक शब्दांचा वापर करु नये.

७) स्पष्टीकरणे पडताळा करण्याजोगी असावीत.

८) स्पष्टीकरणात प्रश्नार्थक शब्दांचा वापर टाळावा.

**♦ स्पष्टीकरणामुळे होणारे फायदे :**

१) स्पष्टीकरणामुळे अध्यापनाला दिशा मिळते.

२) मूल्यमापनामध्ये निश्चितता व उद्दिष्टानुगती होते.

३) कोणत्या घटकामुळे कोणते वर्तनबदल, कौशल्ये विकसित झाली हे लक्षात येते त्यानुसार अध्यापनात बदल करता येते.

४) कोणता भाग समजला किंवा नाही त्यानुसार उपाय-योजना करता येते.

५) अभ्यासपूरक कार्यक्रमाची आखणी करता येते.

इतिहास विषयाची वर्ग अध्यापनाची उद्दिष्टे व स्पष्टीकरणे नेमकेपणाने मांडणी केल्यास अध्ययन-अध्यापन प्रक्रियेत निश्चितता प्राप्ती होते.

*****

# प्रकरण - ७

# इतिहास विषय अध्यापनाची तंत्रे

अध्ययन-अध्यापन शिक्षण प्रक्रियेतील महत्त्वाची प्रक्रिया आहे. अध्ययन चांगले होण्यासाठी अध्यापन चांगले होणे गरजेचे असते. किंबहूना ते परस्परावलंबी असते. त्यादृष्टीने अध्यापक अध्यापन परिणामकारक होण्यासाठी विविध प्रयुक्त्या, साधनांचा वापर करीत असतात त्यांनाच अध्यापनाची तंत्रे म्हणतात. अध्यापनात शाब्दिक, अशाब्दिक साधनांचा वापर करणे यालाच अध्यापनाची तंत्रे म्हणता येईल.

♦ **शाब्दिक साधने :**

यामध्ये प्रयुक्त्यांचा समावेश होतो. त्या प्रयुक्त्या पुढीलप्रमाणे -
१) वर्णन २) प्रश्नोत्तर ३) नाटयीकरण ४) स्पष्टीकरण
५) गृहपाठ व स्वाध्याय ६) पाठांतर आदींचा समावेश होतो.

♦ **अशाब्दिक साधने :**

यामध्ये साहित्ये जसे चित्रे, नकाशे, प्रतीके, प्रतिकृती, आकृत्या यांचा समावेश होतो.

♦ **प्रयुक्ती :**

अध्यापन परिणामकारक करण्यासाठी केलेल्या कृतीस प्रयुक्ती म्हणतात. दैनंदिन अध्यापनाची उद्दिष्टे सफल करण्यासाठी केलेल्या बाबी म्हणजे प्रयुक्ती. यामध्ये कथन, स्पष्टीकरण, प्रश्नोत्तरे, गृहपाठ इत्यादींचा समावेश होतो.

**१) प्रश्नोत्तरे :**

प्रश्नोत्तरे ही फार जुनी पध्दत आहे. सॉक्रेटिस पासून तर आधुनिक काळापर्यंत ही पध्दती वापरण्यात येत आहे. माहिती असलेल्या ज्ञानाची कक्षा, पातळी व नवीन मिळालेली माहिती पडताळून पाहण्याचा प्रश्न हा राजमार्ग आहे. दैनंदिन अध्यापनात तर या गोष्टीचे फार महत्त्व आहे. प्रश्नोत्तरांचा वापर हे सुध्दा एक कौशल्य आहे.

**प्रश्नोत्तराचे हेतु :**

१) विद्यार्थ्यांच्या पूर्वज्ञानाची तपासणी करण्यासाठी.

२) नवीन मिळालेली माहिती कितपत अवगत झाली तपासणी करण्यासाठी.

३) विद्यार्थ्यांमध्ये नवीन ज्ञान मिळवण्याची कुतूहलता निर्माण करण्यासाठी.

४) अध्यापनाची परिणामकारकता तपासणी साठी.

५) विद्यार्थ्यांचे अवधान टिकवून ठेवण्यासाठी.

६) विद्यार्थ्यांमध्ये तर्क व विचार प्रवृत्तीस चालना देण्यासाठी.

७) विद्यार्थ्यांना विचार योग्य शब्दात मांडण्यासाठी.

८) अध्ययन अध्यापनातील उणीवा व त्रृटी शोधण्यासाठी.

९) माहिती झालेल्या ज्ञानाचे उपयोजन करण्यासाठी.

**♦ प्रश्नाचे स्वरुप :**

प्रश्न विचारणे ही एक कला आहे. एखादया प्रश्नाच्या स्वरुपात जर संदिग्धता असेल तर विद्यार्थी गोंधळू शकतात. म्हणून प्रश्नाचे स्वरुप लक्षात घेणे महत्त्वाचे ठरते.

१) प्रश्न सोपा, साधा, कमीत कमी शब्दात विचारले जावे.



२) वयोगटाचा विचार करुन प्रश्न विचारावे.

३) वयोगटानुसार उत्तरे देऊ शकतील असे प्रश्न असावे.

४) प्रश्नांमुळे विद्यार्थ्यांच्या विचारास चालना मिळेल असे प्रश्न असावेत.

५) प्रश्नांमुळे वर्गातील वातावरण चैतन्यमय होईल असे प्रश्न असावेत.

६) प्रश्न निश्चित असावा. त्यात अचुकता असावी.

७) प्रश्न संभाषणासारखे नसावेत.

८) प्रश्नात प्रतिध्वनी स्वरुप नसावे.

९) सूचक प्रश्न नसावेत.

१०) प्रश्नाची भाषा वयोगटानुसार असावी.

११) प्रश्न व्याकरणदृष्टया शुध्द असावे.

♦ **प्रश्नोत्तरादरम्यान घ्यावयाची काळजी :**

१) प्रश्नांची रचना वारंवार बदलू नये.

२) एकाच विद्यार्थ्याला प्रश्न विचारु नये.

३) सर्व विद्यार्थ्यांना प्रश्न ऐकू जाईल एवढया आवाजात प्रश्न विचारावा.

४) सर्व वर्गाला उद्देशून प्रश्न विचारावे.

५) सामुहिक उत्तरे स्विकारु नये.

६) पहिले विद्यार्थ्यांने दिलेले उत्तर चुकीचे असल्यास दुसऱ्या विद्यार्थ्याला विचारावे. त्याचे उत्तर बरोबर आल्यास उत्तराची पुनरावृत्ती पहिल्या विद्यार्थ्यांकडून करुन घ्यावी.

♦ **विद्यार्थी उत्तरे देतांना खालील बाबींकडे लक्ष देणे आवश्यक आहे.**

१) विद्यार्थी उत्तरे देतांना शारीरिक हालचाली कशा आहेत, बोलण्यात स्पष्टता आहे काय हे पाहावे.

२) दिलेले उत्तर अचूक आहे काय हे पाहावे.

३) इतर विद्यार्थ्यांचे उत्तर देणाऱ्या विद्यार्थ्यांकडे लक्ष आहे काय हे पाहावे.

४) विद्यार्थी उत्तरे पूर्ण वाक्यात देत आहे काय हे पाहावे.

५) विद्यार्थ्यांना प्रश्न कठिण अथवा भिती वाटल्यास त्याबाबत लक्ष दयावे. ती भीती दूर करावी.

६) प्रश्नांची उत्तरे देतांना विद्यार्थ्यांकडून होणाऱ्या चुका वेळीच दुरुस्त कराव्या.

अशाप्रकारे प्रश्नोत्तरे ही प्रयुक्ती अतिशय उपयुक्त पारंपारीक पध्दती असल्यामुळे आधुनिक काळातही ती टिकून आहे.

**२) नाटयीकरण :**

एखादी घटना, प्रसंग, व्यक्तिचित्रण, रितीरीवाज, जीवनपध्दती याचे हुबेहूब सादरीकरण, प्रात्यक्षिकरण करणे, त्यामध्ये पोशाख, आवाज, वेशभुषा, इत्यादी द्वारे जीवंतपणा आणून सादर करणे यालाच नाटयीकरण म्हणतात. पुरातन काळापासून नाटकास महत्त्व आहे. प्राचीन, ऐतिहासिक, वीरकथा, पौराणिक इत्यादी विविध विषयावर नाटके बघणे लोकांना आवडत होते. मनोरंजन व बोध देण्याचे ते एक परंपरागत साधन आहे. लोक आवडीने नाटक बघतात. इतिहास विषयात तर नाटयीकरणास खूप महत्त्व आहे.

♦ **नाटयीकरणाचे प्रकार :**

**अ) प्रासंगिक नाटक :**

नाटयीकरणाच्या या प्रकारात अतिशय छोटया स्वरुपाचे

एखादया घटना आधारित, प्रसंगाधारित ५/६ मिनिटांचे संवाद असतात.

इतिहास विषयात अनेक घटनांचे प्रसंग शिक्षक-विद्यार्थी स्वत: संवाद लिहून सादर करतात.

उदा. राजदरबारातील, न्यायालयातील प्रसंग.

**ब) स्वगत :**

यामध्ये ऐतिहासिक नाटकातील काही प्रसंग, भाग फक्त एकाच पात्राद्वारे सादरीकरण केले जाते. यामध्ये एकाच पात्राचे अभिनय असते.

**क) संपूर्ण नाटक :**

यामध्ये घटना, प्रसंगाचा संपूर्ण भाग, एखादया थोर पुरुषाच्या जीवनाधारित संपूर्ण नाटक असते. भूमिका, नेपथ्य, वेशभुषा सर्व बाबींचा समावेश यामध्ये असतो. उदा. शिवाजी महाराजावर आधारित नाटक.

**ड) मूकनाटय :**

याप्रकारात संवाद, भाषण शब्द नसतात फक्त अभिनय असतो. ह्या प्रकारात अभिनयाला खूप महत्त्व असते. यामध्ये पात्राची खरी कसोटी असते.

**इ) सामुदायिक नाटक :**

यामध्ये सर्व विद्यार्थी भाग घेतात. सर्वांच्या भूमिका महत्त्वपूर्ण ठरतात. राजदरबारातील घटना इत्यादी याद्वारे दर्शविता येतात.

**♦ नाटक निवडतांना पाळावयाचे निकष :**

१) नाटक फार लांबलचक नसावे.

२) संवाद परिणामकारक असावेत.



३) नाटक वयोगटानुसार असावे.

४) नाटकातील संपूर्ण घटकांचा समावेश असावा.

५) नाटकाचा उद्देश पूर्ण झाला किंवा नाही हे मूल्यमापन करणे गरजेचे असते.

♦ **नाटयीकरणाचे फायदे :**

१) दररोजच्या व्याख्यान पध्दतीपेक्षा नाटयीकरण पध्दती परिणामकारक असते. नाटयीकरणाने विद्यार्थ्यांमध्ये रुची निर्माण होते.

२) अभिनय कौशल्यात वाढ होते.

३) समकालीन घटनांचे लवकर आकलन होते.

४) विद्यार्थ्यांमध्ये नाटयीकरणाने सहकार्य प्रवृत्तीची वाढ होणे.

५) विद्यार्थ्यांमध्ये सभाधीटपणा, संवाद कौशल्य, भाषा विकास होतो.

६) तत्कालिन वस्तू, पध्दती, पोशाख इत्यादींची माहिती प्राप्त होते.

७) वेशभुषा, नेपथ्य इत्यादीमुळे आकर्षकता वाढते.

♦ **मर्यादा :**

नाटयीकरणाला खालील मर्यादा आहेत.

१) एखादया ऐतिहासिक घटनेच्या मूळ बाबींकडे दुर्लक्ष व्हायला नको.

२) नेपथ्य, वेशभुषा इत्यादीमुळे महाग आहे.

३) संवाद सराव, सादरीकरणात वेळ जास्त लागतो.

४) सर्वच विद्यार्थी व शिक्षक अभियानात सरस नसतात.

५) प्रत्येक प्रसंग/घटनेचे नाटयीकरण करण्याचा अट्टाहास असू शकतो.

६) नाटयीकरणात काही पथ्ये पाळावी लागतात.

### ३) भूमिका अभिनय :

भूमिका अभिनय म्हणजे Role Play अध्यापनाच्या विविध तंत्रापैकी एक महत्त्वपूर्ण तंत्र होय. यामध्ये कोणतेही पूर्वनियोजन नसतांना कोणत्याही प्रकारचे लेखी संवाद नसतांना केलेले अभिनय होय. भूमिका अभिनयात एखादी विशिष्ट घटना, प्रसंगी व्यक्तीची भूमिका काय राहील, कशाप्रकारे संवाद असतील याचे सादरीकरण होय. इतिहासात अनेक घटना, प्रसंग, घडामोडी घडलेल्या असतात. त्या विशिष्ट प्रसंगी व्यक्ती कशी भूमिका सादर करेल यालाच भूमिका अभिनय म्हणतात. भूमिका अभिनयातून व्यक्तीची अभिव्यक्ती प्रकट होते.

भूमिका अभिनयाच्या वर्गाध्यापनात वापर करतांना संबंधित घटक, प्रसंग याबाबत माहिती देऊन त्यानुषंगाने विद्यार्थ्यांना स्वत: संवाद व त्या विशिष्ट भूमिकेचे सादरीकरण करणे आवश्यक असते. प्रसंगी कधी कधी विविध भूमिकांची अदलाबदलही करता येते. वर्गात भूमिका अभिनय तंत्र वापर करतांना योग्य त्या भूमिकांसाठी योग्य विद्यार्थी निवडून भूमिका अभिनयाची मांडणी करावी. भूमिका अभिनयात विद्यार्थी एकरुप होणे आवश्यक असते. भूमिका अभिनय पूर्ण झाल्यावर सदर भूमिकेचे मूल्यांकन विद्यार्थी व शिक्षक दोघांनीही करुन आपापली मते व सांगोपांग चिकित्सक दृष्टीकोन व्यक्त करणे आवश्यक असते. याबाबत शिक्षकांकडून योग्य सूचना दिल्या जाणे अपेक्षित असते.

अशाप्रकारे भूमिका अभिनयाद्वारे ऐतिहासिक व्यक्तींच्या भूमिकांचे सादरीकरण, संबंधित प्रसंगाचे सादरीकरण अतिशय मनोरंजक पध्दतीने होते. विद्यार्थ्यांचा आत्मविश्वास वाढतो. संवाद कौशल्याचा

विकास होतो. चिकित्सक दृष्टीकोन व संबंधित घटना प्रसंगास कसे सामोरे जावे याचा धीटपणा अंगी येतो. यासाठी भूमिका अभिनय अध्यापनाचे महत्त्वपूर्ण तंत्र आहे.

**४) वर्णन :**

विद्यार्थी स्वत:च्या जीवनात अनेकबाबी, घटना, प्रसंग, वस्तू, अनुभवनाचे वर्णन करीत असतो. अध्यापनातसुध्दा वर्णन ही प्रयुक्ती महत्त्वाची ठरते. इतिहासातील घडलेल्या घटना, प्रसंग, विशेष बाब, व्यक्तींचे चरित्रे, युध्द, तह या सर्व बाबींचे अध्यापन करतांना शिक्षक वर्णन प्रयुक्ती वापरुन करु शकतो. इतिहासात घडलेल्या प्रसंगाच्या वेळी ती घटना, युध्द, तह इत्यादी गोष्टीच्या वेळी आपण नव्हतो परंतु ती प्रत्यक्षात कशी घडली असेल याबाबतची माहिती देणे म्हणजे वर्णन.

इतिहासातील घडलेल्या घटनांचे जसेच्या तसे वर्णन करण्यास खूप महत्त्व असते. त्यामध्ये अतिशयोक्ती, अतिरंजकता किंवा स्वत:च्या बाबी समाविष्ट करता येत नाही. अशा वर्णनास विद्यार्थी लक्षपूर्वक ऐकतात. याद्वारे विद्यार्थ्यांना ऐतिहासिक घटनेचे महत्त्वसुध्दा कळते.

शिक्षकाचे वर्णन आकर्षक, भाषा सोपी व समजण्यासारखी असावी अन्यथा ते वर्णन विद्यार्थ्यांना कंटाळवाणे होईल. वर्णंन करतांना भाषा विद्यार्थ्यांच्या वयोगटाला न्याय देणारी असावी. घटनेचे, प्रसंगाचे गांभीर्य पाहून वर्णन करणे अपेक्षित असते. वर्णन कसे प्रभावी व परिणामकारक होईल याकडे कटाक्षाने लक्ष दयावे. वर्णन करतांना भाषिक कौशल्ये, आवाजात चढ उतार, आरोह-अवरोह योग्य गती इत्यादी बाबींचा योग्य वापर करणे आवश्यक असते.

इतिहासाचे अध्यापन करतांना विविध स्थळे इमारती, वास्तू, किल्ले जसे दौलताबादचा किल्ला, विजयदुर्ग किल्ला. संग्रहालय जसे पुणेचे केळकर संग्रहालय इत्यादी बाबींचे वर्णन केल्यास विद्यार्थ्यांना रस निर्माण होतो. वर्णन प्रयुक्तीमुळे अध्यापन परिणामकारक होते.

**५) स्पष्टीकरण :**

इतिहासातील एखादया विषयावर, घटनेवर प्रसंगावर दिलेली सविस्तर माहिती किंवा इतिहास अध्यापनात विद्यार्थ्यांनी विचारलेल्या समस्या, प्रश्न यावर दिलेले सविस्तर उत्तर म्हणजे स्पष्टीकरण. पाठनियोजनात अध्यापन करतांना विषय प्रतिपादन करणे म्हणजेच स्पष्टीकरण. अध्यापक माहिती देतांना विषयभाग सोपा करुन सांगतात. संकल्पना, संज्ञा स्पष्ट करतात. शब्दांचे अर्थ स्पष्ट करतात. म्हणजेच विद्यार्थ्यांना त्याबाबींचे त्यांच्या भाषा विषयाशी अनुरुप शब्दांत माहिती देणे म्हणजे स्पष्टीकरण होय.

स्पष्टीकरण ही इतिहास विषयाच्या अध्यापनात जास्तीत जास्त वापरासाठी जाणारी प्रयुक्ती आहे. या प्रयुक्तीचा वापर करतांना इतिहास शिक्षकाने कटाक्षाने काही बाबी पाळल्या पाहिजेत. स्पष्टीकरण खूप मोठे किंवा खूपच छोटे असू नये. स्पष्टीकरणाची भाषा सोपी असावी. प्रसंगानुसार भाषेचा वापर योग्यपणे करावा. भाषिक कौशल्याचा, आवाजातील चढ उतार, हावभाव इत्यादी बाबींचा योग्य वापर केलेला असावा. स्पष्टीकरण करतांना विविध अमूर्त बाबींना मूर्तरुप देण्यासाठी योग्य चित्रे, आकृत्या, तक्ते, प्रतिकृतींचा वापर करावा. शैक्षणिक साहित्यांच्या वापरामुळे स्पष्टीकरण प्रभावी ठरते. विद्यार्थ्यांना आकलन करण्यास सोपे जाते.

इतिहासाचे अध्यापन करतांना ज्या घटना प्रसंगाचे वर्णन जसे गांधीजीचे असहकार आंदोलन, सविनय कायदेभंग यासारख्या घटनांमधील विविध संकल्पना जसे असहकार, सत्याग्रह इत्यादी करीता स्पष्टीकरण देणे आवश्यक असते. स्पष्टीकरण प्रयुक्ती अध्यापन परिणामकारक करण्यासाठी महत्त्वपूर्ण ठरते.

**६) दाखले देणे :**

दैनंदिन जीवनात आपण अनेकांना विविध गोष्टीवरुन उदाहरणे देतो. त्यांनाच दाखले देणे असे म्हणतात. इतिहासाच्या अध्यापनाच्या विविध तंत्रापैकी एक महत्त्वाचे तंत्र म्हणजे दाखले देणे होय. विद्यार्थ्यांना इतिहासातील अनेक गोष्टी, प्रसंग, घटना, संकल्पना, ऐतिहासिक बाबी ह्या कठिण, रुक्ष व अनाकलनीय असतात. त्या समजून घेणे कठीण असतात. तत्कालिन परीस्थिती व सद्यास्थिती भिन्न असते. तेव्हा विविध उदाहरणे, दाखले देऊन तो भाग सोपा करुन अध्यापक समजावून देतो. यासाठी अध्यापक चित्रे, नकाशे, प्रतिकृती यासारख्या शैक्षणिक साहित्यांचाही वापर करतो. दाखले देण्याचे दोन प्रकार आहेत. जेव्हा शिक्षक शब्दाच्या सहाय्याने उदाहरण देवून एखादी घटना, प्रसंग समजावून देतो त्याला शाब्दिक दाखले म्हणतात. जेव्हा वस्तू, दृक, श्राव्य व दृक-श्राव्य शैक्षणिक साहित्याच्या द्वारे उदाहरणासह स्पष्ट केल्या जाते तेव्हा ते अशाब्दिक दाखले होय.

अध्यापन करतांना देण्यात येणारे दाखले हे पाठयांशास अनुरुप असावेत. शाब्दिक दाखल्याची भाषा प्रसंगानुरुप, हावभावयुक्त व प्रभावी असावी. यासोबत दाखले देण्याबाबत नियोजन केल्यास अध्यापन प्रभावी व परिणामकारक अध्ययनपूरक ठरते.

### ७) गृहपाठ किंवा स्वाध्याय :

विद्यार्थ्यांना स्वयंअध्ययनास प्रेरीत करणारा, अध्यापनानंतर विद्यार्थी अध्ययन करण्यास कितपत सक्षम झालेला आहे. सराव करण्यासाठी घरी दिलेला अभ्यास म्हणजेच गृहपाठ किंवा स्वाध्याय होय.

स्वाध्याय किंवा गृहपाठात ३/४ प्रश्न असतात. त्या प्रश्नामधून विद्यार्थ्यांना पाठयांशाधारित प्रश्न सोडवून प्राप्त माहितीचे उपयोजन करता आले पाहिजे. विद्यार्थ्यांच्या बुध्दिला, विचाराला चालना देणारे गृहपाठ किंवा स्वाध्याय असावेत. गृहपाठ/स्वाध्याय फार मोठा असू नये. विद्यार्थ्यांना कंटाळवाणे, रटाळ स्वाध्याय नसावेत. यासोबत गृहपाठात विविधता असावी. लेखी प्रश्नांचे व स्वाध्याय दयावे असे नाही तर उपक्रम, कृती, प्रकल्पाधारित प्रात्यक्षिकपरही स्वाध्याय असावेत. स्वाध्याय, गृहपाठ वेळोवेळी तपासणे शिक्षकाचे आदय कर्तव्य आहे. विद्यार्थ्यांच्या उणीवा निदर्शनास आणून दयावे यासोबत चांगल्या स्वाध्यायाची प्रशंसा सुध्दा करावी. विद्यार्थ्यांचा स्तर व अभिरुची निर्माण करणारे स्वाध्याय असावेत. स्वाध्यायाचे स्वरुप वैयक्तिक किंवा सामुहिक असू शकते.

इतिहास विषयातील अध्यापन करतांना किल्ल्याची प्रतिकृती तयार करा. हडप्पाकालीन वस्तू, खेळणी इत्यादींची चित्रे काढा. प्रतिकृती तयार करा. शिकवलेल्या पाठातील सन, कालखंडाचे लेखन करा. कालखंडातील घटनांच्या नोंदी लिहा. पाठाधारित विशेष महत्त्वपूर्ण व्यक्तींबाबत माहिती मिळवा. परिसरातील स्थळे यांची भेट घेऊन माहिती

लेखन करा. गावाचा, तालुक्याचा इतिहास, विविध व्यक्तींना भेटी देऊन लिहून काढा. नकाशे काढा.

अशाप्रकारे नानाविध गृहपाठ किंवा स्वाध्यायाचे स्वरुप असू शकते. विद्यार्थ्यांनी तो गृहपाठ/स्वाध्याय प्रामाणिकपणे करणे गरजेचे असते. स्वाध्यायामुळे अध्यापन-अध्ययन प्रक्रिया गतिशील होते.

**८) सामूहिक अध्यापन पध्दती (समूह अध्यापन तंत्र):**

इतिहास विषयातून विद्यार्थ्यांमध्ये अनेक वैयक्तिक मूल्यांसह सामाजिक मूल्यांचा सुध्दा विकास होणे अपेक्षित असते. विद्यार्थ्यांमध्ये लोकशाही मूल्यांचा विकास होण्यासाठी विद्यार्थ्यांची शिक्षकांसोबत, विद्यार्थ्यांची विद्यार्थ्यांसोबत सुध्दा चर्चा होणे आवश्यक आहे. विद्यार्थी आपसात मिळून मिसळून इतिहास विषयाधारित बाबींचे अदानप्रदान झाल्यास ते प्रभावी व परिणामकारक ठरते. आपसी सामंजस्य, एकोपा, निर्माण होण्यास मदत होते.

या अध्यापन तंत्रामध्ये परिसंवाद, गट चर्चा, बुध्दिमंथन, कृती सत्र, सांघिक अभ्यास या तंत्राचा समावेश होतो.

**अ) परिसंवाद :**

विद्यार्थ्यांना स्वयंअध्ययनास प्रेरीत करण्यासाठी, अभ्यासाची सवय लागण्यासाठी व चिकित्सक विचार करण्याच्या दृष्टीने परिसंवाद महत्त्वाचे तंत्र ठरते. यामध्ये ५ ते ६ विद्यार्थ्यांना एखादया विषयामधील स्वतंत्र मुद्यांचे विभाजन करुन प्रत्येक विद्यार्थ्यास एक मुद्या अभ्यासण्यासाठी देतात. त्या मुद्याचा अभ्यास करण्यास सांगतात. यासाठी शिक्षक मार्गदर्शन करतात. विद्यार्थ्यांना अडचण असल्यास ते विचारतात.

यानंतर वर्गासमोर विद्यार्थी त्या मुद्यावर स्पष्टीकरण करतो. आपले विचार

व्यक्त करतो. या मुद्यांच्या आधारीत माहिती दिल्यानंतर श्रोते विद्यार्थी व शिक्षक शंका विचारु शकतात. मुद्यांच्या पृष्ठार्थ काही अतिरीक्त बाबी सांगू शकतात. परिसंवादामुळे विद्यार्थ्यांचे भाषिक कौशल्य तर वाढतेच सोबत आत्मविश्वास व सभाधीटपणा वाढतो.

परिसंवादातून प्रत्येक विद्यार्थी सहभागी होईल असे सांगणे कठिण आहे. यासोबत याला वेळ लागतो. परिसंवादाचे आयोजन प्रत्येक घटक मुद्यांवर होईल असे नाही. असे असले तरी परिसंवादाचे महत्त्व नाकारता येणार नाही.

उदा. हडप्पा संस्कृतीच्या परिसंवादात संस्कृतीचा विकास, इमारती, स्नानगृह, भौतिक अवशेष, लोकजीवन, ऱ्हास अशा मुद्यावर परिसंवाद घेता येतो. यासोबतच इतिहासाच्या साधनांमध्ये भौतिक साधने, लिखित साधने, मौखिक साधने या मधील मुद्यांवर आधारित परिसंवादाचे आयोजन करता येईल.

**ब) गट चर्चा :**

प्रत्येक माणसाला बोलणे आवडते. चर्चा करणे आवडते. विद्यार्थ्यांना तर त्यांच्या वयोगटात चर्चा करायला, बोलायला खूप आवडते. आपले अनुभव ते एकमेकांना सांगत असतात. यातून ते अनेक गोष्टी शिकतात.

इतिहास विषयाच्या अध्यापन तंत्रामध्ये गटचर्चेचा उपयोग प्रभावीपणे करता येतो. या तंत्रामध्ये ४/५ विद्यार्थ्यांचा एक गटकरुन गटाचा नेता निवडला जातो. त्यांना अभ्यासावयाच्या विषयातील एखादया मुद्यावर चर्चा करायला सांगितले जाते. गटातील प्रत्येकजण चर्चेत सहभागी होईल याबाबत लक्ष दिले जाते. त्या चर्चेतून मिळालेल्या मुद्यांचे

टिपणसुध्दा घेतले जाते. त्यानंतर सर्वांसक्षम त्याचे गटप्रमुखाद्वारे

सादरीकरण, स्पष्टीकरण केले जाते. श्रोते विद्यार्थी व शिक्षक ते श्रवण करतात. चर्चेचे स्पष्टीकरण झाल्यानंतर त्यावर चर्चा होते. चर्चेच्या पृष्ठार्थ अधिक सूचना किंवा शिक्षक मार्गदर्शन करतात. सर्व गटाच्या चर्चेच्या स्पष्टीकरणानंतर त्याचे अहवाल लेखन घेतले जाते.

उदा. १८५७ च्या उठावाची कारणे, परिणाम यासारख्या बाबींवर गटचर्चा आयोजन करता येते. यासोबत स्वातंत्र्यलढयातील स्त्रियांचे योगदान इत्यादी सारखे विषयसुध्दा चर्चेसाठी घेतले जातात.

गटचर्चेमुळे विद्यार्थ्यांच्या विचारांची देवाण घेवाण होते. आत्मविश्वास वाढतो, सामुहिक अध्ययनाची सवय लागते. सभाधीटपणा व भाषिक कौशल्याचा विकास होतो.

**क) कृती सत्र :**

या तंत्रामध्ये कृतीला महत्त्व दिले जाते. याचे स्वरुप एखादया विषयातील मुद्यावर माहिती गोळा करणे, वर्तमानपत्रातील लेखसंग्रह त्यावर आपले मत प्रकट करणे, पेपर वाचणे, ऐतिहासिक घटनांचे तक्ते, महत्त्व, ऐतिहासिक वस्तू, चित्रसंग्रहासोबत तज्ञांची भाषणे आयोजन करणे असू शकते. कृतिसत्रात साहित्येसुध्दा तयार केली जातात.

कृती सत्रामुळे विद्यार्थ्यांना स्वत:चे विचार व्यक्त करता येते. विद्यार्थी स्वयंअध्ययनास प्रेरीत होतात. चर्चा करुन मुद्याबाबत सविस्तर माहिती घेण्याची सवय लागते. एकमेकांसोबत चर्चा, कृती केल्याने सांघिक भावना वाढते. लोकशाही पध्दतीस अनुरुप कृती सत्र आयोजन केले जाते.

सर्वच विद्यार्थी यामध्ये सहभागी होतील याकडे कटाक्षाने लक्ष दिले पाहिजे.

### ड) बुध्दिमंथन :

या तंत्रामध्ये एखादया समस्यावर आधारित उपाययोजना शोधण्यासारखे असे का घडले, कारणमीमांसा करणारे, विषयाधारित विद्यार्थ्यांना चिकित्सक विचारप्रवर्तनास वाव देणारी, स्वत:चे मत कौशल्यपूर्ण मांडण्याच्या दृष्टीने स्वयंअध्ययनाची सवय लावण्यास प्रेरणा देणारी चर्चा म्हणजे बुध्दिमंथन.

जसे इतिहासात हडप्पा संस्कृतीचा ऱ्हास का झाला ? १८५७ चे उठाव असफल का झाले ? १८५७ चे राष्ट्रीय उठाव पहिले स्वातंत्र्ययुध्द आहे का ? अशाप्रकारच्या विचारप्रवर्तक विषयावर चर्चा घडवून आणणे बुध्दिमंथन तंत्रात अपेक्षित आहे.

### ९) पर्यवेक्षित अभ्यास तंत्र :

या तंत्राला supervised study असे म्हणतात. विद्यार्थी केंद्रित पध्दती पैकी एक पर्यवेक्षित अभ्यास पध्दती होय. इतिहासात कोणत्या विषय भागाची निवड करावी याची निवड विद्यार्थी स्वत: करतो. यामध्ये शिक्षकाची भूमिका मार्गदर्शकाची असते.

विद्यार्थी या तंत्रामध्ये स्वत: विषय निवडतात. त्या विषयभागासाठी कोणती पुस्तके, साहित्ये, संदर्भ वाचावेत याबाबत शिक्षकांकडून माहिती काढतात. अभ्यास कसा करायचा अर्थात वाचन करणे, टिपण काढणे, पाठांतर, संकल्पनांचा अर्थ समजून घेणे इत्यादी बाबी, सवयी समजून घेतात. या पध्दतीमध्ये एखादया ठिकाणी, खोलीत विद्यार्थ्यांना अभ्यासासाठी जागा दिली जाते. शिक्षक पर्यवेक्षकाचे काम करतो. त्यांना संदर्भ, शब्दकोश, विश्वकोश आदीचा पुरवठा केलेला

असतो. वैयक्तिकपणे विद्यार्थी शिक्षकांना अडचणी विचारुन शंका निरसन करतो. नवीन विषयाचे ज्ञान प्राप्त करतो.

या पध्दतीत विद्यार्थी स्वत: नवीन ज्ञान प्राप्त करीत असल्यामुळे ज्ञान प्राप्तीचा आनंदासह आत्मविश्वास वाढतो. स्वयं अध्ययनाची सवय लागते. विद्यार्थी स्वत: कृती प्रवण व अध्ययनप्रवृत्त होतो. कठिण भाग, चुकांची दुरुस्ती, शिक्षकांकडून केली जाते. विद्यार्थ्यांच्या क्षमतांची वाढ होते.

पर्यवेक्षित तंत्र विद्यार्थी केंद्रित, उपयुक्त तंत्र असले तरी प्रत्येक विद्यार्थी स्वयंअध्ययन करेल अशी शाश्वती नसते. यासोबत विद्यार्थ्यांच्या व्यक्तिभेदामुळे, आवडी निवडीमुळे मर्यादा येतात. पुरवणी ग्रंथे, संदर्भ पुस्तके उपलब्ध असतील ही शक्यता कमी असते. वैयक्तिक मार्गदर्शनाचा अभाव असू शकतो. त्यामुळे या तंत्रात मर्यादा येतात.

असे असले तरी आधुनिक शिक्षणपध्दतीत पर्यवेक्षित अभ्यासतंत्राचा वापर होणे काळाची गरज आहे.

**१०) सांघिक अध्यापन :**

सांघिक म्हणजे समुहाद्वारे जो अध्यापन विषयभाग अनेक शिक्षकांद्वारे केले जाते त्यांना सांघिक अध्यापन म्हणतात. जेव्हा शाळेतील विषय शिक्षक एकत्र बसून अध्यापन निश्चित विषयाचे अध्यापन करतात. ते सुध्दा सांघिक अध्यापन होय. यासोबत एकाच विषयाच्या शिक्षकांनी एकत्र बसून विषयभागाचे अध्यापन केले ते सुध्दा सांघिक अध्यापन होय.

सांघिक अध्यापनात वर्गातील विद्यार्थ्यांना एखादया विषय भागावर अनेक शिक्षक माहिती देतात. यामध्ये संघभावनेला महत्त्व असते. सामुहिक जबाबदारीच्या तत्वाने हे अध्यापन करतात.

सांघिक अध्यापनाचे नियोजन करणे महत्त्वाचे असते. सांघिक अध्यापन कोणत्या वर्गाला करावयाचे आहे. हे ठरवावे लागते. इतिहास विषयाच्या सांघिक अध्यापनासाठी कोणता विषयघटक घ्यायचा, पाठयांश कोणता घ्यावा ह्या सर्व बाबी पूर्व नियोजित असतात.

शाळेत गणित, भाषा, विज्ञान विषयाचे शिक्षकांच्या मदतीने इतिहासाचे विषयभाग समजावून देणे हा सांघिक अध्यापनाचा पहिला प्रकार होय. यामध्ये विषयभागातील मुद्याचे, उपमुद्यांचे विभाजन करुन कोणता शिक्षक कोणता घटक भाग, मुद्दे अध्यापन करणार याचे नियोजन पूर्वीच करणे अपेक्षित असते. जसे इतिहासाची साधने घटक भाग घेतांना विज्ञानाचा शिक्षक लिखित साधनांचे परीक्षण, रासायनिक चाचणी, सत्यता पडताळणी कशी करावी ही माहिती देतो. तर भूगोलाचा शिक्षक साधनांची भौगोलिक पार्श्वभूमी, सहलभेट, त्यांचे महत्त्व प्रतिपादन करतो. अर्थात सर्व विषयाचे शिक्षक येऊन विद्यार्थ्यांना सखोल ज्ञान देतात. शाळेत एकाच विषयाचे अनेक शिक्षकही असू शकतात. इतिहास विषयाचे सर्व शिक्षक एकत्र बसवून वर्गातील विषय घटक, भाग, पाठयांशाचे अध्यापनाचे नियोजन करुन त्या वर्गातील विद्यार्थ्यांना अध्यापन करतात. हा सांघिक अध्यापनाचा दुसरा प्रकार होय. या सांघिक अध्यापनाच्या प्रकारात एखादा घटक भाग अध्यापन करतांना त्याचे मुद्दे, उपमुद्दे विभाजून संबंधित शिक्षकांना अध्यापनासाठी देतात. जसे इतिहासाचे आधार अध्यापन करतांना कुणी मौखिक आधार स्त्रोत, कुणी लिखित साधने, मुद्यांची माहिती सांगेल त्यामुळे विद्यार्थ्यांना सखोल माहिती मिळेल.

सांघिक अध्यापन तंत्राचा वापर केल्यामुळे इतर विषय शिक्षकांची इतिहास विषय शिक्षकांसोबत चर्चा विनिमय घडवून येते. एकसंघतेची भावना वाढते. विषयांचा समवाय होतो. सहकार्य प्रवृत्ती वाढते. विद्यार्थ्यांना वेगवेगळे शिक्षक अध्यापन करीत असल्यामुळे विद्यार्थी कंटाळत नाही. यांत्रिकता राहत नाही. विद्यार्थ्यांना संबंधित घटक भागाचे सखोल व सविस्तर ज्ञान प्राप्त होते. शिक्षकांच्या क्षमतांचा विकास होतो. असे असले तरी सांघिक अध्यापनात वैयक्तिक जबाबदारी निश्चित होत नाही. व्यक्तिनिष्ठता येण्यासोबत शिक्षकांचे मूल्यमापन करण्यात अडचण ठरते. या तंत्राने सर्व विषयघटक शिकवता येत नाही. याशिवाय विषयास आवश्यक असणारी यंत्रसामुग्री, साहित्ये उपलब्ध असतील किंवा करुन घेतील याची शक्यता कमी आहे. सांघिक अध्यापन तंत्र दैनंदिन अध्यापन तंत्रामधील व एकच एक शिक्षकाच्या अध्यापनाला दूर करण्यास उपयुक्त ठरते. त्यामुळे निश्चितच काही घटकांसाठी तरी सांघिक अध्यापन तंत्राचा स्वीकार केल्यास नावीण्यपणा येऊन इतिहासातील यांत्रिकता व रुक्षता दूर करु शकतो हा निश्चित विश्वास ठेवता येईल.

अशाप्रकारे इतिहास विषयात अध्यापनाची विविध तंत्रे वापरुन अध्यापन परिणामकारक करण्याचे नियोजन शिक्षकांनी करावे.

*****

# प्रकरण - ८

# इतिहास विषय अध्यापनाच्या पध्दती

### ♦ अध्यापनाच्या पध्दती :

अभ्यासक्रमाची निश्चित उद्दिष्टे प्राप्त करण्यासाठी प्रभावी साधन म्हणजे अध्यापन पध्दती. विद्यार्थ्यांचा सर्वांगिण विकास व्हावा त्यादृष्टीने शिक्षक अध्यापन करतो ह्साठी विविध पध्दतीचा वापर करतो. अध्यापन पध्दतींना शास्त्रीय आधार आहे. याखेरीज अध्यापन ही एक कलासुध्दा आहे असे मानतात. अध्यापकाजवळ भरपूर ज्ञान आहे मात्र विद्यार्थ्यांच्या गळी उतरवता आले नाही तर ते ज्ञान निरर्थक ठरते. यादृष्टीने विद्यार्थ्यांना ज्ञान देण्याच्या शास्त्रीय पध्दतीला, शिकविण्याची व शिकण्यासाठी प्रवृत्त करणारी पध्दती म्हणजेच अध्यापन पध्दती होय. विषयानुरुप, घटकानुरुप पाठयांशानुरुप तसेच विद्यार्थ्यांच्या वयोगटानुसार स्तरानुसार व उद्दिष्टांनुसार अध्यापनाच्या पध्दतीची निवड सुध्दा महत्त्वाची ठरते. ते एक महत्त्वपूर्ण कार्य आहे.

इतिहास विषय हा विद्यार्थ्यांना मूळातच निरस, रुक्ष, कंटाळवाणा वाटतो. तो विद्यार्थ्यांना आवडावा त्यामध्ये अभिरुची निर्माण व्हावी, विषयाशी एकरुप व्हावे. विषयाशी संबंधित क्षमतांची प्राप्ती व्हावी यादृष्टीने शिक्षकाचे कसब लागते. या कामी अध्यापन पध्दती महत्त्वपूर्ण भूमिका बजावते. इतिहास विषयाच्या अध्यापनात शिक्षकाने योग्य पध्दतीची निवड केल्यास त्या घटकभागाचे आकलन विद्यार्थ्यांना लवकर होते. अपेक्षित उद्दिष्टे साध्य करता येतात. यादृष्टीने इतिहास विषयात



अध्यापन पध्दतीचे महत्त्व आहे.

इतिहास विषयाच्या विविध अध्यापन पध्दती पुढीलप्रमाणे आहेत-

१) कथा कथन पध्दती

२) कथन पध्दती

३) आधार पध्दती

४) प्रकल्प पध्दती

५) चर्चा पध्दती

६) व्याख्यान पध्दती

७) डॉल्टन पध्दती

८) समस्या निराकरण पध्दती

**१) कथा कथन पध्दती :**

गोष्ट ऐकणे सर्वांनाच आवडते. लहान मुलांचा तर तो आवडता छंद. परिकथा, युध्द, जादू, इत्यादी नानाविध विषयावरील छोटया छोटया कथा विशेषत: बोधप्रत असणाऱ्या कथा ऐकणे हा लहान वयोगटातील मुलांचा आवडता छंद. लहानपणी आजी-आजोबांकडून मुलांना सुंदर गोष्टी सांगितल्या जातात. मुले गोष्टीत तल्लीन होऊन ऐकतात. विशेषत: आवडीने ते ऐकून त्यामध्ये रममान होतात. कथेच्या माध्यमातून पिढी, परंपरागत बाबी आजही संक्रमित होत आहे. कथा कथन म्हणजे गोष्ट सांगणे. हा सांस्कृतिक वारसा आजच्या आधुनिक काळातही जपल्या जात आहे. इतिहासाच्या अध्यापनात गोष्टीरुपी माहिती म्हणजे कथा कथन पध्दतीचा वापर अत्यंत महत्त्वाचे ठरते.

कथा कथन म्हणजे गोष्ट कथन करणे. इतिहासातील घडलेल्या घटना, प्रसंग यांचे कथेच्या गोष्टीच्या स्वरुपात वर्णन करणे म्हणजेच

कथा कथन होय. इतिहासातील थोर पुरुष, पराक्रमी पुरुष, संत, महात्मे, गुरु यासोबत समाजसुधारक, संशोधक यांच्या जीवनाधारित माहिती गोष्टीच्या स्वरुपात सांगणे म्हणजेच कथा कथन होय. एखादा प्रसंग, युध्दाचे कथा स्वरुपात वर्णन केल्यास मुले आवडीने ऐकतात. सर्व मुलांना इतिहासातील घटनांचे गोष्टीरुपी वर्णन आवडतात. घोडखिंडीतील बाजीप्रभूंचा पराक्रम, तानाजी व सूर्याजीचा कोंढाणा किल्ला, चढाईचे वर्णन, शिवाजी महाराजांचे आग्रा येथून सुटकेचा प्रसंग, शिवाजी व जिजाबाई यांच्या जीवनातील प्रसंग इत्यादी अनेक बाबींचे कथा कथन पध्दतीने अध्यापन केल्यास ते रोचक, मनोरंजक ठरते. विद्यार्थ्यांना लवकर ज्ञान प्राप्ती होते.

♦ **कथा कथन पध्दतीमधील पथ्थे :**

१) जी गोष्ट सांगायची आहे ती शिक्षकास पाठ असावी.

२) गोष्ट सांगणे ही एक कला आहे. त्यामध्ये भाषिक कौशल्ये, हावभाव, आवाजाचा चढ उतार ह्या बाबी शिक्षकाने अंगीकृत केल्या पाहिजे.

३) भाषिक कौशल्यांसोबत गोष्ट सांगतांना विद्यार्थ्यांना गोष्टीत रममान होण्यासाठी आवश्यक तेथे अभिनयाचे प्रकटीकरणसुध्दा शिक्षकाने केले पाहिजे.

४) गोष्टीरुपी प्रसंगाची भाषा सोपी व विद्यार्थ्यांच्या वयोगटानुरुप असावी.

५) विषयभाग पाठयांशानुरुप गोष्ट सांगावी. अपेक्षित उद्दिष्टपूर्ततेसाठी गोष्टीचा वापर करावा. यासोबत विद्यार्थ्यांना गोष्ट सांगणे हे अध्यापनाचे साधन असून अंतिम उद्दिष्ट नाही. ह्याचे भान शिक्षकाने ठेवणे गरजेचे आहे.

६) कथा कथनात आवश्यक तेथे शैक्षणिक साधनांचा योग्य वापर करावा. मुद्यांचे लेखन फलकावर करावे.

७) कथा इतिहासाचे सत्यस्वरुप स्पष्ट करणारे असावे. त्यामध्ये अतिरंजकता नसावी.

अशाप्रकारे कथा कथन अध्यापन पध्दती महत्त्वपूर्ण असून सर्वांसाठी उपयुक्त ठरणारी आहे.

**२) कथन पध्दती :**

इतिहास अध्यापनाच्या विविध पध्दतीपैकी साधारणत: जास्तीत जास्त वापरली जाणारी पध्दत म्हणजे कथन पध्दती होय. कथन करणे म्हणजे सांगणे, वर्णन करणे. इतिहासातील घडलेल्या घटना, प्रसंग, युध्दे तर इत्यादी बाबींचे जसेच्या तसे वर्णन करणे किंवा सांगणे म्हणजे कथन होय. कथन करणाऱ्या अध्यापन पध्दतीला कथन पध्दती म्हणतात.

कथन पध्दती वाटते तितकी सोपी पध्दती नाही कारण कथन करणे हे एक प्रकारचे कौशल्याचे काम आहे. कथन करणे ही एक कला असून जो उत्तम कथन करतो श्रोते त्याचे मंत्रमुग्ध होऊन ऐकत असतात. प्रभावी कथनकाराचे वर्णन किंवा कथन सर्वजण ऐकण्यास उत्सुक असतात. इतिहास विषयाच्या शिक्षकाने जर प्रभावीपणे कथन पध्दतीचा वापर केला तर विद्यार्थ्यांना विषयभागाचे लवकर आकलन होते. विद्यार्थ्यांना इतिहासविषयात रुची निर्माण होण्यास सहाय्यभूत ठरते.

इतिहास विषयाचे अध्यापन करतांना ऐतिहासिक आधारांचे कथन, हडप्पा, सिंधू संस्कृतीबाबत कथन, मौर्य साम्राज्याबाबतची माहिती, गुप्तकालीन सांस्कृतिक ऐतिहासिक बाबी इत्यादींचे कथन करणे

आवश्यक असते. स्वातंत्र्य चळवळीतील विविध घटनांचे वर्णन,

दांडीयात्रा, बार्डोली सत्याग्रह, क्रांतिकारकांचे कार्य इत्यादी बाबत माहिती कथन करावी लागते. अशाप्रकारे कथन पध्दती ही इतिहास विषय अध्यापन पध्दतीस प्रभावी अध्यापन पध्दती आहे.

कथन पध्दतीचा वापर करतांना पुढीलप्रमाणे काळजी घेणे आवश्यक आहे -

१) कथन पध्दतीत शिक्षकास प्रभावी कथन करावे लागते. त्यासाठी विद्यार्थ्यांच्या वयोगट, स्तर लक्षात घेऊन भाषा वापरावी. भाषा सोपी व स्पष्ट असावी.

२) कथन परिणामकारक होण्यासाठी शिक्षकाने भाषिक कौशल्ये, आवाजात चढ उतार, प्रसंगी हावभाव वापरणे गरजेचे आहे. आवश्यक तेथे अभिनय, नाटयीकरण करावे.

३) कथन बोजड, रुक्ष होणार नाही. शब्दाची वारंवारिता टाळून कथनाच्या ओघवतेपणाकडे लक्ष देणे आवश्यक असते.

४) पाठयांश, घटकभाग, उद्दिष्टांची अनुरुप कथन असावे. इतिहासाची सत्यता स्पष्टरुपाने कथनात असावी.

५) कथनात मुद्देसूदपणा असणे गरजेचे असते. कथनातील मुद्दे एकमेकांशी जुळणारे असले पाहिजे.

६) कथनात सर्व विद्यार्थी लक्षपूर्वक श्रवण करीत आहे किंवा नाही याची उलट तपासणी अधून-मधून शिक्षकाने प्रश्न विचारुन करावी.

७) कथन पध्दतीने अध्यापन केलेल्या विषयभागाचे आकलन विद्यार्थ्यांना झाले किंवा नाही याबाबत मूल्यमापन आधारित चर्चा किंवा प्रश्नांचे आयोजन करणे आवश्यक असते.

८) प्रभावी कथनासाठी आवश्यक त्या शैक्षणिक साहित्यांचा वापर करण्याचे कार्य शिक्षकाने प्राधान्याने करावे.

**३) आधार पध्दती :**

इतिहास आधाराशिवाय निराधार आहे, असे कथन केल्यास वावगे ठरणार नाही. आधार म्हणजे स्त्रोत किंवा पुरावा. इतिहासात घडलेल्या घटनांचा पुरावा म्हणजे आधार. त्या आधाराच्या किंवा स्त्रोतांच्या सहाय्याने आजच्या काळात गतकाळात घडलेल्या घटनांचा अभ्यास करु शकतो, अन्वयार्थ लावू शकतो. तत्कालिन काळातील परिस्थितीचे चित्रण, वर्णन उभे करु शकतो. इतिहासात आधारांना अनन्यसाधारण महत्त्व आहे.

इतिहास हे शास्त्र आहे हे आधाराद्वारे सिध्द होते. इतिहासातील घटना, प्रसंगाची सत्यासत्येची तपासणी आधारानेच करता येते. इतिहासाचे सत्य स्वरुप जगासमोर मांडण्यात आधारांची भूमिका महत्त्वपूर्ण ठरते. इतिहासातील या आधार स्त्रोतांच्या वापराद्वारे अध्यापन करणे म्हणजेच आधारपध्दती होय. इतिहासातील अवशेष, नाणी, भांडी खेळणी, चित्रे, रेखाटन, कला-शिल्प, वास्तू, इमारती यासारख्या आधाराने इतिहासातील विषयभाग समजावून सांगणे म्हणजेच आधार पध्दती होय. आधार पध्दतीचा मूळ पाया आधार स्त्रोतावर आहे. आधारांची सत्यता सुध्दा पडताळणे आधार पध्दतीत अपेक्षित असते.

**आधार स्त्रोतांच्या सविस्तर माहितीसाठी प्रकरण २ अभ्यासावे.**

आधारस्त्रोत पध्दतीने अध्यापन करतांना पुढील प्रमाणे काळजी घेणे आवश्यक आहे.

१) शिक्षकाने विषयवस्तू, पाठयांशाची उद्दिष्ट पूर्तता करणाऱ्या आधारांचाच वापर करावा.

२) आधारामुळे संबंधित घटनेचे महत्त्व, वास्तव्य, परिस्थितीचे ज्ञान मिळते. यासोबत इतिहासाचे शास्त्रीय स्वरुप कळते.

३) आधार पध्दतीचा अध्यापनात वापर करतांना संबंधित आधारांची जुळवाजुळव पूर्वीच करावी. त्यासंबंधी पूर्व नियोजन करणे आवश्यक आहे.

४) आधार पध्दतीने वर्गात इतिहासात विषयाशी पूरक असे वातावरण निर्मिती होते. त्याद्वारे विद्यार्थ्यांमध्ये आधारांबाबत संशोधनवृत्ती, चिकित्सकवृत्ती कशी निर्माण होईल याबाबत लक्ष देणे गरजेचे असते.

५) आधाराबाबत सविस्तर, सखोल माहिती शिक्षकाने सर्वप्रथम करुन घ्यावी व नंतरच त्यांचा आधार दयावा.

६) आधारातील भाषा, चिन्हे, प्रतीकांचे स्पष्टीकरण सोप्या भाषेत करणे गरजेचे ठरते.

७) आधार पध्दतीद्वारे विद्यार्थ्यांमध्ये कृतीशीलता, निरीक्षण क्षमतेत वाढ कशी होईल याबाबत नियोजन करणे अपेक्षित असते.

८) विद्यार्थ्यांच्या वर्गस्तर, वयोगटानुसार आधार दयावे.

९) आधार पध्दती अध्यापनानंतर मूल्यमापनपर प्रश्न, चर्चा आयोजन करणे गरजेचे असते.

अशाप्रकारे ऐतिहासिक बाबींचे प्रत्यक्ष ज्ञान व आकलनासाठी इतिहासातील आधार अध्यापन पध्दती प्रत्यक्ष अनुभव देण्यासाठी अत्यंत उपयोगी ठरते व त्याचे अनन्यसाधारण महत्त्व दिसून येते.

**४) प्रकल्प पध्दती :**

अमेरिकन शिक्षणतज्ञ जॉन डयुई यांनी विचारांपेक्षा कृतीला महत्त्व देऊन कृतीतून अनुभव घेऊन विद्यार्थी खूप काही शिकत असतो

ह्या शिक्षणालाच महत्त्व आहे असे मत व्यक्त केले. जॉन डयुई हा प्रकल्प पध्दतीचा जनक मानला जातो. किल पॅट्रिक हयांनी प्रकल्प पध्दतीचा पुरस्कार केला आहे.

♦ **व्याख्या :**

**किल पॅट्रीक यांच्या मते -**

मनापासून विशिष्ट हेतूपूर्तीसाठी स्वीकारलेली व सामाजिक पर्यावरणात पार पाडलेली कृती म्हणजे प्रकल्प

**स्टिव्हन्सच्या मते -**

नैसर्गिक परिस्थिती पूर्णतेस नेलेली समस्याप्रधान कृती म्हणजे प्रकल्प होय.

उपरोक्त तज्ञाच्या व्याख्येवरुन प्रकल्पात कृती पार पाडणे अपेक्षित असते. त्यामधून समस्यांची सोडवणूक करावयाची असते हे महत्त्वपूर्ण ठरते.

♦ **प्रकल्प पध्दतीचा हेतू :**

विद्यार्थांचा ज्ञानात्मक विकासासोबत भावात्मक व क्रियात्मक विकास करणे. विद्यार्थ्यांमध्ये प्रत्यक्ष अनुभव घेण्याची क्षमता विकास करणे. समस्या सोडवणूकीची क्षमता प्राप्ती होणे. विद्यार्थ्यांचा सामाजिक विकास करणे ही प्रमुख उद्दिष्टे प्रकल्प पध्दतीची आहे.

♦ **प्रकल्प पध्दतीच्या पायऱ्या :**

प्रकल्प पध्दतीच्या पाच पायऱ्या आहेत.

**१) प्रकल्पाची निवड :**

प्रकल्प पध्दती विद्यार्थी केंद्रीत पध्दती आहे. प्रकल्प विद्यार्थ्यांना पूर्ण करावयाचा असल्याने प्रकल्पाची निवड करणे हा टप्पा महत्त्वपूर्ण

असतो. विद्यार्थ्यांनी स्वत:च्या आवडीनुसार, जाणवणाऱ्या समस्यांवरुन स्वत: प्रकल्प विषयाची निवड करणे अपेक्षित असते. स्वत: विद्यार्थ्यांनी प्रकल्प विषय निवडला तर त्यांना त्यामध्ये रस निर्माण होईल व ते प्रकल्प पूर्ण आवडीने करतील. शिक्षकांनी स्वत:च्या आवडी निवडी, मत विद्यार्थ्यांच्या प्रकल्प निवडीबाबत लादू नये. विद्यार्थ्यांनी निवडलेला प्रकल्प त्यांच्या वयोगटानुसार, स्तरानुसार, विषयानुसार, शैक्षणिक दृष्टीने कालावधीच्या दृष्टीने उपयुक्त आहे काय याबाबत मात्र मार्गदर्शनपर सूचना कराव्यात. प्रकल्प विषयाची शिक्षकाने स्वत: जवळ यादी तयार केलेली असल्यास त्याचा फायदा होतो. जेव्हा विद्यार्थ्यांना विषयाची निवड करण्यास अडचण येते तेव्हा शिक्षकांजवळ असलेल्या यादीतून त्यांना विषयनिवड करण्याबाबत मार्गदर्शक ठरते. प्रकल्प विषयाची निवडीच्या टप्प्यावर इतर चार टप्पे अवलंबून असल्याकारणाने प्रकल्प विषय निवडतांना वेळ, श्रम, भौगोलिक परिस्थिती, उपलब्ध साधने, आवड, क्षमता याबाबींचे शिक्षकांनी विद्यार्थ्यांना माहिती अवगत करुन दयावी.

प्रकल्प विषयामध्ये विविध प्राचीन वस्तू, भांडी, खेळणे, नाणी यांच्या प्रतिकृती तयार करणे, इमारती, वास्तू, पुतळे, स्मारके यांच्या त्रिमितीय प्रतिकृती बनवणे, विविध लेण्या, शिल्प, शिलालेख यांचे रेखाटन करणे, इतिहासातील थोर महापुरुष, संत, पराक्रमी व शूर पुरुष, क्रांतिकारक यांच्या बाबतची माहिती गोळा करुन लिहिणे, ऐतिहासिक छोटया कालावधीच्या नाटक बसवणे अशा विविध विषयांवर प्रकल्प निवडता येतात.

उदा. इंग्रजकालीन व स्वातंत्र्योत्तर भारतातील चलन, नोटा यांचे चित्र रेखाटन व संग्रह करणे.

**२) प्रकल्पाचे नियोजन :**

प्रकल्पाच्या विषयाची निश्चिती नंतरची दुसरी पायरी म्हणजे प्रकल्पाचे नियोजन होय. यामध्ये प्रकल्प कार्य कसे पूर्ण करावयाचे आहे, त्यासाठी लागणारा वेळ, श्रम, पैसा, साधने कोणती उपलब्ध आहेत व कुठून उपलब्ध करुन दयावयची आहे. यासोबत प्रकल्प गटातील सदस्यांना वाटून देण्याच्या कामाचे नियोजन इत्यादी गोष्टी या टप्प्यात असतात.

एकप्रकारे प्रकल्प विषयाचा कच्चा मसूदा म्हणजेच आराखडा तयार करणे या टप्प्यात अपेक्षित असते.

**३) प्रकल्पाची कार्यवाही :**

प्रकल्प विषयाची निवड केल्यानंतर त्या प्रकल्पाचा आराखडा तयार केल्यानंतरचा टप्पा म्हणजे प्रत्यक्ष प्रकल्प पूर्ण करण्यासंबंधीचे कार्य होय. यामध्ये विद्यार्थी प्रत्यक्ष प्रकल्प पूर्ण करण्यासाठी नियोजनाप्रमाणे कृती करणे, नेमून दिलेले कार्य, कृती पूर्ण करणे, प्रकल्पासंबंधी माहिती, टिपण, गोळा करणे, साहित्य जुळवा जुळव करुन टप्प्यानुसार योग्य कृती करणे. या टप्प्यात शिक्षकाची भूमिका निरीक्षण करुन मार्गदर्शन करण्याची असते. वेळोवेळी विद्यार्थ्यांना शिक्षकांनी प्रोत्साहन देवून प्रकल्प पूर्ण करण्यासाठी गतिशिलता प्रदान करणे गरजेचे असते. या टप्प्यात प्रकल्पाची अंमलबजावणी करण्याचे त्यासंबंधी लेखन सारांश, अनुभव इत्यादी बाबींचे लेखन पूर्ण करणे अपेक्षित असते.

प्रकल्पाची कार्यवाही म्हणजे प्रकल्प पूर्ण करण्यासंबंधीचे कार्य कृती करण्याचा टप्पा होय.

**४) प्रकल्पाचे लेखन :**

प्रकल्प पध्दतीच्या चौथ्या टप्प्यात प्रकल्प निवडीपासून तर प्रकल्प पूर्ण करण्यासंबंधीची सर्व माहितीचे लेखन करणे अंतर्भूत असते. प्रकल्प विषयाचे शीर्षक, प्रकल्पाचा हेतू किंवा उद्देश, प्रकल्प करतांना केलेल्या कृती, बाबी आलेले अनुभव, महत्त्वाच्या बाबी, अडचणी इत्यादी सर्व टिपणांची या टप्प्यात नोंदी घेतल्या जातात. त्या प्रकल्पाला लेखी स्वरुपात पूर्णत्व दिले जाते. प्रकल्पाला लेखनीबध्द केल्यामुळे प्रत्यक्ष पुरावा म्हणून ठेवता येतो. यासोबतच पुढील विद्यार्थ्यांना तो प्रकल्प हाताळता येतो. त्यापासून मार्गदर्शनही मिळते.

**५) प्रकल्पाचे मूल्यमापन :**

प्रकल्प पूर्ण झाल्यानंतरचा शेवटचा टप्पा म्हणजे प्रकल्पाचे मूल्यमापन होय. ही प्रकल्पाची पाचवी पायरी होय. प्रकल्प मूल्यमापन शिक्षक व विद्यार्थी दोघांनाही करणे गरजेचे असते. प्रकल्पाचे कार्य योग्य पध्दतीने झाले किंवा नाही, प्रकल्पात कोणते अनुभव आले, समस्या कोणत्या आल्या, समस्यांची सोडवणूक कशी केली. लेखन मांडणी इत्यादी मुद्यांचा आधारे चिकित्सक मूल्यमापन करणे अत्यंत गरजेचे असते. याबाबत चर्चात्मक पध्दतीने मूल्यमापन केल्यास उपयुक्त ठरते.

अशाप्रकारे प्रकल्पाच्या पाच पायऱ्या आहेत.

**♦ प्रकल्पाचे प्रकार :**

प्रकल्पाचे पुढील प्रकार आहेत.

**१) समस्या प्रधान प्रकल्प :**

या प्रकल्पात विद्यार्थ्यांच्या निगडीत असणाऱ्या समस्या



सोडविणे हा प्रमुख हेतू आहे. विद्यार्थ्यांच्या मनात अनेक शंका येतात.

त्यांना दैनंदिन जीवनात अनेक समस्यांचा सामना करावा लागतो त्या समस्यांचे निराकरणार्थ निवडलेल्या प्रकल्पांचा यामध्ये समावेश होतो.

उदा. ग्रहणे का होतात? कालमापना संदर्भातील प्रश्न, इतिहासातील ऐतिहासिक स्त्रोतांबाबतचे प्रश्न

**२) निर्मिती प्रधान प्रकल्प :**

ज्या प्रकारात विद्यार्थ्यांना निर्मिती करावयाची असते अशा प्रकल्पांना निर्मिती प्रधान प्रकल्प म्हणतात. विद्यार्थ्यांच्या कल्पना, विचारांना प्राधान्य देऊन, त्यांच्या योजना इत्यादींचा उपयोग करुन वस्तू, प्रतिकृती तयार करुन घेणे ह्या हेतुने निर्मिती प्रधान प्रकल्पाचे आयोजन केले जाते. या प्रकारात वास्तू, किल्ले, नाणी, स्तंभाच्या प्रतिकृती तयार करण्यासारखे प्रकल्प हाती घेता येतात. याशिवाय बुध्दीला, विचारांना चालना देणारे प्रकल्प सुध्दा हाती घेतले जातात.

जसे १९४२ च्या चलेजाव चळवळीच्या संदर्भात लोकांचा सहभाग, राजकीय परीणाम, आर्थिक परिणाम इत्यादी संदर्भात यथार्थ दर्शन करविणाऱ्या प्रतिकृती. हडप्पा संस्कृतीमधील अवशेष, नाणी, प्राण्यांच्या प्रतिकृती तयार करणे.

**३) कौशल्य प्रदान प्रकल्प :**

या प्रकल्पाचा मुख्य हेतू विद्यार्थ्यांनी विविध कौशल्य आत्मसात करावी हा असतो. कौशल्य प्रधान प्रकल्पात विद्यार्थ्यांनी प्रत्यक्षकृती करुन नवनिर्मिती करण्याबाबत अपेक्षा असतात. या प्रकल्पात सम्राट अशोक कालीन साम्राज्यसीमा नकाशा, गुप्तकालीन साम्राज्य विस्तार नकाशा रेखाटन करण्यासारखे विषय हाती घेतले जातात.

**४) स्वाध्याय प्रकल्प :**

शिक्षकांच्या मार्गदर्शनाखाली शिक्षकांशी चर्चा करुन विद्यार्थी स्वत: अभ्यास करुन, स्वत: विचार करुन प्रत्यक्ष कृती करणाऱ्या, स्वयं अध्ययनाची आवड निर्माण करणारा प्रकल्प म्हणजे स्वाध्याय प्रकल्प होय.

या प्रकल्पात शिवाजी महाराजांचा राज्यकारभार व लोकप्रशासन, विशिष्ट संत, समाजसुधारकांचे जीवनकार्य व सुधारणा, स्थानिक लोकांकडून मुलाखतीद्वारे कार्य इत्यादी प्रकल्पांचा समावेश होतो.

**५) आस्वाद प्रधान प्रकल्प :**

ज्या प्रकल्पात विद्यार्थ्यांना प्रकल्पकृतीतून आनंद मिळावा हा उद्देश असतो त्याला आस्वाद प्रधान प्रकल्प म्हणतात. यामध्ये इतिहासातील कला, नाटय, संगीत इत्यादी बाबत कार्यक्रमातून प्रकल्प पूर्ण करुन विद्यार्थ्यांना आनंद घेणे उद्देश असतो. जसे ऐतिहासिक प्रसंगाधारीत पोवाडे, गीत, भजन, स्वातंत्र्यचळवळ आधारित स्फूर्तीगीते इत्यादीचे गायन, नाटयीकरण करणे यासारख्या प्रकल्प विषयाचा समावेश असतो. या शिवाय संग्रहात्मक, सर्वेक्षणात्मक इ. प्रकल्पाचे प्रकार आहे.

**♦ प्रकल्प पध्दतीचे गुण :**

१) प्रकल्पातून विद्यार्थ्यांना विविध अनुभव मिळतात. जीवनकौशल्ये आत्मसात करण्यासाठी प्रकल्प पध्दती उपयुक्त ठरते.

२) विद्यार्थ्यांमध्ये श्रमप्रतिष्ठा गुणांची रुजवणूक होते.

३) प्रकल्पासून विद्यार्थ्यांच्या विचार, नवकल्पना, निर्मिती करण्याचा आनंद मिळतो.

४) विद्यार्थ्यांना समस्या सोडवणूकीची दृष्टी प्राप्त होते. विद्यार्थ्यांना समस्या निराकरणाची क्षमता प्राप्त होते.

५) विद्यार्थ्यांना जबाबदारीने काम करण्याची सवय लागते.

६) ज्ञान प्राप्तीसह विविध कृतीतून कौशल्ये प्राप्ती होते.

७) इतिहास विषयाचे प्रात्यक्षिक ज्ञान मिळते. इतिहास विषयात रुची निर्माण होण्यास सहाय्यभूत ठरते.

८) विद्यार्थ्यांमध्ये सहकार्य वृत्ती वाढते.

♦ **प्रकल्प पध्दतीचे दोष :**

१) इतिहासातील सर्व घटक, विषय भागासाठी प्रकल्प पध्दती उपयुक्त ठरेल असे नाही.

२) प्रकल्प पूर्ण करणे यामध्ये यांत्रिकपणाचा समावेश होण्याची शक्यता नाकारता येत नाही.

३) प्रकल्पात सर्व विद्यार्थी तेवढयाच कौशल्याने, मनाने सहभागी होतील असे नाही.

४) प्रकल्प पध्दतीत वेळ, श्रम व पैसा जास्त खर्च होतो.

५) प्रकल्पाकरीता शिक्षकांचे वेळोवेळी योग्य मार्गदर्शनाची गरज असते. ते मिळेलच असे सांगता येत नाही.

६) या पध्दतीने अभ्यासक्रम नियोजित कालावधीत पूर्ण होणे शक्य नसते.

७) प्रकल्प विद्यार्थ्यांच्या आवडीचा नसेल तर प्राप्त करावयाची उद्दिष्टपूर्ती होणे शक्य नाही.

♦ **प्रकल्प पध्दतीमध्ये घ्यावयाची काळजी :**

१) प्रकल्प विद्यार्थी केंद्रित असावा.



२) विषयाची निवड स्वत: विद्यार्थ्यांने करावी.

३) प्रकल्प विद्यार्थ्यांच्या वयोगट, स्तर, स्थानिक परिस्थिती नुसार व कालावधीचा विचार केलेला असावा.

४) अपेक्षित उद्दिष्ट प्राप्ती, अभ्यासक्रमाधारित प्रकल्प असावा.

५) प्रकल्पात कृतीला महत्त्व, विद्यार्थ्यांचा विचार, कल्पनाशक्तीस वाव देणारा असावा.

६) आवश्यक तेथे वेळीच शिक्षकाने मार्गदर्शन करावे.

**५) चर्चा पध्दती :**

लहान बालकापासून तर वृध्दांपर्यंत सर्वांना चर्चा करायला आवडते. विद्यार्थी आपल्या सहकारी वर्गमित्रांसोबत सदैव चर्चा करीत असतात. त्याच्या जीवनातील घटना, प्रसंग, अनुभव, समस्या बाबत एकमेकांशी चर्चा करतात. त्यांच्या अनुभव विश्वाशी संबंधित ह्या चर्चा असतात. या चर्चेला उद्देश असेल, शास्त्रीय आधार असेल हे मात्र सांगता येत नाही.

अध्यापन पध्दतीला मात्र शास्त्रीय आधार असतो, उद्देश असतो. ह्या चर्चेला जर शास्त्रीय बैठक, शास्त्रशुध्दपणा प्राप्त करुन दिली तर ती अध्यापनाची चर्चा पध्दती होय. शिक्षण प्रक्रिया विद्यार्थी केंद्रित असणे आवश्यक असते. चर्चा पध्दती याबाबत उपयुक्त ठरते.

चर्चा पध्दतीत शिक्षकाने नियोजनपूर्वक इतिहासातील घटना, प्रसंग, समस्या, विधान विद्यार्थ्यांसमोर मांडावी. त्यावर विद्यार्थ्यांनी ती घटना, प्रसंग समस्येची कारणे, पार्श्वभूमी, घटनेचे विवरण, विस्तार, परिणाम, घटक, संबंधित बाबीवर सविस्तर चर्चा करुन आपली मते प्रदर्शित करावी. चर्चे मागील उद्देश डोळयासमोर ठेवून चर्चेतून तो उद्देश पूर्ण होतो किंवा नाही याबाबत तपासणी करणे चर्चा योग्य दिशेने आहे किंवा नाही, सहेतूक आहे किंवा नाही याबाबत चाचपणी करावे.

वेळोवेळी मार्गदर्शन करावी. विद्यार्थ्यांनी चर्चेअंती मांडलेल्या मतांवर सुध्दा चर्चा आयोजन करावी. असे चर्चा पध्दतीचे स्वरुप असते. चर्चेतून विद्यार्थ्यांना संबंधित बाबींचे सखोल ज्ञान, माहिती मिळावी, विचारशक्तीस चालना मिळावी, चिकित्सक दृष्टीकोनातून विचार करण्याची क्षमता प्राप्त व्हावी असा चर्चा पध्दतीचा हेतू असतो. आपल्या सहकाऱ्यांसोबत, सवंगड्यासोबत चर्चा करणे, बोलणे त्यांना आवडते याचाच फायदा घेऊन इतिहास विषयातील विषयांश, घटक भागावर चर्चा घडवून आणल्यास विद्यार्थ्यांना अध्ययनास पूरक व सुलभता प्रदान होते.

विद्यार्थ्यांना चर्चेद्वारे ज्ञानासोबत सहकार्य प्रवृत्ती, दुसऱ्यांची मते जाणून घेणे, दुसऱ्याच्या मतांचा आदर करणे, त्या विषयावरील सर्व बाजूंनी विचार करुन इतिहासातील सत्य जाणून घेणे. चिकित्सक व निर्दोष मते तयार करण्यासह आपली मते ठामपणे समजावून देणे, सभाधीटपणा अंगी आणणे इत्यादी बाबीसाठी चर्चा पध्दती अत्यंत उपयुक्त आहे.

चर्चा पध्दतीचा उपयोग करतांना शिक्षकाने पूर्वनियोजन करणे आवश्यक असते. चर्चेसाठी विषय, अट इत्यादी बाबी पूर्वीच विचारात घ्यावे. चर्चेचे विषय, विद्यार्थ्यांचा गट, घटक भाग, स्तर, उद्दिष्ट पूर्तता यासर्व गोष्टीचा सांगोपांग विचार करुनच चर्चा पध्दती उपयोगात आणावी. चर्चा विद्यार्थी केंद्रित राहील, सहेतूक व उद्दिष्टपूर्ण राहील याकडे कटाक्षाने लक्ष दयावे.

♦ **चर्चा पध्दतीचे प्रकार पुढीलप्रमाणे आहेत -**

१) गट चर्चा



२) परिसंवाद

३) कृती सत्र

४) बुध्दिमंथन

**उपरोक्त प्रकारांच्या सविस्तर अध्ययनासाठी प्रकरण ७ मधील मुद्दे अभ्यासावेत.**

**६) व्याख्यान पध्दती :**

प्राचीन काळापासून परंपरागत पध्दतीने आलेली पध्दती म्हणजे व्याख्यान पध्दती होय. व्याख्यान पध्दती ही सर्वात जुनी पध्दती आहे. ही पध्दती प्रामुख्याने शिक्षक केंद्रित आहे. इतिहासातील एखादया विषयभागावर, घटकावर, पाठयांशावर सलगपणे, समग्रपणे स्पष्टीकरण करावयाचे किंवा अभ्यासपूर्ण मत मांडणी करावयाची असल्यास व्याख्यान पध्दती उपयुक्त ठरते. जास्त विद्यार्थी संख्येच्या गटाला, वर्गाला शिक्षक व्याख्यान पध्दतीने विषयभाग समजावून सांगतो.

विषयाचे समग्र घटक समजावून सांगण्यासाठी दिलेली माहिती म्हणजे व्याख्यान पध्दती. यामध्ये विषयाचे प्रतिपादन करणे, आशयाचा परिचय करुन देणे अंतर्भूत असते.

♦ **व्याख्यान पध्दतीमधील तत्वे :**

व्याख्यान पध्दतीची तत्वे पुढीलप्रमाणे

१) विद्यार्थ्यांच्या श्रवणावर अधिक भर असतो.

२) प्रस्तुतीकरण, विषयाची माहितीचे ज्ञान देणे.

३) व्याख्यानाद्वारे पाठ्यवस्तूचे सलगपणे प्रस्तुतीकरण.

४) विविध विषयांशी समन्वय साधणे.

५) व्याख्यानासाठी प्रश्नोत्तर, अध्यापन साधनांचा वापर करणे.

♦ **व्याख्यानातील घटक :**

**१) विषयावरील प्रभुत्व :**

व्याख्यान पध्दतीमध्ये शिक्षकाला ज्या विषयघटक, पाठ्यवस्तूचे व्याख्यान दयावयाचे आहे. त्यावर विशेष प्रभुत्व असणे गरजेचे आहे. शिक्षकाला त्याबाबत सखोल ज्ञान असणे गरजेचे आहे. त्या विषयावर त्याचे वाचन, मनन, चिंतन सखोल झालेले असावे. संदर्भ पुस्तके, वर्तमानपत्रातील लेख, मासिके इत्यादी पुरवणी वाचन सखोल केलेले असावे. विषयावर प्रभुत्व असल्याखेरीज शिक्षकास आत्मविश्वास प्राप्त होणार नाही व तो व्याख्यान योग्यपणे देऊ शकणार नाही.

तात्पर्य व्याख्यानातील विषयावर प्रभुत्व प्राप्त करणे हा महत्त्वाचा घटक आहे.

**२) उद्दिष्टे :**

व्याख्यानाचा उद्देश निश्‍चित असावा. व्याख्यान कोणत्या विषयघटक, भाग, पाठ्यवस्तूसाठी आहे त्याची उद्दिष्टे शिक्षकाच्या डोळयासमोर असावी. व्याख्यानातून काय हेतू साध्य करावयाचा आहे ह्बाबत स्पष्टता असावी. अपेक्षित बदल काय याची नोंद असावी.

व्याख्यान पध्दतीचा वापर करतांना व्याख्यानाची उद्दिष्टे शिक्षकाने निश्‍चित करणे गरजेचे आहे.

**३) विद्यार्थी स्तर :**

वर्गात व्याख्यान देतांना त्या वर्गातील विद्यार्थ्यांचा वयोगट, त्याचे अनुभव विश्व, त्यांचा स्तर, पूर्वज्ञान इत्यादी बाबींचा विचार शिक्षकाने करणे आवश्यक आहे. व्याख्यानातून शिक्षकाला आपल्या

ज्ञानाचे प्रदर्शन करावयाचे नसते तर ते ज्ञान विद्यार्थ्यांच्या गळी उतरावयाचे असते. त्याने केलेले सखोल वाचन व्याख्यानातून विद्यार्थ्यांसमोर मांडतांना पचेल असे दयावयाचे असते.

विद्यार्थ्यांचा स्तर लक्षात घेणे महत्वाचे ठरते.

**४) कालावधी :**

व्याख्यान पध्दतीचा वापर करतांना संबंधित पाठ्यवस्तु संबंधीच्या व्याख्यानासाठी कालावधी लक्षात घेणे आवश्यक असते. वेळेचे नियोजन करुन व्याख्यान करणे गरजेचे असते.

**५) पूर्वनियोजन :**

पाठ्यवस्तूची निवड, त्याची अपेक्षित उद्दिष्टे, कालावधी यासोबत व्याख्यानाचा प्रारंभ, मध्य व शेवट या सर्वांचा विचार करणे गरजेचे आहे. व्याख्यानासाठी प्रश्न कोणते निवडावे, अध्यापन साहित्यांची गरज आहे काय या सर्व बाबी पूर्व नियोजनात विचार केलेल्या असाव्यात.

**६) विषय सादरीकरण :**

व्याख्यान पध्दतीमध्ये ज्या पाठ्यवस्तूचे सादरीकरण, व्याख्यान दयावयाचे आहे, मांडणी करावयाची आहे. त्या बाबी विषयी सखोल, अवांतर संदर्भ वाचन करुन त्याबाबत योग्य सूत्रबध्दता, क्रमबध्दता आवश्यक तेथे फलककार्य, दृक-श्राव्य साधनांचा वापर, आकृत्या, प्रयोग, ध्वनिफिते, चित्रफिते दाखविणे इत्यादींची मांडणी करणे आवश्यक ठरते.

विषय विवेचनात व्याख्यानाची भाषा सोपी परंतु प्रभावी असावी, योग्य त्या ठिकाणी हावभाव, चढउतार करावा, विद्यार्थ्यांचे

अवधान टिकून राहील यासाठी प्रश्नकौशल्याचा वापर करावा.

विषयप्रतिपादन प्रभावी ठरल्यास व्याख्यान प्रभावी झाले असे गृहीत धरावे.

अशाप्रकारे व्याख्यान पध्दतीचे घटक आहेत.

♦ **व्याख्यान पध्दतीचे गुण :**

१) मोठया संख्येच्या वर्गाला, उच्च वयोगटाला व्याख्यान पध्दती उपयुक्त ठरते.

२) कमी कालावधीत जास्तीत जास्त माहिती देता येते.

३) नवीन भाग, सिध्दांत, घटना, कठिणभाग सोप्या पध्दतीने समजावून देता येते.

४) विषयांशी संबंधित सखोल माहिती प्रभावीपणे देता येते.

५) आवश्यक तेथे साधनांचा वापर प्रभावीपणे करता येतो.

६) राष्ट्रभक्ती, राष्ट्रीय एकात्मता सारख्या गुणांचा विकास होतो.

♦ **व्याख्यान पध्दतीचे दोष :**

१) व्याख्यान पध्दती शिक्षक केंद्रित आहे.

२) विद्यार्थी फक्त श्रोत्यांच्या भूमिकेत अधिक काळ असतात.

३) व्याख्यान कंटाळवाणे असल्यास त्यापासून अपेक्षित उद्दिष्टे साध्य होणार नाही.

४) विद्यार्थ्यांना स्वयंअध्ययन करण्याचा अनुभव कमी मिळतो.

५) जो घटक फक्त वाचून समजतो त्यासाठी व्याख्यान पध्दतीचा वापर वेळ दवडण्यासारखे आहे.

६) व्याख्यान पध्दतीद्वारे दिलेली माहिती चिरकाल स्मरणात राहील याची शाश्वती कमी आहे.



७) विद्यार्थ्यांच्या आकलनशक्ती, तर्कशक्तींचा विकास होत नाही.

**७) समस्या निराकरण पध्दती :**

दैनंदिन जीवन जगतांना, अध्ययन करतांना विद्यार्थ्यांना अनेक अडचणी येतात. जेव्हा निर्माण झालेल्या अडचणींचा, समस्यांचा सोडवण्याचा प्रयत्न केला जातो तेव्हा त्याला समस्या निराकरण पध्दती असे म्हणतात.

जॉन डयुई समस्या निराकरण पध्दतीचे पुरस्कर्ते आहेत. इतिहास विषयाची सखोलता, व्याप्ती बघता समस्या निराकरण पध्दतीस वाव आहे. या पध्दतीने इतिहास विषयाचे अध्यापन करतांना विद्यार्थ्यांमध्ये समस्या सोडवण्यासाठी कराव्या लागणाऱ्या विचारशक्तीचा विकास, त्या समस्यांवर उपाय शोधण्यासाठी कल्पना शक्तीचा विकास यासारख्या मानसिक शक्तींचा विकासांसह त्या समस्यांच्या उपाययोजनांची अंमलबजावणी करतांना कराव्या लागणाऱ्या कृतीचे, उपायांमुळे शारीरिक शक्तींचा विकास होतो.

समस्या पध्दती विद्यार्थी केंद्रित पध्दती असून विद्यार्थ्यांना स्वत:च समस्या सोडविण्यासाठी प्रयत्न करावा लागतो. विद्यार्थ्यांच्या समक्ष शिक्षकाने उपस्थित केलेल्या किंवा योजना केलेल्या समस्या त्यांच्या वयोगटानुसार असाव्यात. इतिहास विषयाशी, पाठ्यवस्तुशी निगडीत असाव्यात. उद्दिष्टांची पूर्तता करणाऱ्या असाव्यात. या समस्यांच्या सोडवणूकीतून निर्णयक्षमता, कल्पनाक्षमता, आत्मविश्वास या सारख्या मानसिक क्षमतांचा विकास व्हावा. समस्यांचे निराकरण करतांना विद्यार्थ्यांना विविध घटकांचा अभ्यास करावा लागतो. अनुभव प्राप्त होते. त्यामधून विद्यार्थ्यांना ज्ञान प्राप्ती होते. स्वयंअध्ययनास रुची निर्माण होते.

**♦ समस्या निराकरण पध्दतीच्या पायऱ्या :**

समस्या निराकरण अध्यापन पध्दतीच्या पाच पायऱ्या पुढीलप्रमाणे-

**१) समस्या निश्चिती :**

समस्या निराकरण पध्दतीची ही पहिली पायरी. यामध्ये समस्या अनेक असतात. किंवा एका समस्येत अनेक समस्यांचा समावेश असतो. अनेक समस्येची गुंतागुंत असते यामधून स्पष्टपणे कोणत्या समस्येचा अभ्यास करणे गरजेचे आहे हे ठरविणे आवश्यक ठरते. त्या समस्यांची निश्चिती करणे ही पहिली पायरी. समस्या निश्चिती करतांना वयोगट, स्तर, साधनांची उपलब्धता लक्षात घ्यावी.

**२) परिस्थितीचे अवलोकन :**

समस्या ठरविल्यानंतरची त्यावर विचारचक्र करणे, त्या समस्याच्या विविध पैलुंबाबत, साधनांबाबत, पध्दतीबाबत विचार करणे म्हणजे समस्यांचे अवलोकन करणे म्हणजे दुसरी पायरी होय.

**३) कारणांचा शोध :**

समस्यांची नेमकी कारणे शोधणे ही तिसरी पायरी होय. समस्यांच्या कारणांचा शोध घेण्यासाठी पुस्तके वाचन, संदर्भ वाचन इत्यादी कृती करुन नेमक्या कारणांची क्रमवारी करणे या पायरीत अपेक्षित असते.

**४) कारणांची तपासणी :**

समस्यांच्या कारणांचा शोध, क्रमवारी लावल्यानंतर त्याबाबतची उपलब्ध माहिती शोधून ती तपासणे, विविध आधारावरुन त्यांची कसोटी घेऊन त्यांची तपासणी करणे. त्यातून स्वत:चे निष्कर्ष काढण्याची ही चौथी पायरी होय. निष्कर्षाच्या नोंदी घेणे या पायरीत अपेक्षित असते.

**५) पडताळा :**

समस्याच्या कारणांची तपासणी केल्यानंतर जी निष्कर्षे काढली, त्यावर उपायोजना सुचविल्यानंतर त्यांचा पडताळा, मूल्यांकन करण्याची ही शेवटची पायरी होय. या पायरीत कार्यवाही बाबत चिकित्सक मूल्यांकन केले जाते.

**♦ समस्या निराकरण पध्दतीचे गुण :**

१) विद्यार्थ्यांच्या क्रियाशीलतेस वाव देणारी पध्दती आहे.

२) विद्यार्थ्यांना स्वत: समस्यांचा शोध घेऊन समस्या निराकरण करण्याचा आनंद मिळतो.

३) विद्यार्थ्यांना जीवनातील समस्या सोडविण्याबाबत क्षमता प्राप्त होते.

४) समस्या सोडवितांना विविध पुस्तकांचे वाचन करणे अपेक्षित असते. विद्यार्थ्यांना अनुभव प्राप्त होतात त्यामधून विद्यार्थ्यांना ज्ञान प्राप्ती होते. स्वयं अध्ययनाची सवय लागते.

५) विद्यार्थ्यांमध्ये विचारक्षमता, कल्पना क्षमता, मनन, चिंतन, चिकित्सक विचार करणे यासारख्या मानसिक क्षमतांचा विकास होतो.

६) ही विद्यार्थी केंद्रित पध्दती असून शारीरिक क्षमतेस वाव देण्यास प्रेरीत करणारी पध्दती आहे.

७) सामाजिक समस्यांची ओळख विद्यार्थ्यांना होते.

**♦ समस्या निराकरण पध्दतीचे दोष :**

१) प्रत्येक विषयघटक, पाठ्यवस्तू या पध्दतीने शिकवणे शक्य नाही.

२) विद्यार्थ्यांना समस्या शोधून कारणे शोधणे उपाय सुचवणे, चिकित्सक विचार करणे, तथ्ये मांडणे, पडताळा करणे यासारख्या मानसिक

क्रिया सर्व विद्यार्थ्यांच्या क्षमता सारख्याच असतील असे नाही. व्यक्तिभेदामुळे या पध्दतीत अडचण निर्माण होते.

३) या पध्दतीने अभ्यासक्रम नियोजित वेळेत पूर्ण होणे शक्य नाही. या पध्दतीला वेळ अधिक लागतो.

४) या पध्दतीचा वापर करतांना शिक्षकांमध्ये विशेष कौशल्ये असणे आवश्यक आहेत. अन्यथा ही पध्दती फारशी उपयुक्त ठरत नाही.

असे असले तरी इतिहासात समस्या निराकरण पध्दती योग्य ठिकाणी वापरल्यास इतिहास विषयातील ज्ञान प्राप्ती होण्यास मदत होते.

**८) डॉल्टन पध्दती :**

या पध्दतीस वैयक्तिक पध्दती असे सुध्दा म्हणतात. डॉल्टन गावावरुन डॉल्टन पध्दती हे नाव प्राप्त झाले. या पध्दतीचे जनक हेलीन पार्कहस्ट हे आहेत. या पध्दतीमध्ये विद्यार्थी स्वत:च अध्ययन करुन शिकतात. ज्ञान प्राप्त करतात. शिक्षक हा फक्त मार्गदर्शक असतो. यापध्दतीमध्ये प्रत्येक विद्यार्थ्याला स्वत:च्या गतीने शिकण्याचे स्वातंत्र्य असते. विद्यार्थी, संदर्भ, पुरवणी वाचन, स्वत:चे अनुभव, शैक्षणिक साहित्यातून अध्ययन करतो ज्ञान प्राप्त करतो. यासाठी इतर सहकाऱ्यांसोबत चर्चासुध्दा करतो. ते करतांना परस्पर सहकार्य भावना, मदत करणे याबाबी विद्यार्थ्यांमध्ये आपोआप रुजतात.

डॉल्टन पध्दतीमध्ये वर्गाध्यापनासारख्या बाबी नसते. त्यामध्ये प्रत्येक विषयासाठी स्वतंत्र कक्ष असतो. प्रयोगशाळा असते. त्या कक्षात पुस्तके, उपकरणे, नकाशे, चित्रे, तक्ते, आराखडे, संदर्भ पुरवणी वाचन साहित्ये ठेवलेली असतात. विद्यार्थी त्या कक्षात शिक्षकाच्या

देखरेखीखाली स्वतः अभ्यास करतो. जो विषय, घटक भाग आवडतो तो निवडतो, या पध्दतीमध्ये ठराविक साचेबंध वेळापत्रक नसते. ठराविक तास नसतात. विद्यार्थी स्वतःच्या गतीनुसार अभ्यास करतो, प्रश्नांची उत्तरे देतो, लिहितो, त्यांची उत्तरे शिक्षक तपासून योग्य मार्गदर्शन करतात. पुढील स्वाध्याय कार्य देतात. शिक्षकांच्या समाधानानंतरच पुढील स्वाध्याय कार्य, अभ्यास देण्यात येते.

**♦ डॉल्टन पध्दती वापरतांना घ्यावयाची काळजी :**

१) विद्यार्थ्यांचा स्वाध्याय वयोगट, स्तरानुसार उद्दिष्ट पूर्ती करणारा असावा.

२) शिक्षकांनी विद्यार्थ्यांच्या स्वाध्याय करतांना उपस्थित राहून योग्य मार्गदर्शन करावे.

३) कक्ष हवेशीर असावा. प्रत्येक विद्यार्थ्यांसाठी स्वतंत्र बाक व्यवस्था असावी.

४) कक्षात आवश्यक तेवढी पुस्तके, साहित्ये उपकरणे असावीत.

५) व्यक्तिभेदाचा विचार करुन स्तरनिहाय वैयक्तिक मार्गदर्शन करावे.

६) वेळोवेळी शिक्षकाने प्रगतीच्या नोंदी ठेवाव्यात. त्या विद्यार्थ्यांच्या निदर्शनास आणून दयावे.

**♦ डॉल्टन पध्दतीचे फायदे :**

१) ही पध्दत विद्यार्थी केंद्रित आहे. विद्यार्थ्यांना स्वयं अध्ययनाची सवय लागते.

२) विद्यार्थी स्वतः अभ्यास करतात. त्यामुळे स्वावलंबी व आत्मनिर्भर बनतात.

३) विद्यार्थ्यांमध्ये आत्मविश्वास निर्माण होतो.

४) विद्यार्थी आपल्या गतीनुसार, कुवतीनुसार अभ्यास करतात.

५) विद्यार्थ्यांना सखोल ज्ञान मिळते. टिपण काढणे, प्रश्नोत्तर सोडवणे यासारख्या कृतीमुळे अनुभवप्रधान ज्ञान प्राप्ती होते.

६) शैक्षणिक साहित्यांचा वापर, सहकाऱ्यांशी चर्चा केल्यामुळे ज्ञान पक्के होते व सहकार्याची भावना वाढीस लागते.

७) शिक्षकाला विद्यार्थ्यांच्या विषयातील प्रगतीची माहिती होते व त्यानुसार मार्गदर्शन करता येते.

♦ **डॉल्टन पध्दतीच्या मर्यादा :**

१) सर्वच शिक्षक या पध्दतीचा वापर करु शकत नाही.

२) ही पध्दत वेळखाऊ व खर्चिक आहे.

३) सर्वच विषय घटक, पाठ्यवस्तूसाठी ही पध्दती वापरता येत नाही.

४) या पध्दतीने नियोजित अभ्यासक्रम पूर्ण होणे शक्य नाही.

५) स्वतंत्रकक्ष, स्वतंत्र साहित्य उपकरणे इत्यादींचे नियोजन करणे यासोबत तज्ञ शिक्षक भारतासारख्या देशासाठी कठिण आहे.

६) स्वाध्याय सोडविणे किंवा प्रश्नांची उत्तरे देणे म्हणजेच ज्ञानप्राप्ती नव्हे.

७) विद्यार्थ्यांवर संस्कार करण्यासाठी ही पध्दती उपयुक्त नाही.

८) काही विद्यार्थ्यांची प्रगती भरपूर तर काही खूपच मागे असा असमतोल निर्माण होण्याची शक्यता आहे.

उपरोक्त विविध अध्यापन पध्दतीच्या सखोल चर्चेअंती असे लक्षात येते की इतिहासाच्या शिक्षकाला इतिहास विषयातील विविध

घटक, भाग, पाठ्यवस्तुचे अध्यापन करतांना विद्यार्थ्यांचा स्तर, वयोगट, पाठाची उद्दिष्टे, उपलब्ध साहित्ये, साधन सामुग्री यांचा विचार करुन जी उपयुक्त ठरेल त्याच अध्यापन पध्दतीचा वापर करणे क्रमप्राप्त ठरते. विद्यार्थ्यांना ज्ञान देणे, माहिती देणे. विविध क्षमतांचा विकास करणे ह्साठी कधी व्याख्यान तर कधी प्रकल्प पध्दती वापरावी लागेल. शिक्षकाने त्याच्या कौशल्यानुसार त्याने उद्दिष्ट पूर्तीसाठी कोणती पध्दती वापरावी व त्याचा वापर कसा करुन घ्यावा हे ठरवावे. सर्वच अध्यापन पध्दती उपयुक्त आहेत व सर्वच पध्दतीत गुण दोष आहेत. त्यामुळे शिक्षकाने विचारपूर्वक अध्यापन पध्दतीचा वापर करावा.

*****

# प्रकरण - ९

## इतिहास अभ्यासक्रम व पाठ्यक्रम

♦ **अभ्यासक्रम :**

देशाला निश्चित दिशा देण्याचे त्यानुसार विकास करण्याचे साधन म्हणजे शिक्षण. देशाचे भविष्यकालीन चित्र पूर्ण करण्याचे माध्यम म्हणजे शिक्षण. शिक्षणाची उद्दिष्टे साध्य करण्यासाठी अभ्यासक्रमाचे नियोजन करण्यात येते. अभ्यासक्रम म्हणजे शिक्षणाची ध्येये साध्य करण्याचे महत्त्वपूर्ण साधन होय.

♦ **व्याख्या :**

**कार्लटन व वॉशबर्न च्या मते –**

अभ्यासक्रम म्हणजे विद्यार्थ्यांच्या दृष्टीकोन किंवा वर्तनाच्या विकासावर परिणाम करणाऱ्या सर्व साहित्ये, सामग्री व कृतींचा समावेश होय.

**Hollis L च्या मते –**

"The curriculum consists of experiences the learner has under the direction of the school. The curriculum now focuses attention upon what kind of experience the learner should have nature than upon the subject the should study".

♦ **अर्थ :**

अभ्यासक्रमासाठी इंग्रजी पर्यायी शब्द म्हणजे Curriculum. Curriculum या शब्दाची उत्पत्ती लॅटीन भाषेतील Currie म्हणजे धावपट्टी race cource याचा अर्थ धावण्याचे मैदान होय.

शिक्षणाची ध्येये, उद्दिष्टे यांची पूर्तता अभ्यासक्रमातून होते. भारत देशाच्या दृष्टीने राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखडा तयार केला जातो. त्यानुसार प्रत्येक विषयाच्या अनुषंगाने अभ्यासक्रम तयार करण्यात येते. राष्ट्रीय पातळीवर NCERT (राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली) ही संस्था अभ्यासक्रम तयार करते. १९८६ च्या शैक्षणिक धोरणानुसार अभ्यासक्रम आराखडा तयार झाला. यासोबत २०१५ मध्ये NCF म्हणजे राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखडा नजीकच्या काळात तयार करण्यात आला आहे. २०१९ चे राष्ट्रीय शैक्षणिक धोरण देखील अंतिम टप्प्यात आहे. १९८६ च्या राष्ट्रीय शैक्षणिक धोरणातील दहा पायाभूत घटक, दहा मूल्ये इतिहासातून साध्य होतात.

**♦ अभ्यासक्रम रचनेची तत्वे :**

१) अभ्यासक्रम सर्वसमावेशक असावा. इतिहासाच्या दृष्टीने स्थानिक, देश, आंतरराष्ट्रीय स्तर यांचा समावेश असावा.

२) अभ्यासक्रम देशाच्या दृष्टीने गाभाभूत घटकांचा समावेश असावा.

३) अभ्यासक्रम विद्यार्थ्यांच्या वयोगट, स्तर, अभिरुची, अभिवृत्तीस पोषक असावा.

४) अभ्यासक्रमातून उद्दिष्टे साध्य होणारे असावे.

५) अभ्यासक्रम लवचिक व परिवर्तनीय असावा.

६) अभ्यासक्रमात मानवाच्या सर्वांगिण अंगाचा सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक इ. बाबींचा स्पर्श असावा.

७) विद्यार्थ्यांच्या विकासाच्या दृष्टीने परिपक्व असावा.



८) अभ्यासक्रम कालक्रमबद्ध असावा.

♦ **अभ्यासक्रमाचे महत्त्व :**

अभ्यासक्रमाचे शिक्षणात अनन्यसाधारण महत्त्व आहे. ते पुढील प्रमाणे -

१) शिक्षणाची, विषयाची उद्दिष्टे, ध्येये साध्य करण्याचे साधन आहे.

२) शिक्षकांना अभ्यासक्रमामुळे नियोजन करुन निश्चित दिशा मिळते.

३) अभ्यासक्रमातून कोणत्या उद्दिष्टांची पूर्तता करावयाची आहे. त्यानुसार अध्ययन-अध्यापन कार्य करणे सोपे जाते.

४) शिक्षणात गुणवत्ता राखण्याचे कार्य अभ्यासक्रमाद्वारे केले जाते.

५) अभ्यासक्रम सर्वांसाठी असतो. त्यामुळे राष्ट्रीय पातळीवर एकजिनसीपणा राखण्याचे कार्य होते.

♦ **पाठ्यक्रम :**

अभ्यासक्रम निश्चित झाल्यानंतर संबंधित इयत्तेसाठी पाठ्यक्रम ठरविला जातो. पाठ्यक्रम हे अभ्यासक्रमाचे अंशरुप होय. तो विशिष्ट इयत्तेसाठी दिला जातो.

विशिष्ट इयत्तेसाठी विशिष्ट विषयाच्या अध्ययन अध्यापनाचे योजनाकार्य म्हणजे पाठ्यक्रम होय.

अभ्यासक्रम व्यापक असतो तर पाठ्यक्रम बंदिस्त असतो. पाठ्यक्रमाचे छोटे स्वरुप असते. अभ्यासक्रम विशिष्ट ध्येये व उद्दिष्ट निश्चिती करतात तर पाठ्यक्रमाच्या माध्यमातून ती ध्येये व उद्दिष्टे साध्य केली जातात. त्यानुषंगाने विविध कार्ययोजना आखल्या जातात.

♦ **व्याख्या :**

**वेबस्टर डिक्शनरी नुसार -**

"A compendium containing the heads of discourse and the like an abstract."

**फ्रीबेस नुसार** -

"A syllabus is an outline and summery of the topics to be covered in an education or training course. It is descriptive. A Syllabus is often either set out by an exam boards or prepared by the professor who supervises or controls the course quantity. "

तात्पर्य पाठ्यक्रम हे अभ्यासक्रमाचे छोटे रुप आहे.

**♦ इतिहास अभ्यासक्रम व पाठ्यक्रम नियोजनाच्या विविध पध्दती-**

विविध शिक्षक तज्ञांनी विविध पध्दती सूचविल्या आहेत. त्या पुढीलप्रमाणे-

१) कालक्रम पध्दती (Chronolgical Method)
२) समकेंद्र पध्दती (Concentric Method)
३) परावर्तन पध्दती (Regressive Approach)
४) चरित्र पध्दती (Biographical Method)
५) आधार पध्दती (Source Method)
६) विशिष्ट विषय पध्दती (Topical Method)
७) पॅच पध्दती (Patch Method)
८) कालखंड पध्दती

**१) कालक्रम पध्दती (Chronological Method) :**

या पध्दतीचे उद्‍गाते डॉ. लॉरी हे आहेत. या पध्दतीमध्ये इतिहासातील घटनांना कालक्रमानुसार लावून प्रत्येक इयत्तेसाठी विशिष्ट कालखंड निश्चित केला जातो. मनुष्याच्या जीवनातील जन्म, बालपण, किशोरावस्था, तारुण्यावस्था, प्रौढावस्था, वृध्दत्व अशा कालानुसार घटना

घटित होत असतात. तशाच प्रकारच्या घटना इतिहासात घडलेल्या आहे. मानवाच्या अस्तित्वापूर्वीपासून तर मानवाच्या उत्क्रांतीपर्यंत तसेच सध्यास्थिती पर्यंत घडलेल्या घटनांचा निश्चित क्रमानुसार संबंधित इयत्तेस दिला जातो यालाच कालक्रम पध्दती म्हणतात.

भारतीय इतिहासाच्या संदर्भात प्राचीन भारत, मध्ययुगीन भारत, आधुनिक भारत हा कालक्रम ठरेल.

**२) समकेंद्री पध्दती (Concentric Method) :**

या पाठ्यक्रमाच्या पध्दतीमध्ये अभ्यासाचा केंद्रबिंदू ठरवून या केंद्रबिंदूच्या भोवती विद्यार्थ्यांच्या वयोगट, वर्गाच्या स्तरानुसार विषयाच्या ज्ञानाचा विस्तार वाढवत नेला जातो. एखादया घटकाची व्याप्ती विस्ताराने नेण्याच्या पध्दतीला समकेंद्री पध्दती म्हटले जाते. विषयघटक तोच असतो मात्र विद्यार्थ्यांच्या वर्गाच्या स्तरानुसार त्यामध्ये सखोलता, आशयज्ञान, घटना, प्रसंग, संदर्भ वाढविला जातो. जसे सिंधू संस्कृती बाबत प्रथम ढोबळ माहिती त्यानंतर वरच्या वर्ग स्तरावर जीवनपध्दती, उत्खनन, वैशिष्टये, ऱ्हास, लोकजीवन, वैशिष्टये इत्यादींची सखोल बाबी, माहिती, संदर्भाचा उहापोह. जसा वर्गस्तर वाढेल तशी व्याप्ती वाढेल. स्थूलाकडून सूक्ष्माकडे या तत्वाचा अवलंब समकेंद्री पध्दतीत केला जातो.

**३) परावर्तन पध्दती (Regressive Approach)**

इतिहास हा भूतकालिन घटनांचा अभ्यास करणारे शास्त्र आहे. वर्तमानकालीन घटनासुध्दा पुढे इतिहासात जमा होणारच त्यानुषंगाने वर्तमान काळातील घडणाऱ्या घटनांचे मूळ कुठेतरी भूतकाळात असते. त्यानुसार सध्या घडणाऱ्या घटना ह्या अचानक घडत नाही तर

वर्तमानकाळातील घटना ह्या भूतकालीन घटनांचा परिणाम असतो तर भूतकाळातील घटना ह्या वर्तमानकाळातील घटनांची कारणमीमांसा करते. परावर्तन पध्दतीमध्ये वर्तमान काळातील घटनांचा परामर्श भूतकाळात घेतला जातो. जसे सिंधु संस्कृतीचा ऱ्हास अचानक झाला नाही तर त्यामागे विशिष्ट कारणे असतील. बांग्लादेशाची निर्मिती होण्यामागील घटनांचा उहापोह, भारताच्या फाळणीमागे इंग्रजांच्या भारतातील सत्ता स्थापनेपासूनच्या घटनांमध्ये कारणे दिसून येतात.

परावर्तन पध्दतीने अभ्यासक्रम पाठ्यक्रम मांडणी करणे कठिण जाते.

**४) चरित्र पध्दती (Biographical Approach) :**

पाठ्यक्रमाच्या या पध्दतीवर कार्लाइल यांनी भर दिलेला आहे. प्रसिध्द जर्मन इतिहासकार प्रा. हॉप्ट यांनी सुध्दा याबाबत महत्त्व दिलेले आहे. इतिहासातील घटनांमध्ये युध्द, तह, शांतता प्रस्थापित यासारख्या बांबी मध्ये नेतृत्व करणारा किंवा विशिष्ट गुणांमुळे समोर येणारा व्यक्ती इतिहासात उल्लेखनीय ठरतो. इतिहास हा मानवाच्या व त्याच्याशी संबंधित घटनांचा उहापोह असतो त्यामुळे प्रत्यक्ष इतिहासात विशिष्ट घटना घडत गेल्या तरी त्या व्यक्तींच्या वैशिष्टयांना उघड करीत असतात. इतिहासकालीन घटनांमध्ये अनेक व्यक्तींचे वर्तन आलेले दिसते. पाठ्यक्रमात व्यक्तींना केंद्रस्थांनी मानून त्यांच्याशी संबंधित घडलेल्या सर्व घटनांचे समावेशक अध्ययन करण्यासंदर्भांत ही पध्दती आहे. जसे मराठयांचा इतिहास अध्ययन करतांना शिवाजी महाराजाच्या पूर्वीपासून शिवाजी महाराज व त्यांचे वंशज. पेशवाई मधील बाळाजी विश्वनाथ,

बाजीराव इत्यादी व्यक्ती त्यांच्या कर्तृत्वगाथा, त्यांनी केलेले कार्ये, त्यांची युध्दे, साहसगाथा व घटना त्यानुषंगाने झालेला परिणाम व कारणमीमांसा ह्या व्यक्तीच्या केंद्रस्थानी मानुन अध्ययन केले जातात. याबाबत इतिहास हा थोर पुरुषांची यशोगाथा आहे, असे म्हटले जाते.

**५) आधार पध्दती (Source Method) :**

इतिहासाला आधार नसल्यास ती फक्त परिकथा ठरेल. यावरुन लक्षात येते की इतिहासात आधारांना खूप महत्त्व आहे. पाठ्यक्रमाच्या या पध्दतीमध्ये इतिहासाची साक्ष देणाऱ्या विविध आधारभूत साधनांना केंद्रस्थानी मानून पाठ्यक्रमाचे नियोजन केले जाते. आधारभूत साधनांमध्ये भौतिक साधने जसे किल्ले, दर्गा, कबर, समाधी लिखित साधनांमध्ये आज्ञापत्र, बखर, पत्र, सनद. यासोबत काही मौखिक साधने जसे दंतकथा, पोवाडा, गाथा, मिथके, याबाबत मांडणी करणे. आधारांची सत्यता, वस्तुनिष्ठता तपासणे व सत्य शोधणे या पध्दतीमध्ये अपेक्षित असते. आधारपध्दतीने मूलगामी अभ्यास होऊन स्वयंअध्ययनाची आवड निर्माण होते. सुसंगत आधार उपलब्ध झाले नाही तर ही पध्दती उपयुक्त ठरत नाही.

**६) विशिष्ट विषय पध्दती (Topical Method) :**

विशिष्ट विषय पध्दती मध्ये विविध विषय घटक किंवा त्यामधील बाबीला केंद्रस्थानी मानुन त्याचा चढत्या क्रमानुसार विविध कालखंडानुसार अभ्यास करण्यात येतो. प्राचीन काळापासून तर आधुनिक काळापर्यंतच्या विविध विषयबाब घटकांचा परामर्श काळखंडानुसार केला जातो. जसे अन्न या घटकाबाबत पाठ्यक्रमाची मांडणी करतांना भटकंती काळातील मानवाचे आहार पध्दती, अग्नीचा शोधानंतरचे आहार पध्दती, ताम्रयुग, पाषाणयुग, प्राचीन मध्ययुगीन व

अर्वाचीन कालखंडातील आहार पध्दती यासोबत विविध प्रदेश, देश, भौगोलिक स्थितीनुसार आहार पध्दती याबाबत सविस्तर अभ्यास या पध्दतीने केला जातो. या पध्दतीची रचना सोपी व सहज आहे. मानवी जीवनाचे सर्वांगीण अध्ययन करणे या पध्दतीने करता येणे मात्र शक्य नाही.

**७) पॅच पध्दती (Patch Method) :**

पॅच पध्दतीमध्ये विशिष्ट घटक निवडला जातो. या घटकाचा सर्व बाजूंनी अध्ययनावर भर दिला जातो. त्याची व्याप्ती वर्ग, स्तर, वय, क्षमता यानुसार ठरविण्यात येते. यामध्ये विषय निवडण्याचे स्वातंत्र्य असल्यामुळे घटकाचे सखोल ज्ञानासोबत विद्यार्थ्यांच्या कल्पनाशक्ती व नाविण्यबाबीस वाव मिळतो. विषय घटकाचे संपूर्ण व सखोल अभ्यास होतो. जसे सिंधू संस्कृती, अमेरिकन राज्यक्रांती, १९४२ चे भारत छोडो आंदोलन इत्यादी. असे असले तरी भारतीय शिक्षण पध्दतीत पॅच पध्दतीने पाठ्यक्रम तयार करणे कठिण कार्य आहे.

**८) कालखंड पध्दती (Periodic Method) :**

कालखंड पध्दतीमध्ये कालक्रम व पॅच पध्दतीचे एकत्रीकरण असते. या पध्दतीमध्ये विशिष्ट कालखंड निवडून त्या कालखंडात घडलेल्या घटना, प्रसंग, व्यक्ती, विषय घटकाचा सविस्तर अभ्यास केला जातो. जसे अश्मयुगीन कालखंडातील प्रशासन पध्दती यामध्ये महत्त्वाच्या बाबीचे अध्ययन करुन अनावश्यक बाबींचे अध्ययन टाळले जाते. यामध्ये संपूर्ण कालखंडातील सर्व बाबींचे अध्ययन होईल याची शक्यता कमी असते.

अशाप्रकारे अभ्यासक्रम व पाठ्यक्रम नियोजनाच्या विविध पध्दतीचा परामर्श आपण घेतलेला आहे.

♦ **इतिहास पाठ्यक्रमाचे चिकित्सक अध्ययन :**

शिक्षणाच्या उद्दिष्टांची पूर्तता करण्याचे साधन म्हणजे अभ्यासक्रम. अभ्यासक्रमाची निश्चिती राष्ट्रीय स्तरावर NCERT (National Council of Educational & Research Training) राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन आणि प्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली ही केंद्रीय संस्था करते. अभ्यासक्रमाच्या नियोजनानंतर विशिष्ट इयत्तेत कोणता घटक, बाबी दयावयाचे आहे या नुसार पाठ्यक्रम ठरविण्यात येते. भारत देशाच्या दृष्टीने राष्ट्रभक्ती, राष्ट्रीय एकात्मता, सुजाण नागरीकांची निर्मिती साठी इतिहास हा विषय अभ्यासक्रमात महत्त्वपूर्ण ठरतो. पाठ्यक्रमाचे नियोजनही महत्त्वपूर्ण ठरते.

महाराष्ट्र राज्य स्तरावर SCERT (State Council of Education Research & Training) महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन आणि प्रशिक्षण परिषद, पुणे ही संस्था पाठ्यक्रम (Syllabus) तयार करते. ही संस्था महाराष्ट्र राज्याचा पाठ्यक्रम तयार करतांना अभ्यासक्रमाचे प्रतिबिंब दिसेल अशी रचना करते.

अभ्यासक्रम व पाठ्यक्रमातून विद्यार्थ्यांमध्ये खालील क्षमता विकसित व्हाव्यात अशी अपेक्षा व्यक्त केलेली आहे -

१) भारतीय समाज जीवनाच्या विकासाचे टप्पे.

२) भारतीय व जगातील विविध संस्कृतीचा विकास, वारसा व समृध्दी.

३) भारतातील समस्या.

४) शास्त्रीय दृष्टीकोनाचा विकास.

५) देशाकरीता विविध राष्ट्रीय मूल्ये, सामाजिक मूल्ये यांचा विकास.

६) वर्तमानकाळ व भूतकाळातील घटनांचा सांगोपांग शास्त्रीय पध्दतीने विश्लेषण.

७) भारतीय स्वातंत्र्याचे महत्त्व.

८) जगाचा व भारतीय इतिहासाचे महत्त्व समजून घेणे.

या दृष्टीने इतिहासाचे अभ्यासक्रमात महत्त्वपूर्ण स्थान आहे. यानुसार अभ्यासक्रमाचे स्तर निश्चित केलेले आहे.

अ) प्राथमिक स्तर - इयत्ता १ ली ते ५ वी

ब) उच्च प्राथमिक स्तर - इयत्ता ६ ते ८ वी

क) माध्यमिक स्तर - इयत्ता ९ वी ते १० वी

ड) उच्चमाध्यमिक स्तर - इयत्ता ११ वी व १२ वी

महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे (SCERT) ने इतिहासाच्या पाठ्यक्रमाची रचना करतांना इयत्ता ६ वी ते ८ वी दरम्यान विद्यार्थ्यांना संपूर्ण भारताच्या इतिहासाची माहिती व्हावी याप्रकारे रचना केलेली आहे. पाठ्यक्रमाची तीन भागात विभागणी केलेली आहे.

१) प्राचीन काळाचा इतिहास - इयत्ता ६ वी

२) मध्ययुगीन काळाचा इतिहास - इयत्ता ७ वी

३) अर्वाचीन काळाचा इतिहास - इयत्ता ८ वी

♦ **उच्चप्राथमिक स्तरावरील पाठ्यक्रम :**

इयत्ता ६ वी चा पाठ्यक्रम, इयत्ता ७ वीचा पाठ्यक्रम, इयत्ता ८ वी चा पाठ्यक्रम.

♦ **माध्यमिक स्तरावरील पाठ्यक्रम :**

इयत्ता ९ वी चा पाठ्यक्रम व इयत्ता १० वी चा पाठ्यक्रम.

अभ्यासक्रमातील इयत्ता ९ वी व १० म्हणजे माध्यमिक स्तर होय. या स्तरावर विद्यार्थ्यांना खालील क्षमता निर्मिती बाबत अपेक्षा व्यक्त केलेल्या आहेत -

१) संपूर्ण जगाचा आधुनिक इतिहास समजून घेणे.

२) राष्ट्रभक्ती, लोकशाही मूल्ये, धर्मनिरपेक्षता, देशप्रेम मूल्यांचा विकास करणे.

३) इतिहास विषयांबाबत वस्तुनिष्ठ व शास्त्रीय दृष्टीकोन निर्माण करणे.

४) मानवी जीवनातील विविध संस्कृती, परिवर्तन, प्रक्रिया समजून घेणे.

५) वर्तमानकाळातील बाबींचा भूतकाळातील संदर्भाचा परामर्श.

इयत्ता ९ वी व १० वी च्या पाठ्यक्रमात पुढील बाबी समाविष्ट करण्यात आल्या आहेत.

१) दहा गाभातून घटकांचा विकास करणे.

२) विशिष्ट काळातील भारत, जगातील विविध सांस्कृतिक व सामाजिक विकास घटनांचा अभ्यास करणे.

३) समाजपरिवर्तनाबाबतचे टप्पे.

४) जगातील विविध घटना व घडामोडीचे अध्ययन.

५) मानवाच्या विकासासंदर्भातील थोर व्यक्ती किंवा थोर पुरुषाचे कार्य व योगदान

♦ **वैशिष्टये :**

SCERT (State Council of Education Research & Training) महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन आणि प्रशिक्षण परिषद, पुणे यांनी तयार केलेल्या पाठ्यक्रमाचे सांगोपांग अध्ययन केल्यानंतर असे दिसून येते की, इयत्ता ९ वी ते १० वी च्या उच्च प्राथमिक स्तर ते

माध्यमिक स्तरापर्यंत अभ्यासक्रमाशी सुसंगत पाठ्यक्रम तयार करण्यात आलेला आहे. त्याबाबत पुढील वैशिष्टये दिसून येतात.

१) वर्गस्तरानुसार पाठ्यक्रम सुसंगत दिसून येतो.

२) प्रत्येक वर्गातील पाठ्यक्रमात तत्कालिन घटनांना योग्य न्याय दिलेला आहे.

३) पाठ्यक्रमात भारत देशासंदर्भात दहा गाभाभूत घटकांना प्राधान्य दिलेला आहे.

४) पाठ्यक्रमातून अभ्यासक्रमाची उद्दिष्टांची पूर्तता होण्यास सहाय्यभूत ठरतात.

५) भारतीय प्राचीन संस्कृती, विकास टप्पे व यासोबत सामाजिक जीवन, परिवर्तन या बाबींना महत्त्वाचे स्थान दिलेले आहे.

६) इतिहासात आधार, स्त्रोतांना महत्त्वाचे स्थान आहे. त्याबाबत पाठ्यक्रमाने न्याय दिलेला आहे.

७) वस्तुनिष्ठ व शास्त्रीय दृष्टीकोन निर्माण करण्यास पाठ्यक्रम सहाय्यभूत ठरतात.

८) जगातील विविध प्रदेश संस्कृती व सामाजिक जीवन याबाबत समावेश करुन त्याचा आधुनिक जगाशी सांगड घातलेली आहे.

९) भारतीय स्वातंत्र्य लढयाचे महत्त्व व त्याबाबत आधुनिक इतिहास व घटनांबाबत पाठ्यक्रम यथोचित न्याय देत आहे.

१०) पाठ्यक्रमाची रचना करतांना राष्ट्रीय शैक्षणिक धोरणांसोबत सुजाण नागरिकांसाठी, राष्ट्रप्रेम, देशभक्ती, शीलसंवर्धन यासारख्या मूल्यांची रुजवणुकीसाठी पाठ्यक्रम तयार केलेला आहे.

११) विद्यार्थ्यांच्या मानसशास्त्रीय दृष्टीकोनातून पाठ्यक्रमाची मांडणी केलेली आहे.

१२) इतिहास विषयाच्या अध्यापनाची उद्दिष्टे पूर्तता करण्याबाबत पाठ्यक्रम यशस्वी भूमिका बजावतांना दिसत आहे.

शिक्षण प्रक्रियेत अभ्यासक्रम व पाठयक्रम या संकल्पनांना अतिशय महत्त्वाचे स्थान असून त्याअनुषंगाने शिक्षण प्रक्रिया प्रवाहित होत असते.

*****

# प्रकरण-१०

# इतिहासाची पाठ्यपुस्तके

शिक्षणाची उद्दिष्टे साध्य करण्यासाठी अभ्यासक्रम एक साधन आहे. अभ्यासक्रमातून विशिष्ट उद्दिष्टांच्या पूर्णतेसाठी टप्प्यानुसार पाठ्यक्रम तयार करण्यात येते. पाठ्यक्रमाचे प्रत्यक्ष स्वरुपात, दृश्यस्वरुपात उपयोजन करण्याचे साधन म्हणजे पाठ्यपुस्तक. पाठ्यक्रमानुसार पाठ्यपुस्तके तयार केली जातात.

पाठ्यपुस्तक हे विद्यार्थ्यांसोबत २४ तास सोबत असणारे मित्र, गुरु, मार्गदर्शक व संदर्भ ग्रंथ असतात. पाठ्यपुस्तक विद्यार्थी व शिक्षक दोघांसाठी महत्त्वाचे साधन आहे. पाठ्यपुस्तक विद्यार्थ्यांना सर्वात महत्त्वपूर्ण ठरते कारण ते स्वयंअध्ययन, वाचन, लेखन याबाबींसाठी महत्त्वाचे असते. पाठ्यपुस्तक म्हणजे Text Book असे असले तरी शिक्षकांना पाठ्यक्रम पूर्ण करावयाच्या असतो पाठ्यपुस्तक नाही. पाठ्यपुस्तक हे साधन आहे साध्य नाही हे शिक्षकांनी लक्षात घेणे गरजेचे आहे.

♦ **पाठ्यपुस्तकाचे महत्त्व :**

१) अभ्यासक्रम व पाठ्यक्रमाचे मूर्तरुप म्हणजे पाठ्यपुस्तक होय.

२) पाठ्यपुस्तक शिक्षकांना अध्यापनाची दिशा देतात म्हणजे मार्गदर्शन करणारे साधन होय.

३) पाठ्यपुस्तक प्रमाण म्हणून महत्त्वाचे आहे. ऐतिहासिक घटनांची माहिती देतात.

४) विद्यार्थ्यांना वाचन, स्वयंअध्ययन, स्वाध्याय, अभ्यासासाठी पाठ्यपुस्तक महत्त्वाचे ठरते.



५) पाठ्यपुस्तक हे साधन व तंत्र म्हणून महत्त्वाचे ठरते.

६) पाठ्यपुस्तकाद्वारे अभ्यासक्रमाची व पाठ्यक्रमाची निश्चित उद्दिष्टे साध्य करता येतात.

७) शिक्षकांना दैनंदिन अध्यापनासाठी पाठ्यपुस्तक महत्त्वाचे ठरते.

पाठ्यपुस्तकाबाबत "A book used as a standard work for study of particular subject." अर्थात पाठ्यपुस्तक विशिष्ट विषयाचे अध्ययन करण्याचे प्रमाणभूत पुस्तक होय. असे असले तरी पाठ्यपुस्तक संपवणे म्हणजेच पाठ्यक्रम संपवणे नव्हे. भाषा विषयाप्रमाणे इतिहासाच्या पाठ्यपुस्तकाचा उपयोग करणे उचित ठरणार नाही.

पाठ्यपुस्तक विद्यार्थी, शिक्षक व पालक या सर्वांना उपयुक्त ठरणारे प्रमाणभूत साधन आहे हे मात्र नक्की.

♦ **इतिहासाची पाठयपुस्तके इयत्ता सहावी ते दहावी :**

इयत्ता सहावीच्या पाठयपुस्तकातील प्रकरणे-

| अ.क्र. | पाठाचे नाव |
|---|---|
| १. | भारतीय उपखंड आणि इतिहास |
| २. | इतिहासाची साधने |
| ३. | हडप्पा संस्कृती |
| ४. | वैदिक संस्कृती |
| ५. | प्राचीन भारतातील धार्मिक प्रवाह |
| ६. | जनपदे आणि महाजनपदे |
| ७. | मौर्यकालीन भारत |
| ८. | मौर्य साम्राज्यानंतरची राज्ये |
| ९. | दक्षिण भारतातील प्राचीन राज्ये |
| १०. | प्राचीन भारत : सांस्कृतिक |
| ११. | प्राचीन भारत आणि जग |

इयत्ता सातवीच्या पाठयपुस्तकातील प्रकरणे-

| अ.क्र. | पाठाचे नाव |
|---|---|
| १. | इतिहासाची साधने |
| २. | शिवपूर्वकालीन भारत |
| ३. | धार्मिक समन्वय |
| ४. | शिवपूर्वकालीन महाराष्ट्र |
| ५. | स्वराज्य स्थापना |
| ६. | मुघलांशी संघर्ष |
| ७. | स्वराज्याचा कारभार |
| ८. | आदर्श राज्यकर्ता |
| ९. | मराठयांचा स्वातंत्र्यसंग्राम |
| १०. | मराठयांच्या सत्तेचा विस्तार |
| ११. | राष्ट्ररक्षक मराठे |
| १२. | साम्राज्याची वाटचाल |
| १३. | महाराष्ट्रातील समाजजीवन |

इयत्ता आठवीच्या पाठयपुस्तकातील प्रकरणे-

| अ.क्र. | पाठाचे नाव |
|---|---|
| १. | इतिहासाची साधने |
| २. | युरोप आणि भारत |
| ३. | ब्रिटीश सत्तेचे परिणाम |
| ४. | १८५७ चा स्वातंत्र्यलढा |

| ५. | सामाजिक व धार्मिक प्रबोधन |
|---|---|
| ६. | स्वातंत्र्य चळवळीच्या युगास प्रारंभ |
| ७. | असहकार चळवळ |
| ८. | सविनय कायदेभंग चळवळ |
| ९. | स्वातंत्र्यलढयाचे अंतिम पर्व |
| १०. | सशस्त्र क्रांतिकारी चळवळ |
| ११. | समतेचा लढा |
| १२. | स्वातंत्र्यप्राप्ती |
| १३. | स्वातंत्र्यलढयाची परिपूर्ती |
| १४. | महाराष्ट्र राज्याची निर्मिती |

इयत्ता नववीच्या पाठयपुस्तकातील प्रकरणे-

| अ.क्र. | पाठाचे नाव |
|---|---|
| १. | इतिहासाची साधने |
| २. | भारत : १९६० नंतरच्या घडामोडी |
| ३. | भारतापुढील अंतर्गत आव्हाने |
| ४. | आर्थिक विकास |
| ५. | शैक्षणिक वाटचाल |
| ६. | महिला व अन्य दुर्बल घटकांचे सक्षमीकरण |
| ७. | विज्ञान व तंत्रज्ञान |
| ८. | उद्योग व व्यापार |
| ९. | बदलते जीवन : भाग १ |
| १०. | बदलते जीवन : भाग २ |

इयत्ता दहावीच्या पाठयपुस्तकातील प्रकरणे-

| अ.क्र. | पाठाचे नाव |
| --- | --- |
| १. | इतिहासलेखन : पाश्चात्त्य परंपरा |
| २. | इतिहासलेखन : भारतीय परंपरा |
| ३. | उपयोजित इतिहास |
| ४. | भारतीय कलांचा इतिहास |
| ५. | प्रसार माध्यमे आणि इतिहास |
| ६. | मनोरंजनाची माध्यमे आणि इतिहास |
| ७. | खेळ आणि इतिहास |
| ८. | पर्यटन आणि इतिहास |
| ९. | ऐतिहासिक ठेव्यांचे जतन |

♦ **पाठ्यपुस्तकाचे परीक्षण :**

पाठ्यपुस्तकांच्या दर्जावर शिक्षणाचा दर्जा अवलंबून असतो. चांगली व दर्जेदार पाठ्यपुस्तके शिक्षणाला गती देण्यासोबत व गुणवत्ता प्रदान करण्याचे कार्य करतात म्हणून पाठ्यपुस्तकाची चिकित्सा सर्व बाजूंनी करणे क्रमप्राप्त ठरते.

पाठ्यपुस्तकाचे परीक्षण दोन पातळीवर करतात.

अ) अंतरंग परीक्षण ब) बहिरंग परीक्षण

**अ) अंतरंग परीक्षण :**

पाठ्यपुस्तकाचा बाहेरील भाग आकर्षित करीत असला तरी



त्यामधील आशयास प्राधान्य ठरते. पाठ्यपुस्तकातील आशय संबंधित

इयत्ता, स्तर वयोगटानुसार नसल्यास किंवा संबंधित उद्दिष्ट पूर्ती करण्यास असफल असेल तर ते पाठ्यपुस्तक निरर्थक ठरते.

पाठ्यपुस्तकाचे अंतरंग परीक्षण करतांना -

१) अभ्यासक्रमाची निश्चित उद्दिष्टांनुसार विषयघटकांची निवड केलेली असावी.

२) पाठ्यक्रमाचे स्वरुपाचे दर्शन पाठ्यपुस्तकात व्हावे.

३) अनुक्रमणिका क्रम व्यवस्थित असावा.

४) पाठ्यपुस्तकातील प्रकरणे सुसंबधित व क्रमानुसार असावी.

५) पाठ्यपुस्तकातील विषयांश, घटक भागांना शीर्षक व उपशीर्षक स्पष्ट असावे.

६) पाठ्यपुस्तकांतील घटकांची मांडणी विद्यार्थ्यांच्या वयोगटानुसार असावी.

७) पाठ्यपुस्तकातील विषयांशात विद्यार्थ्यांना गोडी वाटावी.

८) विषयांशाचे स्पष्टीकरणाची व्याप्ती वयोगटानुसार, वर्गानुसार असावी. माहितीचा भरणा नसावा.

९) इतिहासाचे पाठ्यपुस्तक नि:पक्षपातीपणाने लिहिलेले असावे. धर्म, जात, पंथ, पक्ष पूर्वग्रह दुषित पणाने लिहिलेले नसावे.

१०) इतिहासात आधारांना महत्त्व आहे.पाठ्यपुस्तकातील घटना वस्तुनिष्ठपणे आधारांच्या, पुराव्यांच्या सहाय्याने मांडलेल्या असाव्या.

११) एखादी घटना, प्रसंग आवडतो म्हणून अतिरंजकता किंवा वस्तुनिष्ठतेला धोका न पोहचता सादर केलेला असावा.

♦ **पाठ्यपुस्तक अंतरंग परीक्षणाचे मुद्दे :**

**अ) पाठ्यपुस्तकाची भाषा :**

१) इतिहास पाठ्यपुस्तकाची भाषा साधी, सोपी व सरळ असावी. क्लिष्ट गुंतागुंतीची वाक्यरचना नसावी.

२) पाठ्यपुस्तकाची भाषा विद्यार्थ्यांच्या वयोगटानुसार असावी.

३) पाठ्यपुस्तक विद्यार्थी व शिक्षकांसोबत पालकही वापरतात म्हणून वाक्याची रचना समजणारी, छोटी छोटी परिच्छेद असणारी असावी.

४) शीर्षक व उपशीर्षक योग्य ठिकाणी असावी.

५) वाङ्मय किंवा भाषा सौंदर्याकडे जास्त कल न देता योग्य भाषेचा उपयोग असावा.

६) पाठ्यपुस्तकातील घटनेला अनुरुप भाषा असावी.

७) पाठ्यपुस्तक व्याकरण दृष्टया शुद्ध असावे.

**ब) दृकसाधने :**

पाठ्यपुस्तकात घटना, विषयांश समजावून देण्यासाठी किंवा समजून घेण्यासाठी चित्रे, नकाशे, तक्ते या दृकसाधनांचा उपयोग महत्त्वपूर्ण ठरतो. म्हणून चांगल्या पाठ्यपुस्तकात-

१) घटनांचे योग्य वर्णन करणारे, योग्य ठिकाणी चित्रे, नकाशे व तक्ते असावेत.

२) घटनांच्या प्रसंगानुसार दृक साधनांचा वापर असावा.

३) मजकुराशी संबंधित दृक साधने असावीत.

४) चित्रे, नकाशे सुस्पष्ट असावेत.

५) नकाशे प्रमाणशीर, स्थळ इत्यादी योग्य प्रमाण दर्शविणारी असावीत.

६) चित्रे, नकाशे, तक्ते आकर्षक असावी जेणेकरुन विद्यार्थ्यांना संबंधित विषयांश वाचण्यात रुची निर्माण होईल.

**क) स्वाध्याय :**

केलेले अध्ययन तपासण्याचे कार्य स्वाध्याय करतात. म्हणून चांगल्या पाठ्यपुस्तकात -

१) स्वाध्याय पाठाच्या/प्रकरणाच्या मागे असावेत.

२) स्वाध्याय स्वयंअध्ययनास चालना देणारे असावे.

३) स्वाध्याय पाठाशी संबंधित असावा.

४) लघुत्तरी, दीर्घोत्तरी, वस्तुनिष्ठ सर्व प्रकारच्या प्रश्नांचा समावेश असावा.

५) स्वाध्यायाबाबतच्या सूचना स्पष्ट असाव्यात.

६) स्वाध्यायातून विद्यार्थ्यांना पाठयांश कितपत समजला याबाबत मूल्यमापन करता आले पाहिजे. अध्यापनात सुधारणा होण्याच्या दृष्टीने स्वाध्याय असावा.

७) कल्पनाशक्ती व बुध्दीला चालना मिळेल अशा प्रश्नांचा समावेश स्वाध्यायात असावा.

**ड) सूची :**

१) पाठ्यपुस्तकाच्या शेवटी संदर्भाचा व सूचीचा उल्लेख असावा.

२) ज्या संदर्भाचा आधार घेतला त्यांचा नामनिर्देश केलेला असावा.

३) पुरवणी वाचनाकरीता अतिरिक्त पुस्तकांची सूची दयावी.

४) नवीन संशोधनासंदर्भातही उल्लेख केलेला असावा.

**ई) मुद्रण :**

चांगल्या पाठ्यपुस्तकाचे वैशिष्टये म्हणजे त्यामध्ये मुद्रण दोष नसावा. अनावधानाने मुद्रणात दोष असल्यास त्याबाबत शुध्दीपत्रक दिलेले असावे.

**ब) पाठ्यपुस्तकांचे बहिरंग :**

ज्याप्रमाणे पाठ्यपुस्तकाचे आशय व माहिती च्या दृष्टीने अंतरंग महत्त्वाचे ठरते तसेच पाठ्यपुस्तकाचे बहिरंग सुध्दा महत्त्वाचे असते. पाठ्यपुस्तकाचे बाहय स्वरुप आकर्षक असल्यास ते पाठ्यपुस्तक हाती घेण्याचा मोह प्रत्येक विद्यार्थ्यास होते म्हणून पाठ्यपुस्तकाचे बहिरंग सुध्दा महत्त्वपूर्ण ठरते.

चांगल्या पाठ्यपुस्तकाच्या बहिरंगाचे विश्लेषण करतांना पुढील बाबींची चिकित्सा करणे महत्त्वाचे ठरते.

**अ) पाठ्यपुस्तकाचा आकार :**

१) पाठ्यपुस्तकाचा आकार विद्यार्थ्यांच्या वयोगटानुसार वापरण्यास व हाताळण्यास सोयीस्कर असावा.

२) वर्गानुसार पाठ्यपुस्तकाचा आकार खूप मोठा किंवा खूप लहान नसावा.

३) पृष्ठसंख्या, वयोगट, इयत्तानुसार असावी.

**ब) पाठ्यपुस्तकाचे मुखपृष्ठ व मलपृष्ठ :**

१) विद्यार्थ्यांच्या वर्गानुसार व वयोगटानुसार आकर्षक व प्लास्टीक वेष्टन केलेले असावे.

२) मुखपृष्ठ आकर्षक असावे.

३) मुखपृष्ठ जाड असावे व प्लास्टीक वेष्टन केलेले असावे.

४) मलपृष्ठ सुध्दा जाड असावे.

५) मुखपृष्ठावर व मलपृष्ठावर त्या इयत्तेतील पाठ्यपुस्तकात अंतर्भूत प्रकरणाधारित सारांश रुपाने प्रतिबिंबीत होणारे स्वरुप असावे.



६) मुखपृष्ठावर इयत्ता, विषयाचे नाव ठळक रुपाने असावे.

**क) मुद्रण :**

१) मुद्रण दोष नसावे.

२) अक्षरांचा आकार स्पष्ट असावे.

३) शीर्षक व उपशीर्षक ठळकपणे दिसणारे असावे.

४) अक्षरांचा आकार विद्यार्थ्यांच्या इयत्ता वयोगटानुसार व वाचनास सुस्पष्टपणे असणारे असावे.

५) मुद्रणाची शाई व्यवस्थित असावी.

६) पुस्तकातील समास पुरेसा असावा.

७) नवीन प्रकरण नवीन पानावर असावे.

८) ओळींची लांबी इयत्ता व वयोगटानुसार असावी.

**ड) कागद :**

पाठ्यपुस्तकाचा कागद पांढरा, जाड, गुळगुळीत, टिकावू व उच्च प्रतीचा असावा.

**ई) बांधणी :**

१) पाठ्यपुस्तकाची बांधणी व्यवस्थित व टिकावू असावी.

२) पाठ्यपुस्तक सहजपणे उघडता येईल अशी बांधणी असावी.

३) पाठ्यपुस्तकाच्या बांधणी मुळे अक्षरे, चित्रे, नकाशे दबायला नको.

**फ) पाठ्यपुस्तकाची किंमत :**

पाठ्यपुस्तकाची किंमत सर्वसामान्य पालक वर्गाला परवडणारी असावी. पुस्तकाच्या दर्जानुसार व वर्गानुसार किंमत असावी. मलपृष्ठावर पुस्तकांची किंमत छापलेली असावी.

**♦ इयत्ता ६ वी च्या पाठ्यपुस्तकाचे चिकित्सक विश्लेषण :**

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन

मंडळ, पुणे यांनी इयत्ता सहावी साठी इतिहास व नागरिकशास्त्र हे

पाठ्यपुस्तक तयार केलेले असून प्रथम आवृत्ती २०१६, पुनर्मुद्रण सप्टेंबर २०१७ मध्ये झालेले आहे. पुस्तकाची पृष्ठसंख्या इतिहासाकरीता ५७ व नागरिकशास्त्र करीता २३ एकूण ८० आहे. पाठ्यपुस्तकाचे परीक्षण करतांना निकषानुसार पुढीलप्रमाणे चिकित्सा करण्यात येते.

♦ **पाठ्यपुस्तकाचे अंतरंग परीक्षण :**

**घटक :**

इयत्ता ६ वी च्या पाठ्यपुस्तकात इतिहासासंबंधी ११ प्रकरणे आहेत.

प्रकरणांची नावे पुढीलप्रमाणे —

| अ.क्र. | पाठाचे नाव |
|---|---|
| १. | भारतीय उपखंड आणि इतिहास |
| २. | इतिहासाची साधने |
| ३. | हडप्पा संस्कृती |
| ४. | वैदिक संस्कृती |
| ५. | प्राचीन भारतातील धार्मिक प्रवाह |
| ६. | जनपदे आणि महाजनपदे |
| ७. | मौर्यकालीन भारत |
| ८. | मौर्य साम्राज्यानंतरची राज्ये |
| ९. | दक्षिण भारतातील प्राचीन राज्ये |
| १०. | प्राचीन भारत : सांस्कृतिक |
| ११. | प्राचीन भारत आणि जग |

इयत्ता सहावीला प्राचीन भारताचा इतिहास अभ्यासावयाचे आहे.

**१) प्रकरणाचा क्रम :**

पाठ्यपुस्तकातील प्रकरण, घटक, विषयांशाचे क्रम योग्य आहे. कालखंडानुसार, भारत व जग यांच्या संदर्भात विषयघटक व प्रकरणाची मांडणी योग्य आहे.

**२) भाषा :**

इयत्ता सहावी च्या पाठ्यपुस्तकातील भाषा साधी सोपी व समजण्यास विद्यार्थ्यांच्या वयोगटानुसार अनुरुप आहे. विद्यार्थ्यांना प्रत्येक प्रकरणातील घटकांशी माहितीचे आकलन सहज होते. भाषा ओघवती असून स्पष्ट आहे. पाठ्यपुस्तकाची भाषा साधी, सोपी व वयोगटानुसार योग्य आहे. भाषा लेखनाच्या सर्व नियम व व्याकरण दृष्टया निर्दोष आहे.

**३) दृकसाधने :**

इयत्ता ६ वी च्या पाठ्यपुस्तकात प्राचीन काळातील भारत, संस्कृतीचा अभ्यास करावयाचे असल्यामुळे चित्ररुपाने लवकर समजण्यासाठी वयोगटानुसार रंगीत चित्रे दिलेली आहे. ह्या काळातील घटनेचे आकलन होण्यास क्लिष्ट असल्याकारणाने भरपूर चित्रे दिलेली आहे. चित्रे प्रकरणानुसार सुसंगत असून रंगीत आहेत ती पुरेशी आहेत. पाठ्यपुस्तकात प्रत्येक सत्तेच्या संदर्भात भारताचे नकाशे दिलेले आहेत. नकाशाचे महत्त्व ओळखून पुरेशी व रंगीत नकाशाचा वापर करण्यात आलेले आहे. नकाशाची एकूण संख्या ७ असून ती पुरेशी आहेत. आवश्यक त्या ठिकाणी तक्त्यांचा वापर केलेला आहे.

**४) पाठयांशाची रचना :**

पाठ्यपुस्तकातील प्रकरणे क्रमबध्द असून क्रम योग्य आहे. पाठयांशातील आशय योग्य आहे. अनुक्रमणिका, शीर्षक, उपशीर्षक

योग्य आहेत. कालक्रमानुसार, वयोगटानुसार, इयत्तानुसार रचना योग्य व

व्यवस्थितपणे मांडणी केलेली आहेत. एकंदरीत पाठयांशातील आशय न्यायपूर्ण असून पाठ्यक्रम, अभ्यासक्रमाची उद्दिष्टपूर्ती करण्यास सहाय्यभूत ठरतात. नवीन पाठ्यक्रमानुसार अध्ययन निष्पत्ती आधारित प्रकरणांची रचना केलेली आहेत. अध्ययन निष्पत्तीनुसार कृती दर्शविण्यात आलेल्या आहेत. प्रकरणाच्या सुरुवातीलाच मुद्दे दिलेली आहेत ही या पाठ्यपुस्तकाची विशेषता.

**५) स्वाध्याय :**

प्रत्येक पाठाच्या शेवटी वस्तुनिष्ठ, लघुत्तरी, दीर्घोत्तरी स्वाध्याय आहे. प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी उपक्रम दिलेले आहे. प्रत्यक्ष अनुभव, प्रात्यक्षिक व कृती यांना महत्त्वाचे स्थान स्वाध्यायात दिलेले आहे. स्वाध्याय पाठयांशाशी संबंधित असून त्यामधुन विद्यार्थ्यांचे मूल्यमापन व्यवस्थितपणे करता येते. अध्ययन निष्पत्तीधारित स्वाध्याय आहेत ही नाविण्यता. स्वाध्यायाच्या सूचना स्पष्ट आहेत. उपक्रमात विविधता आढळून येते. प्रकल्पाबाबतही पाठाच्या शेवटी स्वाध्याय अंतर्गत नियोजन करण्यात आलेले आहे.

**६) QR Code (Quick Response Code) :**

संदर्भसूचीच्या उल्लेख ऐवजी QR Code हे दिलेले आहे. आधुनिक युगातील नवीन तंत्रज्ञानाचा वापर करणे या ठिकाणी अभिप्रेत आहे. QR कोड द्वारे अतिरिक्त पूरक वाचन, संदर्भासाठी पाठ्यपुस्तकात दिलेले आहे. संगणक, मोबाईल, प्रोजेक्टर, डिजीटल यासारख्या आधुनिक तंत्रज्ञानाद्वारे विद्यार्थी अध्ययन करतील व शिक्षक अध्यापन करतील ही दिशा देवून नवनवीन बाबींचा समावेश करण्यात आले आहे. QR कोड ही या पाठ्यपुस्तकातील वैशिष्ट्यपूर्ण बाब ठरते. यामुळे अभिरुची वाढून स्वयंअध्ययनास प्रोत्साहन मिळते.

**♦ पाठ्यपुस्तकाचे बहिरंग परीक्षण :**

**१) मुखपृष्ठ व मलपृष्ठ :**

पाठ्यपुस्तकाचे मुखपृष्ठ चित्रमय असून आकर्षक आहे. त्यामध्ये हडप्पाकालीन चित्र भांडी, सांचीचा स्तुप, गुप्त कालीन नाणे, अजंता लेणीचे, कैलास लेणीचे चित्रे दर्शविलेले आहे. पाठ्यघटकानुसार चित्र असून पाठ्यपुस्तकांतील प्रकरणाचे सारांशरुपाने चित्राद्वारे प्रतिबिंब दिसून येते. मलपृष्ठावर ग्रामसभा व शाळेचे चित्र आहे. मुखपृष्ठ व मलपृष्ठ दोन्ही प्लास्टीक वेष्टन आहे. इयत्ता, विषय ठळक रुपाने दर्शविण्यात आले आहे. तात्पर्य मुखपृष्ठ व मलपृष्ठ जाड, आकर्षक वयोगटानुसार आहे.

**२) आकार :**

इयत्ता सहावीच्या इतिहासाचे पाठ्यपुस्तकाचा आकार ए४ असून विद्यार्थी सहजपणे हाताळू शकतात. पुस्तकाचा आकार जास्त लहान किंवा खूप मोठा नाही.

**३) मुद्रण :**

पाठ्यपुस्तकाचे मुद्रण चांगले आहे. मुद्रण दोष आढळून येत नाही. अक्षरांचा आकार वयोगटानुसार आहे. शीर्षक उपशीर्षक योग्य आहेत. परिच्छेद छोटी-छोटी असून वयोगटानुसार आहे.

**४) कागद :**

नवीन प्रकरणे नवीन पानावर दिलेली आहेत. पाठ्यपुस्तकासाठी वापरलेला कागद पांढरा, शुभ्र व जाड असून गुळगुळीत आहे.

**५) बांधणी :**

पुस्तकाची बांधणी पक्की असून मजबूत आहे. विद्यार्थी पुस्तक वर्षभर हाताळू शकतात. पुस्तक सहजपणे उघडू शकतात. बांधणीमुळे चित्रे, नकाशे दबलेली नाहीत.

एकंदरीत इयत्ता सहावीचे पाठ्यपुस्तकाचे परीक्षण केले असता विद्यार्थ्यांच्या वयोगटानुसार, बौध्दिक क्षमतेनुसार, आवड लक्षात घेवुन आधुनिकतेशी जोडण्यात आलेले आहे. या दृष्टीकोनातून इयत्ता सहावीचे पाठ्यपुस्तक गुणवत्तापूर्ण व दर्जेदार ठरते. त्या इयत्तेशी सुसंगत अनुरुप व न्याय देणारे ठरते.

*****

# प्रकरण - ११

# इतिहासाची शिक्षक हस्तपुस्तिका व कार्यपुस्तिका

## ♦ विद्यार्थ्यांची कार्यपुस्तिका (Work book) :

महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे या शासकीय संस्थेमार्फत इयत्ता १ ली ते १२ वी विषयाच्या इयत्तेकरीता पाठ्यपुस्तके प्रकाशित केली जातात. स्वाध्यायामध्ये प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी स्वाध्याय दिलेले असतात. त्यामध्ये विविध प्रकारच्या प्रश्नांचा समावेश असतो. याव्यतिरिक्त पाठ्यपुस्तक मंडळ किंवा खाजगी प्रकाशनांकडून विद्यार्थ्यांसाठी कृतीपुस्तिका किंवा कार्यपुस्तिका अथवा स्वाध्याय पुस्तिका प्रकाशित केल्या जातात.

## ♦ विद्यार्थ्यांच्या कार्यपुस्तिकेचे स्वरुप :

पाठ्यपुस्तकातील स्वाध्यायाखेरीज अतिरिक्त स्वाध्याय प्रश्न दिलेले असतात. जादा अभ्यासाच्या दृष्टीने कार्यपुस्तिकेत भरपूर प्रश्न दिलेले असतात त्यांना सोडवण्यासाठी मोकळी जागा दिलेली असते. पाठातील स्वाध्यायाखेरीज अतिरिक्त प्रश्न जसे रिकाम्या जागा भरा, जोडया जुळवा, योग्य पर्यायाला गोल करा यासारखे वस्तुनिष्ठ प्रश्न असतात. लघुत्तरी प्रश्नांमध्ये एका वाक्यात उत्तरे लिहा. एका वाक्यात उत्तरे लिहा, नकाशा भरा यासारख्या कृती दिलेल्या असतात. दीर्घोत्तरी प्रश्नही दिलेले असतात. विद्यार्थ्यांनी प्रकरणाचा अभ्यास करुन ही कार्यपुस्तिका सोडवायची असते. मूल्यमापनाच्या दृष्टीने कार्यपुस्तिका महत्त्वाची ठरते.

♦ **विद्यार्थ्यांच्या कार्यपुस्तिकेचे महत्त्व :**

१) इतिहास विषयाच्या दृष्टीने कार्यपुस्तिका फायदेशीर ठरते.

२) विद्यार्थ्यांना सराव, उजळणी करीता फायदयाची ठरते.

३) जास्त प्रश्न सोडवल्यामुळे विद्यार्थ्यांचा आत्मविश्वास वाढतो.

४) स्वयं अध्ययन आकलनाकरीता विद्यार्थ्यांना फायदेशीर आहे.

५) कार्यपुस्तिका सोडवल्यामुळे पाठांतर करण्याची प्रवृत्ती कमी होते.

६) विद्यार्थ्यांच्या मूल्यमापनासाठी शिक्षकांना कार्यपुस्तिका उपयोगी ठरते.

७) कार्यपुस्तिका मार्गदर्शकाची भूमिका बजावते.

८) परीक्षेच्या दृष्टीने कार्यपुस्तिका उपयोगी ठरते.

♦ **इतिहासाची शिक्षक हस्तपुस्तिका (Handbook) :**

अभ्यासक्रम, पाठ्यक्रम, पाठ्यपुस्तकासारखेच महत्त्वाचे साधन म्हणजे शिक्षकांची हस्तपुस्तिका होय. प्रत्येक वर्गाच्या इतिहासाच्या पाठ्यपुस्तकानुसार त्या इयत्तेच्या इतिहासाची शिक्षक हस्तपुस्तिका तयार करण्यात येतात.

♦ **इतिहासाची शिक्षक हस्तपुस्तिकेचे स्वरुप :**

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व संशोधन मंडळ, पुणे ही संस्था इयत्ता ४ थी ते इयत्ता १२ वी च्या इतिहास विषयाच्या पाठ्यपुस्तकांसोबत इतिहास विषयाच्या हस्तपुस्तिका तयार करते. हस्तपुस्तिका शिक्षकांसाठी असते. हस्तपुस्तिकेत पाठ्यपुस्तकातील प्रत्येक प्रकरणाबाबत माहिती, अध्यापन कसे करावे. त्याबाबत मार्गदर्शन असते. प्रत्यक्ष अध्यापनात येणाऱ्या अडचणी व समस्यांची सोडवणूक

करण्यासंदर्भात मार्गदर्शन हस्तपुस्तिका मध्ये असते. इतिहास विषयाच्या

हस्तपुस्तिकेत विषयाचे अध्यापन करतांनाचे नियोजन दिलेले असते. यासोबत पाठयांशातील घटकाच्या अध्यापनासाठी वापरावयाच्या अध्यापन पध्दती, दृक-श्राव्य साहित्ये याबाबत माहीती असते. विद्यार्थ्यांमध्ये मूल्यमापन कसे करावे, स्वाध्याय व त्याची उत्तरे, यासोबत प्रकरणातील संदर्भ व स्त्रोत याबद्दल सविस्तर माहिती दिलेली असते. हस्तपुस्तिकेत क्रमिक वर्गाच्या इतिहास पाठ्यक्रमाची उद्दिष्टे, अध्ययन निष्पत्ती, महत्त्वाचे पाठ्यमुद्दे, नवीन संबोध, नवीन शब्द यासोबत संदर्भ, अतिरीक्त पूरक वाचन साहित्यांची माहिती असते. नवीन साहित्य निर्मिती करीता मार्गदर्शन उपलब्ध असते. वास्तविक क्रमिक पाठ्यपुस्तकांव्यतिरिक्त शिक्षक हस्तपुस्तिकेचा पाहिजे तेवढा वापर शिक्षक करीत नाही. वास्तविक हस्तपुस्तिका ह्या उत्तम मार्गदर्शिका आहेत.

**♦ इतिहास शिक्षक हस्तपुस्तिकेचे महत्त्व :**

१) अभ्यासक्रम, पाठ्यक्रमाची उद्दिष्टे ठरविता येतात.

२) अध्यापनाच्या नियोजनाच्या दृष्टीने हस्तपुस्तिका महत्त्वाच्या ठरतात.

३) अध्यापन पध्दती, शैक्षणिक साहित्ये कोणती वापरावी, मूल्यमापन कसे करावे यादृष्टीने हस्तपुस्तिका मार्गदर्शन करतात.

४) दहा गाभाभूत घटकांचा समावेश कोणत्या प्रकरणात केलेला आहे, कोणती मूल्ये रुजवायची आहेत याबाबत माहिती हस्तपुस्तिका देतात.



५) हस्तपुस्तिकेमुळे मूल्यमापन, स्वाध्याय, कृती कार्य, उपक्रम, प्रकल्प या बाबत दिशा मिळते.

६) इतिहासात आधारभूत स्त्रोतांना, संदर्भांना अतिशय महत्त्व आहे. त्याबाबत हस्तपुस्तिका मार्गदर्शक ठरते.

७) नियोजनात अचूकता व नेमकेपणा येतो.

अशाप्रकारे हस्तपुस्तिका शिक्षकांना फायदेशीर ठरते. हस्तपुस्तिका शिक्षकांचे मित्र असून मार्गदर्शन करतात. म्हणून क्रमिक पुस्तकांसोबत शिक्षकांनी हस्तपुस्तिकेचा जास्तीत जास्त वापर करायला पाहिजे.

*****

# प्रकरण - १२

## इतिहासाचा शिक्षक

प्राचीन काळापासून शिक्षकाला समाजात महत्त्वाचे स्थान आहे. गुरु, शिक्षकाला मार्गदर्शक, भाग्यविधाता सुध्दा संबोधले जाते. विद्यार्थ्यांच्या जीवनाला वळण लावण्याचे काम शिक्षक करतो. आचार्य देवो भव: या उक्तीनुसार प्राचीन काळापासून शिक्षकांचे समाजात, विद्यार्थ्यांच्या जीवनात स्थान अनन्य साधारण राहिलेले आहे. शिक्षकांना राष्ट्रनिर्माते म्हणून संबोधले जाते. अध्यापकांच्या कर्तृत्वामुळेच राष्ट्राची पिढी घडविली जात आहे. सुजाण नागरीकांची निर्मिती करणारे समाजसेवक म्हणजे अध्यापक होय.

काही शिक्षणतज्ञ अध्यापन ही एक कला मानतात तर काही ते शास्त्र मानतात. या वादविवादात गुंतून न जाता विद्यार्थ्यांचा सर्वांगिण विकास करण्यास सहाय्यभूत जी पध्दती ठरते ती म्हणजे अध्यापन. मग कुणी शास्त्रोक्त पध्दतीने करो किंवा कुणी कला कौशल्याद्वारे. विद्यार्थी घडवणे हेच शिक्षकांचे अंतिम ध्येय असते.

प्रत्येक विषयाची वेगवेगळी वैशिष्टये असतात. भाषा, गणित, विज्ञान व सामाजिक शास्त्र कोणताही विषय असो त्या विषयाला हाताळतांना शिक्षकांच्या अंगी काही आवश्यक गुणवैशिष्टयांची अपेक्षा केली जाते. इतिहास विषय शिक्षकाच्या अंगी सुध्दा काही गुणविशेष असणे, क्षमता व दृष्टीकोन असणे आवश्यक आहेत. किमान त्यांनी ती अंगिकारण्याचा व आत्मसात करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. इतिहास हा विषय मूळातच विद्यार्थ्यांना रुक्ष व बोजड वाटतो मग तो विद्यार्थ्यांच्या गळी उतरवायला शिक्षकाचे कसब पणास लागते.

**♦ इतिहासाच्या शिक्षकांची गुण वैशिष्टये :**

इतिहासाच्या शिक्षकांमध्ये पुढील गुण वैशिष्टये असणे अपेक्षित आहे.

**१) विषयाचे सखोल ज्ञान :**

इतिहासाच्या शिक्षकास इतिहास विषयासंबंधीचे सखोल ज्ञान असणे आवश्यक आहे. 'आडातच नाही तर पोहऱ्यात कुठून येणार' या उक्तीनुसार त्याला आपल्या विषयाचे ज्ञान वाढवून सखोलता आणली पाहिजे. विद्यार्थ्यांना अध्यापन करतांना सध्यास्थितीत घडणाऱ्या घटनांबाबत सुध्दा जागरुक राहून भूतकालीन घटनांबाबत संदर्भ दिले पाहिजे. शिक्षकाजवळ भरपूर विषयज्ञान असलेच पाहिजे. विद्यार्थ्यांच्या जवळचा ज्ञानसाठा व मार्गदर्शक म्हणजे शिक्षक होय. त्यामुळे आपल्या ज्ञानात दररोज भर टाकून विद्यार्थ्यांना भरपूर ज्ञान देण्यासाठी विषयाचे सखोल ज्ञान शिक्षकाजवळ आवश्यक आहे. यासाठी क्रमिक पाठ्यपुस्तके, हस्तपुस्तिकांसोबत वर्तमानपत्र, लेख, मासिके, इतिहासासंबंधी संदर्भ ग्रंथ, आधुनिक तंत्रज्ञानाच्या वापरातून विविध ई-पुस्तके, जर्नल यांचा सुध्दा वापर केला पाहिजे. सन-सनावळ्या बाबत अचूक ज्ञान असावे.

प्राचीन कालखंडापासून आधुनिक कालखंडातील सर्व बाबींचे ज्ञान त्याने प्राप्त केले पाहिजे. जेणेकरुन विद्यार्थ्यांना त्या विषयातील भरपूर माहिती शिक्षक देवू शकेल.

**२) अभ्यासू :**

इतिहासाचा शिक्षक आपल्या विषयाबाबत अभ्यासू असला पाहिजे. जगात दररोज नवनवीन घटना घडत असतात त्याचा अभ्यास



केला पाहिजे. त्याच्याजवळ असलेल्या ज्ञानसाठा पुरेसा आहे असे

शिक्षकाने समजू नये. दररोजच्या घटना, नवनवीन ग्रंथ, नियतकालिके, मासिके, संगणकाच्या माध्यमातून नवनवीन लेख, ई-पुस्तके इत्यादी वाचन केले पाहिजे. त्याने नियमितपणे इतिहासासंदर्भात विविध संदर्भ, पुरवणी पुस्तकांचे वाचन केले पाहिजे. टिपण काढले पाहिजे. आधुनिक काळातील घटनांबाबत चिकित्सक अभ्यास केला पाहिजे.

तात्पर्य इतिहास विषय शिक्षक हा इतिहासाचा सतत अभ्यास करणारा पाहिजे. शिक्षकाने नियमितपणे अभ्यास करुन मनन, चिंतन केले पाहिजे.

**३) व्यासंग :**

इतिहास शिक्षकात व्यासंगी हा गुण असणे आवश्यक आहे. विविध आधार स्त्रोतांची माहिती घेणे. माहिती विद्यार्थ्यांच्या गळी उतरवण्यासाठी संदर्भ साहित्यांबाबत कोश, विश्वकोश, चित्रे, तक्ते, नकाशे यांचा संग्रह करुन वाचन केले पाहिजे. तत्कालिन काळातील विविध आधारांबाबत त्याला व्यासंग असला पाहिजे. ज्ञान प्राप्ती व अभ्यासाचा व्यासंग शिक्षकांमध्ये असायला हवा. विद्यार्थ्यांना ती माहिती देण्यासाठी त्याचा व्यासंगीपणा असणे आवश्यक आहे. याबाबत त्याने National Geography, Discovery, UGC इत्यादी दूरदर्शन वाहिन्यांचा आधार घेतला पाहिजे.

**४) इतिहास शिक्षकाची शैक्षणिक पात्रता :**

ज्या विद्यार्थ्यांना इतिहासाचे अध्यापन करावयाचे आहे. त्या विषयासंबंधी त्याने शैक्षणिक पात्रता प्राप्त केलेली पाहिजे. इयत्ता ९ वी, १० वी च्या माध्यमिक स्तरावर अध्यापन करणाऱ्या शिक्षकाने इतिहास हा विषय पदवीपर्यंत स्वत: अध्ययन केलेले असावे. अध्यापन हे एक शास्त्र

सुध्दा असल्यामुळे अध्यापनासंबंधीचे नियोजन, पाठ टाचण, कौशल्ये, सूक्ष्म अध्यापन, मूल्यमापन, शैक्षणिक अनुभूती, दृकश्राव्ये साधने, पाठ्यक्रम इत्यादी माहिती साठी त्याने बी.एड. ही व्यावसायिक पदवी अर्हतासुध्दा प्राप्त केलेली पाहिजे. विद्यार्थ्यांना अध्यापन करण्यासाठी इतिहास शिक्षकाचे शैक्षणिक व व्यावसायिक पात्रता प्राप्त करणे अत्यावश्यक आहे. अध्यापन करतांना विद्यार्थ्यांचे मानसशास्त्र, इतिहास पध्दतीशास्त्र इत्यादी बाबत त्याला माहिती होण्यासाठी व्यावसायिक पदवी प्राप्त करणे क्रमप्राप्त ठरते.

अशाप्रकारे इतिहास शिक्षकाने आवश्यक ती शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता प्राप्त करुन घेणे आवश्यक आहे.

**५) व्यावसायिक विकास व प्रशिक्षण :**

एकदा अध्यापकाची नोकरी लागली म्हणजे ज्ञान प्राप्ती पूर्ण झाली, असे नव्हे तर इतिहास विषयातील व्याप्ती ही सतत वाढणारी आहे. आज घडलेली घटना इतिहासाचाच भाग होणार आहे. यासाठी शिक्षकाने स्वत:चा व्यावसायिक विकास केला पाहिजे. इतिहास संबंधी आवश्यक ते सेवांतर्गत प्रशिक्षण घेतले पाहिजे. काळानुरुप अभ्यासक्रम, पाठ्यक्रम, पाठ्यपुस्तके बदलत असतात. वेळोवळी इतिहास संदर्भात होणारे बदल त्याने जाणून घेतले पाहिजे. शिक्षकाच्या नोकरीत वेळोवेळी होणारे प्रशिक्षण, तांत्रिक बाबी अवगत केल्या पाहिजे. अद्यावतता ठेवली पाहिजे. शैक्षणिक पात्रता वाढवून विषयाचे सखोल ज्ञान प्राप्तीसाठी प्रयत्न केले पाहिजे. पदवी प्राप्त केली असेल तर पदव्युत्तर पदवी, एम.फिल. पदवी प्राप्त केली पाहिजे. आपली व्यावसायिक प्रगती केली पाहिजे. यासोबत

नवनवीन संदर्भ, मासिके, जर्नल, विश्वकोश, वर्तमानपत्रातील बातम्या इत्यादीकडे लक्ष देवून अभ्यास केला पाहिजे. स्वत:च्या ज्ञानाचा दिवा तेवत ठेवला पाहिजे.

तात्पर्य शिक्षकाने आपल्या अध्यापनात परिणामकारकता वाढविण्यासाठी आपल्या व्यवसायासंबंधी सर्व तंत्रे, कौशल्ये, शैक्षणिक पात्रता वाढवून/उंचावून अदयावतता ठेवायला पाहिजे.

**६) व्यावसायिक निष्ठा व प्रेम :**

शिक्षकी पेशा किंवा अध्यापन व्यवसाय एक पवित्र व्यवसाय असून शिक्षकाला आपल्या व्यवसायाप्रती निस्सीम प्रेम असले पाहिजे. आपल्या हातून विद्यादानाचे पवित्र कार्य घडत आहे. याबाबत त्याची निष्ठा असली पाहिजे.

इतिहासाच्या शिक्षकास आपल्या विषयाप्रती प्रेम असले पाहिजे त्याने इतिहास विषयाचे ज्ञान देण्याचे कार्य निष्ठापूर्वक केले पाहिजे. आपल्या व्यवसायातील प्रमाणिकपणा जपायला हवा. विद्यार्थ्यांमध्ये इतिहासाविषयी अभिरुची निर्माण करुन, त्याच्या विकासास सहाय्यभूत केले पाहिजे. इतिहासाच्या शिक्षकाने आपले विचार, दृष्टीकोन संकुचित न ठेवता व्यापक ठेवले पाहिजे. इतिहास विषयाबाबत प्रेम जोपासून विषयासंबंधी अद्यावतता ठेवली पाहिजे. त्यासाठी आवश्यक ती अध्यापन कौशल्ये तंत्रे यांना निष्ठापूर्वक आत्मसात केली पाहिजे. वेळोवेळी होणारे बदल स्वीकारले पाहिजे. अभ्यासक्रम, पाठ्यक्रम, पाठ्यपुस्तक, आधुनिक तंत्रज्ञान इत्यादी बाबत प्रमाणिकपणे निष्ठेने प्रशिक्षण घेऊन त्याचा वापर दैनंदिन अध्यापनात केला पाहिजे. विद्यार्थ्यांबरोबर आदर्श

वर्तन ठेवून, सहकाऱ्यांची गुणवत्ता विकास करण्यास प्रयत्न केला पाहिजे. होणाऱ्या गोष्टी तेव्हाच शक्य होतात जेव्हा इतिहासाचा शिक्षक निष्ठापूर्वक आपल्या कर्तव्याचे निर्वाहन करेल.

इतिहासाच्या शिक्षकाने एक धंदा म्हणून नव्हे तर एक वृत्ती व सेवा व्रत म्हणून अध्यापन व्यवसायावर व इतिहासावर प्रेम करुन निष्ठापूर्वक कर्तव्य केले पाहिजे.

**७) अध्यापन प्रभुत्व :**

इतिहासाच्या शिक्षकाला इतिहासाचे सखोलज्ञान असणे जेवढे आवश्यक आहे. तेवढेच अध्यापनावर प्रभुत्व असणे सुध्दा महत्त्वाचे आहे. अध्यापनातील प्रभुत्वाद्वारे तो विद्यार्थ्यांना आपल्या जवळील ज्ञान साठयातील प्रत्येक कण देऊ शकतो. ज्ञान गळी उतरवू शकतो. अध्यापनावर प्रभुत्व नसल्यास विद्यार्थी घडवता येणे अशक्य आहे. विद्यार्थ्यांना इतिहास सारख्या रुक्ष वाटणाऱ्या विषयात रुची निर्माण करण्यासाठी अध्यापन प्रभुत्व असणे आवश्यक आहे.

अध्यापनशास्त्राची पदवी घेतांना अध्यापनाची विविध तंत्रे, अध्ययन- अध्यापनाची साधने, अध्यापन पध्दतीचा वापर इत्यादी बाबी आत्मसात करुन अध्यापनावर प्रभुत्व प्राप्त करता येते. टिपण काढणे, प्रश्न, कौशल्य, चेतक बदल, फलक लेखन, चर्चा इत्यादी द्वारे इतिहास विषय हा विद्यार्थ्यांना लवकरात लवकर आत्मसात होईल व आकलन होईल यासाठी अध्यापन प्रभुत्व असणे आवश्यक आहे.

तात्पर्य इतिहास विषयाचे परिणामकारक अध्यापन व विद्यार्थ्यांचे परिणामकारक अध्ययनासाठी अध्यापन प्रभुत्व असणे आवश्यक आहे.

**८) संशोधन दृष्टी :**

इतिहासाच्या शिक्षकामध्ये संशोधन दृष्टी असणे आवश्यक आहे. संशोधन व अध्यापन यांची योग्य सांगड त्याला घालता आली पाहिजे. इतिहासात घटना, घडामोडी घडत असतात विद्यार्थ्यांना त्याची माहिती देणे. त्या घटना संदर्भात विद्यार्थ्यांना संशोधन करण्यास प्रवृत्त करण्यासाठी स्वत: शिक्षकामध्ये संशोधन वृत्ती व दृष्टी असणे आवश्यक आहे. अध्यापन परिणामकारक करण्यासाठी, नावीण्यता आणण्यासाठी इतिहासाच्या अध्यापकाने विविध संशोधकांची व इतिहास मंडळाची भेटी घेणे आवश्यक आहे. त्याबाबत विद्यार्थ्यांना माहिती अवगत करुन देणे अपरिहार्य आहे.

तात्पर्य इतिहासाच्या अध्यापकात संशोधन प्रवृत्ती असणे गरजेचे आहे.

**९) संग्रह प्रवृत्ती :**

इतिहास विषयात ऐतिहासिक आधारांना महत्त्व आहे. या आधाराशिवाय इतिहास पंगू बनतो. नाणी, तत्कालिन दस्ताऐवज, ताम्रपट, संदर्भ ग्रंथ, चित्रे इत्यादी संग्रह करण्याची वृत्ती इतिहास शिक्षकांमध्ये असणे आवश्यक आहे. नकाशे, वस्तू, कात्रणे, प्रतिकृती यांचा संग्रह केल्यास प्रत्यक्ष विद्यार्थ्यांना हाताळण्यास देता येते. त्याद्वारे प्रत्यक्ष अनुभव देता येते. यामुळे इतिहास विषयाचे आकलन लवकर होते.

अशाप्रकारे इतिहास शिक्षकाचा संग्रह प्रवृत्ती असणे एक अत्यावश्यक गुण मानला जातो.

**१०) प्रवास करण्याची व भेटी देण्याची आवड :**

इतिहास विषयाचा प्रवासाशी घनिष्ठ संबंध आहे. प्रवास करण्याची व विविध ठिकाणी भेटी देण्याची आवड शिक्षकास असणे

गरजेचे आहे. इतिहासात घडलेल्या घटना ज्या ठिकाणी घडल्या त्या ठिकाणी भेटी देणे, तेथील फोटो घेणे, छायाचित्रे ऐतिहासिक स्थळांची माहिती घेणे. किल्ले, वास्तू यांचा इतिहास, रचना, शिल्पकला, लेणी इत्यादींना भेटी दिल्यास तेथील तत्कालिन परिस्थितीचा, भौगोलिक परिस्थितीचा, लोकजीवन, भाषा, आहार यासर्वांची इत्यंभूत प्रत्यक्ष दर्शनी माहिती होते. त्यामुळे फक्त चार भिंतीत इतिहासाला बंदिस्त न करता प्रवास, भेटी या माध्यमातून इतिहासाचे प्रत्यक्ष यथार्थ दर्शन घेण्याचे कार्य सुध्दा केले पाहिजे.

तात्पर्य प्रवासाची आवड व भेटी देण्याची प्रवृत्ती इतिहासाच्या शिक्षकात असली पाहिजे.

**११) चिकित्सक प्रवृत्ती :**

विशिष्ट घटना का घडली, त्यामागील कारणे काय, घटनेचा परिणाम काय, घटना अशीच का, अशा प्रकारची चिकित्सक प्रवृत्ती शिक्षकात असली पाहिजे. अशा चिकित्सक प्रवृत्तीच्या बाबीमुळे अभ्यासास वाव मिळतो. संशोधनास चालना मिळते. अशी प्रवृत्ती तो आपल्या विद्यार्थ्यांमध्ये रुजवणूक करु शकतो. इतिहासाचे खरे स्वरुप पुढे आणू शकतो.

तात्पर्य चिकित्सक प्रवृत्ती शिक्षकांत असणे आवश्यक आहे.

**१२) नि:पक्षपातीपणा :**

इतिहास शिक्षकांमध्ये नि:पक्षपातीपणा हा गुण असणे आवश्यक आहे. त्याने घटनेचा सर्वांगाने अभ्यास केला पाहिजे. आधार स्त्रोतांचा बाबतीत खरे खोटे पणा जसे कसोटीने ठरवितात तसेच इतिहासाचा शिक्षक हा नि:पक्षपाती असला पाहिजे.

कोणत्याही राजकीय पक्षाबाबत त्याने नि:पक्षपाती धोरण ठेवले पाहिजे. इतिहासाची यथार्थता जपण्यासाठी त्याने एकांगी राहू नये. निरपेक्षपणे विचार प्रवृत्ती ठेवली पाहिजे. इतिहासातील कोणत्याही घटना नि:पक्षपातीपणे अभ्यासली पाहिजे. घटनेची सखोल चौकशी केली पाहिजे. एकाच विचारधारेचा पुरस्कार न करता टीकांचा सुध्दा अभ्यास केला पाहिजे.

तात्पर्य सत्य स्वीकारुन नि:पक्षपातीपणा हा गुण इतिहास शिक्षकात असणे आवश्यक आहे.

**१३) इतर गुणवैशिष्टे :**

उपरोक्त गुणवैशिष्टयांव्यतिरिक्त इतिहासाचा शिक्षक हा सदैव आनंदी, विद्यार्थ्यांना प्रेरणा देणारा, स्वत: उत्साही व खिलाडूवृत्ती जोपासणारा असावा.

इतिहास शिक्षक भाषा प्रभुत्व संपन्न, नम्रता जोपासणारा, सर्वांशी सौजन्याने वागणारा असावा. विद्यार्थ्यांबद्दल प्रेम, सहानुभूती असणारा असावा.

इतिहासाचा शिक्षकांमध्ये व्यापक दृष्टीकोन, चिंतन प्रवृत्ती, भारतीय लोकशाहीबद्दल आदर, भारताच्या सांस्कृतिक परंपरेबाबत अभिमान यासह संवेदनशीलता या गुणांचाही समावेश असला पाहिजे.

तो स्वत: आजन्म विद्यार्थी असला पाहिजे. स्वत: नियमितपणे भरपूर वाचन करुन मनन व चिंतन केले पाहिजे. विशेष संदर्भ पुस्तके, पुरवणी, लेखांचे सतत वाचन केले पाहिजे. ज्ञानोपासना करीत राहिला पाहिजे.

अशाप्रकारे इतिहासाचा शिक्षक विविध गुणांनी परिपूर्ण असलेला अष्टपैलू व्यक्तिमत्वाचा धनी असावा.

♦ **इतिहास शिक्षकांची जबाबदारी :**

१) भारतीय संस्कृती, परंपरेचे ज्ञान देणे. त्यांचे महत्त्व व अभिमान बाळगणे.

२) संस्कृतीचा वारसा टिकवण्याबाबत विद्यार्थ्यांना प्रेरणा देणे.

३) सुजाण नागरीकांची पिढी विद्यार्थ्यांमधून निर्माण करणे.

४) इतिहासाबाबत भारत, जग व इतर देशाचा इतिहासाची माहिती देणे.

५) भारतीय लोकशाहीसाठी पूरक मूल्ये विद्यार्थ्यांमध्ये रुजवणे.

६) दहा गाभाभूत घटक, वैयक्तिक मूल्ये, सामाजिक मूल्ये विद्यार्थ्यांना देण्याचे महत्त्वाचे कार्य इतिहासाचे आहे.

तात्पर्यांने इतिहास शिक्षकास फारमोठी जबाबदारी आहे. प्रारंभिक वर्तनातून अपेक्षित वर्तनबदलासाठी इतिहास शिक्षकाने प्रयत्न करुन जबाबदारीने कार्य करावयाचे आहे.

♦ **इतिहास शिक्षक संघटना :**

'गाव करी ते राव न करी' या म्हणीनुसार एकटया माणसाने विकास किंवा कोणतेही कार्य पूर्ण होणे अशक्य असते. ते शक्य करतो म्हटले तर त्यासाठी फार मोठा कालावधी लागण्याची शक्यता आहे. याकरीता 'साथी हाथ बढाना' या उक्तीचा वापर करावा लागेल. शिक्षक व्यवसायाच्या बाबतीत विद्यार्थ्यांची गुणवत्ता टिकवणे यासारख्या विविध समस्या असतात. या दृष्टीने विविध प्रश्नांची उकल करण्यासाठी एकत्र येणे गरजेचे असते. आजच्या आधुनिक काळात तर वेगवेगळया विषयांवर लोक एकत्रित येवून, संघटन करुन समस्या सोडवण्याच्या प्रयत्न करतांना दिसतात. कामगारांची संघटना तर जगप्रसिध्द संघटना

आहे. याबरोबर एसटी चालक-वाहक संघटना, डबेवाल्यांच्या संघटना,

दुकानदार यासारख्या अनेक व्यवसायिकांच्या संघटना, सध्याच्या काळात आल्या आहेत. शिक्षकांच्या सुध्दा अशा अनेक संघटना स्थापन झाल्या आहेत. प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक, प्राध्यापक यांच्या वेगवेगळया संघटना आहेत. विविध विषयाच्या वेगवेगळया समस्या असतात. नवनवीन आधुनिक शिक्षक प्रवाह शिक्षण पध्दतीत प्रवेश करीत आहेत. नवनवीन समस्या निर्माण होत आहेत. त्यामुळे इतिहास सारख्या विषयाला मानाचे स्थान मिळावे, विद्यार्थ्यांमध्ये अभिरुची निर्माण व्हावी, नवनवीन संशोधनाना चालना मिळावी. याकरीता इतिहास शिक्षकांची संघटना निर्मिती व इतिहास अभ्यासमंडळासारखे नवीन उपक्रम हाती घेणे आजच्या काळाची गरज आहे.

**♦ इतिहास शिक्षक संघटनेची गरज :**

१) नवनवीन व क्लिष्ठ संकल्पना सोपी करणे.

२) इतिहास विषयातील गुणवत्तेचा दर्जा सुधारणे.

३) नवीन माहिती, आधुनिक तंत्रज्ञान बाबत जागरुकता निर्माण करणे.

४) इतिहास अध्यापनाचा दर्जा सुधारणे.

५) विचारांची देवाणघेवाण करणे. शिक्षकांची व्यावसायिक गुणवत्ता वाढवणे.

६) शिक्षकांना संशोधनासाठी प्रवृत्त करणे.

७) इतिहास विषयाचे हक्काचे व्यासपीठ निर्माण करण्याच्या दृष्टीने इतिहास संघटनांची आवश्यकता आहे.

८) परिसंवाद, कृती सत्रे आयोजन करणे. इतिहासातील रुक्षता दूर करणे. 

९) शिक्षण प्रक्रियेत नावीण्यता आणणे.

### ♦ इतिहास शिक्षक संघटनेची कार्ये :

इतिहास अध्यापक संघटनेची कार्ये पुढीलप्रमाणे.

१) इतिहास विषयातील नवनवीन संकल्पना इत्यादी बाबीसाठी चर्चा सत्रे, कृतीशाळा, परिसंवाद आयोजित करणे.

२) इतिहास अध्यापकांच्या चर्चा, परिसंवादासाठी हक्काचे व्यासपीठ उपलब्ध करुन देणे.

३) इतिहास विषयासंबंधी संशोधन, कृतीसंशोधन कार्य हाती घेणे, प्रोत्साहन देणे, आवश्यकता भासल्यास त्यासाठी निधी उपलब्ध करुन देणे.

४) इतिहास विषयासंबंधी वास्तु, नाणी, नोटा, पुरातन वस्तू, विविध साहित्यांची प्रदर्शने भरवणे.

५) इतिहास विषयासंबंधी हस्तलिखिते, मासिके तयार करणे. त्यांचे प्रकाशन करणे.

६) इतिहास विषयाचे अध्यापन प्रभावी होण्यासाठी शैक्षणिक साहित्ये तयार करण्याची कार्यशाळा आयोजित करणे व प्रदर्शनी भरवणे.

७) सेवांतर्गत प्रशिक्षणाचे आयोजन करणे व मार्गदर्शन करणे.

८) सहल उपक्रमाचे आयोजन करणे.

९) पाठ्यपुस्तक, कृतीपत्रिका, हस्तपुस्तिकांबाबत चर्चा व मार्गदर्शन करणे.

१०) विविध इतिहास संशोधक व तज्ञाची व्याख्याने आयोजित करणे.

११) अध्यापनाचा दर्जा वाढवणे.

इतिहास शिक्षक संघटना इतिहास विषयासंबंधी चैतन्य निर्मिती करुन अध्यापकांना योग्य मार्गदर्शन करु शकते. विद्यार्थ्यांमध्ये इतिहास

विषयासंबंधी अभिरुची निर्माण करण्याचे कार्य सहज घडवू शकते.

♦ **इतिहास शिक्षक संघटनेचे महत्त्व :**

आज संघटनांचे महत्त्व सर्वमान्य आहे. त्यामुळे इतिहास शिक्षक संघटना गाव, जिल्हा, राज्य व राष्ट्रीय स्तरावर विविध उपक्रमाचे, नाविण्यपूर्ण उपक्रमाद्वारे इतिहास अध्यापनाचा दर्जा उंचावण्यासाठी व गुणवत्ता वाढ करण्याच्या दृष्टीने प्रयत्न करु शकते.

विविध प्रकारचे उद्‌बोधन—वर्ग, व्याख्याने, शिबीरे, चर्चासत्रे याद्वारे नवनवीन साधने तयार करुन, प्रदर्शने भरवणे, अध्यापनात त्या गोष्टींचा वापर केल्यास परिणामकारक अध्यापन होण्यास सहाय्यभूत ठरते. त्यामुळे इतिहासातील रुक्षपणा दूर होण्यास मदत होईल.

इतिहासातील नवनवीन तंत्रज्ञान, संकल्पना, विचारप्रवाह, अध्यापन पद्धती यांचे प्रशिक्षण संघटनेद्वारे दिल्यास इतिहासातील विषयाशांची काठिण्य पातळी कमी होण्यास वाव मिळेल इतिहास विषय विद्यार्थ्यांना सोपा वाटेल. त्यामध्ये रुची निर्माण होईल हेच संघटनेचे यश म्हणावे लागेल.

इतिहास अध्यापक संघटना हे हक्काचे व्यासपीठ शिक्षक व विद्यार्थ्यांसाठी उपलब्ध होईल त्यामुळे इतिहास विषयातील प्रगतीच्या वाटचालीस अधिक व्यापक व समृध्द होण्यास सहाय्यभूत ठरेल.

उपरोक्त विश्लेषणावरुन इतिहास शिक्षक संघटना ही काळाची नितांत गरज आहे. याकरीता गांव, जिल्हा, राज्य व राष्ट्रीय स्तरावर कसोशीने प्रयत्न करण्याची गरज आहे.



*****

# प्रकरण - १३

## इतिहास अध्यापनाचे नियोजन

**♦ नियोजन :**

नियोजन म्हणजे Planning कोणतेही काम करण्यापूर्वी त्याबाबत तयार केलेला कच्चा आराखडा किंवा मसूदा म्हणजे नियोजन होय. कोणतेही काम नियोजन न करता केले म्हणजे अपयश मिळण्याची १००% शाश्वती असते. जर तेच काम पूर्ण नियोजनाने केले तर १००% यश मिळण्याचा सुरुवातीपासूनच आत्मविश्वास प्राप्त होतो. जीवनात नियोजन ठेवणारे कित्येक मोठया व्यक्तींनी यशाची शिखरे गाठलेली आहे. अशाच प्रकारची अनेक उदाहरणे इतिहासात आढळून येतात. पूर्व नियोजनाने पद्धतशीरपणे कित्येक लढाया जिंकलेल्या आहेत. नियोजन असल्यास कोणत्याही गोष्टीला निर्भेळ यश मिळण्यास हरकत नसते. घराचे बांधकाम करतांना सुध्दा आपण सर्व बाबींचे नियोजन करतो. नकाशा काढणे, साहित्ये घेणे, प्रमाण या सर्व बाबी नियोजनामध्ये असतात. देशाचे भविष्य म्हणजे विद्यार्थी. त्यांचे अध्यापनातून योग्य परिवर्तन किंवा बदल घडवले तर सुसंस्कारीत नागरीक निर्माण करण्याचे कार्य घडते. त्यासाठी नियोजन तर असलेच पाहिजे. प्रत्येक क्षेत्रात नियोजन आवश्यक आहे. त्यामुळे अध्यापनात सुध्दा नियोजन करणे गरजेचे आहे.

**♦ अध्यापनात नियोजनाचे महत्त्व :**

१) उपलब्ध साधन सामुग्री कोणती आहेत, कोणत्या साधनांची आवश्यकता आहे. याबाबत जुळवाजुळव करता येते.



२) नियोजनामुळे वेळेची बचत होते.

३) अपेक्षित उद्दिष्ट प्राप्तीची दिशा मिळते.

४) ठरविलेल्या बाबी नियोजित असल्यामुळे संभाव्य समस्या व उपाय योजना करता येतात.

अशाप्रकारे नियोजनाचे महत्त्व ठरते.

कोणत्याही विषयाचे नियोजन ३ प्रकारांनी करतात.

अ) वार्षिक नियोजन.

ब) घटक नियोजन.

क) वर्ग नियोजन/पाठ नियोजन.

**अ) वार्षिक नियोजन :**

वर्षभरातील विषयाचे नियोजन म्हणजे वार्षिक नियोजन होय. त्याला Annual Planing असे इंग्रजी नाव आहे. वार्षिक नियोजनात नेमून दिलेला पाठ्यक्रम वर्षभरात पूर्ण करावयाचे असते. यामध्ये -

**१) अध्यापनासाठी प्राप्त वेळ :**

अध्यापनासाठी वर्षभरातील ३६५ दिवसांपैकी ५२ रविवार, दिवाळी सुट्टी, उन्हाळी सुट्टी, सण, उत्सव, परीक्षा असा कालावधी वजा करता प्रत्यक्ष २३० दिवस अध्यापनासाठी प्राप्त होतात. त्यामध्ये इतिहासाचे आठवडयात ४ दिवस असतात. त्यापैकी नागरिकशास्त्राकरीता १ अशाप्रकारे प्रत्यक्षात आठवडयातून ३ दिवस इतिहासासाठी मिळतात. वर्षभरात एकूण ३५ ते ३७ आठवडे प्रत्यक्ष अध्यापन कार्यासाठी प्राप्त होतात. वर्षभरात इतिहासासाठी १०० ते ११० तासिका मिळतात. या तासिकांमध्ये पाठ्यक्रम, पाठ्यपुस्तकातील घटक, उपक्रम, चाचणी, परीक्षा अशा प्रकारे सर्व बाबीं पूर्ण कराव्या लागतात. अशाप्रकारे वार्षिक नियोजनामध्ये उपलब्ध वेळेचा विचार महत्त्वाचा ठरतो.

**२) पाठ्यक्रमातील घटक :**

सर्वात महत्त्वाचा दुसरा घटक म्हणजे पाठ्यक्रमातील घटक. वार्षिक नियोजन करतांना हा घटक एकजिनसीपणा असणे गरजेचे आहे. प्रत्येक वर्गासाठी ठराविक पाठ्यक्रम असतो. त्यामध्ये पाठ्यपुस्तकात प्रत्येकी काही पाठ असतात. हा पाठ म्हणजे वेगळा स्वतंत्र घटक नाही तर त्या सर्व पाठामध्ये काही घटक समान असेल तर सर्व पाठातील समान एकजिनसी घटक, एकसारख्या घटना, कृती, काठिण्य स्तर या सर्व बाबी वार्षिक नियोजनात एकत्रित घ्याव्या लागतात. त्यानुसार वार्षिक नियोजनात पाठ्यक्रमातील घटक, त्यानुषंगाने वेळेची उपलब्धता हा महत्त्वाचा भाग आहे.

**३) उद्दिष्टे :**

प्रत्येक विषयाची वेगवेगळी उद्दिष्टे असतात. इतिहास विषयाच्या अनुषंगाने कोणत्या घटकात कोणती उद्दिष्टे आहेत, ती उद्दिष्टे साध्य करतांना विद्यार्थ्यांच्या मानसशास्त्राचा अभ्यास करुन अध्यापनाच्या दृष्टीने एकजिनसी असणारा किंवा काळाच्या क्रमानुसार एकसारखा अथवा विविध बाबींनी समन्वय असणारी उद्दिष्टे साध्य करावयाची असतात. त्यानुसार त्यांचा क्रम लावणे गरजेचे असते. ज्ञान, आकलन, अभिरुची उपयोजन, कौशल्य, रसास्वादन इत्यादी उद्दिष्टांना त्या विशिष्ट घटकांच्या संदर्भात वेगवेगळे स्थान दयावे लागते. त्यासोबत ती उद्दिष्टे साध्य करण्यासाठी कुठेतरी लवचिकता किंवा बदलाबाबत शिक्षकात जागरुकता असणे आवश्यक असते.

अशाप्रकारे वार्षिक नियोजनाच्या वरील भागावरुन लक्षात येते की वार्षिक नियोजनामुळे-



१) उपलब्ध दिवसांची संख्या माहिती होते.

२) विषयासाठी उपलब्ध तासिकांची निश्चिती होते.

३) कोणते घटक आहेत हे समजते.

४) उद्दिष्टे ठरवून साध्य करण्यासंदर्भात माहिती होते.

५) मूल्यमापन तंत्रे याबाबत तासिकांची माहिती होते.

अशाप्रकारे जेवढे वार्षिक नियोजन व्यवस्थित होईल, तेवढेच अध्यापन कार्य परिणामकारक होईल.

वार्षिक नियोजनाचा नमुना तक्ता पुढीलप्रमाणे -

**वार्षिक नियोजन**
**विषय - इतिहास**
**इयत्ता - आठवी**

| घटक क्र | घटक | उपघटक | अध्यापन तासिका | मूल्यमापन तासिका | एकूण तासिका |
|---|---|---|---|---|---|
| १ | इतिहासाचे स्वरुप | १) इतिहासाची साधने<br>२) युरोप आणि भारत | १३ | ३ | १६ |
| २ | भारत व ब्रिटीश सत्ता | १) ब्रिटीश सत्तेचा परिणाम<br>२) १८५७ चा स्वातंत्र्यलढा<br>३) सामजिक व धार्मिक प्रबोधन | १७ | ६ | २३ |
| ३ | भारतीय स्वातंत्र्य चळवळ | १) स्वातंत्र्य चळवळीच्या युगास प्रारंभ<br>२) असहकार चळवळ<br>३) सविनय कायदेभंग चळवळ<br>४) स्वातंत्र्य लढयाचे अंतिम पर्व<br>५) सशस्त्र क्रांतिकारी चळवळ | ३५ | ८ | ४३ |
| ४ | स्वतंत्र भारत | १) समतेचा लढा<br>२) स्वातंत्र्यप्राप्ती<br>३) स्वातंत्र्य लढयाची परिपूर्ती<br>४) महाराष्ट्र राज्याची निर्मिती | २६ | ६ | ३२ |
| | | | **९१** | **२३** | **११४** |

**ब) घटकनियोजन :**

वार्षिक नियोजनात वर्षभरात करावयाच्या कृतीचे नियोजन करावे लागते. त्यानंतरची पायरी म्हणजे घटक नियोजन होय. घटक नियोजन म्हणजे समान उद्दिष्टांच्या पूर्तीसाठी एकसमान घटकांचा समन्वय करणे.

घटक नियोजनात खालील बाबी लक्षात घेणे गरजेचे आहे.-

**१) उद्दिष्टे :**

घटक नियोजनात त्या घटकाची उद्दिष्टे म्हणजे का शिकवायचे याचे उत्तर होय. कोणत्या घटकातून, कोणत्या भागातून, कोणती उद्दिष्टे साध्य करावयाची आहे, त्यामधून कोणती अध्ययन निष्पत्ती प्राप्त करावयाची आहे याचे नियोजन घटक नियोजनात असते. विद्यार्थ्यांमध्ये कोणते वर्तन बदल अपेक्षित आहे. याबाबतची निश्चिती घटक नियोजनात अंतर्भूत असते.

**२) घटकाचे पृथक्करण :**

संबंधित घटकांमध्ये कोणते उपघटक आहे. त्यामधील अध्यापन मुद्दे, उपमुद्दे, विविध संकल्पना या सर्व बाबींचे समन्वय साधून घटकाचे पृथक्करण करणे घटक नियोजनात असते. कोणता घटक भाग शिकवायचा ? त्याची व्याप्ती व आशय काय ? याबाबतचे नियोजन घटक नियोजनात करणे अपेक्षित असते. घटकांचा कालक्रमाच्या दृष्टीने विचार करणे अपेक्षित असते.

**३) कालावधी :**

वार्षिक नियोजनात उपलब्ध कालावधीनुसार किती तासिका उपलब्ध आहेत याचा विचार केला जातो. त्यानुसार कोणत्या घटक, उपघटकासाठी अध्यापन मुद्दे, आशय, अध्यापन, उपक्रम व मूल्यमापन

इत्यादी करीता किती कालावधी उपलब्ध आहे याबाबत घटक नियोजनात विचार करावा लागतो.

**४) कसे शिकवायचे :**

घटक, उपघटक याची उद्दिष्टे निश्चिती झाली, निश्चित कालावधी झाल्यानंतर त्या घटकाचे, उपघटकांचे अध्यापन कसे करावयाचे, अध्यापन पध्दती कोणती वापरावी, कोणत्या साहित्यांचा वापर करावा याचे नियोजन करावे लागते. यासोबत कोणकोणती साहित्ये उपलब्ध आहेत कोणत्या साधनांची जुळवाजुळव करावी लागेल, कोणकोणते उपक्रम राबवावे लागेल याबाबत म्हणजेच कसे शिकवायचे नियोजन घटक नियोजनात करावे लागते.

**५) मूल्यमापन :**

मूल्यमापनाचा सुध्दा विचार घटक नियोजन करतांना करावा लागतो. निश्चित केलेली उद्दिष्टे पूर्ण झाली किंवा नाही याबाबतचे नियोजन घटक नियोजनात करावे लागते. विद्यार्थ्यांमध्ये कोणते बदल अपेक्षित होते, त्याचे वर्तनबदल कशा स्वरुपात होते, मूल्यमापन कसे करावयाचे आहे. लेखी परीक्षेतून ज्ञान, आकलन, उपयोजन यासोबत प्रात्यक्षिक परीक्षेतून कौशल्य व वापर तपासता येईल. यासोबत मौखिक (तोंडी) परीक्षेतून अभिरुची, कल, चर्चा, निरीक्षण इत्यादीं द्वारे सुध्दा मूल्यमापन करता येईल. तात्पर्य विद्यार्थ्यांना निश्चित घटकातून काय प्राप्ती झाली, प्रगती काय याबाबतचे मूल्यमापन घटक नियोजनातून करता येईल.

घटक नियोजन करत असतांना इतिहास विषयाचे स्वरुप, वैशिष्टये लक्षात घेऊन काळजीपूर्वक घटक नियोजन करावे लागते. घटकांमधील उपघटक, पाठयांश, मुद्यांसोबत कालक्रमामध्ये परस्पर

संबंध, समन्वय साधून त्या एकमेकांना कसे पूरक ठरतील असे नियोजन करावे लागते.

**♦ घटक नियोजनाचे फायदे :**

१) घटकांचे पृथक्करण केल्याने बारकावे समजतात.

२) विशिष्ट कालावधीत कोणते उपघटक, पाठयांश शिकवायचे याचे नियोजन केल्यामुळे इत्यंभूत बाबींची पूर्ण कल्पना डोळयासमोर येते व आत्मविश्वास वाढतो.

३) साधनांची जुळवाजुळव पूर्वीच करुन घेता येते.

४) घटक नियोजनामुळे उद्दिष्टे, अध्यापन पध्दती, साधने इत्यादी बाबत पूर्ण कल्पना येते. वेळेची बचत होते.

५) मूल्यमापनामुळे उद्दिष्ट प्राप्ती झाली काय, यासोबत काय बदल करता येईल. या अनुषंगाने विद्यार्थ्यांच्या मूल्यमापनासह स्वत:चेही मूल्यमापन करता येते.

६) वेळेवर होणारी धावपळ टाळून निश्चित दिशेने कार्य करता येते.

घटक नियोजनाचा नमुना तक्ता पुढीलप्रमाणे -

**घटक नियोजन**
**विषय - इतिहास**
**इयत्ता - आठवी**

| अ.क्र. | घटकाचे नाव | घटक पृथक्करण | उद्दिष्टे व स्पष्टीकरणे | अध्ययन अनुभव शिक्षक कृती | अध्ययन निष्पत्ती | मूल्यमापन |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | भारत व ब्रिटीश सत्ता | १) ब्रिटीश सत्तेचे परिणाम | **ज्ञान :** १) ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना बाबत माहिती सांगतो. २) इंग्रज मराठे युद्धाची कारणे व परिणाम सांगतो. ३) तैनाती फौजेची पध्दतीबाबत माहीती सांगतो. ४) दुहेरी राज्यव्यवस्थाबाबत माहिती सांगतो. ५) सामाजिक व सांस्कृतिक परिणामाबाबत माहीती सांगतो. **आकलन :** १) मुलकी नोकरशाहीची संकल्पना स्पष्ट करतो. २) भारतातील शेतकरी कर्जबाजारी होण्याची कारणे स्पष्ट करतो. **उपयोजन :** १) भारतातील उद्योगधंदयांबाबत माहिती मिळवतो. २) ब्रिटीश प्रशासन, शिक्षण पध्दती याबांबत सचित्र माहिती प्राप्त करतो. | विविध चित्रे, नकाशे याद्वारे भारतात ब्रिटीश ईस्ट इंडिया कंपनीची सत्ता स्थापने बाबत माहिती स्पष्ट करतात. ईस्ट इंडिया कंपनीमधील तैनातीफौजेबाबत माहिती. ती स्विकारण्यामागील विविध संस्थानिकांची कारणे स्पष्ट करतात. ब्रिटीश प्रशासन, मुलकी नोकरशाही, आर्थिक परिणाम, सांस्कृतिक परिणाम, वाहतूक व दळणवळण व्यवस्थेत सुधारणा इत्यादींबाबत चित्र, प्रतिकृती नकाशाद्वारे माहिती स्पष्ट करतात. शेतीचे व्यापारीकरण, जुन्या उदयोगधंदयाचा ऱ्हास इत्यादीबाबत माहितीचे स्प्टीकरण करतात. | विद्यार्थी माहिती समजून घेतात. संकल्पनांचा अर्थ समजून घेतात. भारतातील जुने उदयोगधंदे नष्ट होण्याची कारणे स्पष्ट करतात. सामाजिक, सांस्कृतिक परिणाम सांगतात. ब्रिटीश शासन व्यवस्था, आर्थिक परिणाम इत्यादींबाबत माहिती स्पष्ट करुन घेतात. नकाशे, चित्रे, प्रतिकृतीचे निरीक्षण करतात. माहितीचे स्वत:च्या जीवनात उपयोजन करतात. | घटकातील उपघटकाधारित लेखी चाचणी. प्रकल्प कार्ये करवून घेणे. |

♦ **पाठ नियोजन :**

अध्यापन प्रकियेच्या नियोजनातील तिसरी पायरी म्हणजे पाठ नियोजन होय. वार्षिक नियोजन, घटक नियोजन यानंतर दैनंदिन अध्यापन कार्याचे नियोजन म्हणजे पाठ नियोजन. ही अत्यावश्यक व महत्त्वाची पायरी होय. वर्गाध्यापन करण्यापूर्वी, प्रत्यक्ष वर्गाध्यापन करतांना व अध्यापन कार्य पूर्ण झाल्यानंतर करावयाच्या कृतीचे नियोजन म्हणजे पाठ नियोजन होय. पाठ नियोजन हे एका विषयाचे एका तासिकेचे नियोजन असते.

♦ **पाठ नियोजनाचे महत्त्व :**

**१) उद्दिष्ट निश्चिती :**

पाठ नियोजनामुळे त्या पाठातून, घटकातून निश्चित कालावधीत नेमकी कोणती उद्दिष्टे प्राप्त करावयाची आहेत याची माहिती होते.

**२) अध्ययन अनुभवाची निश्चिती :**

पाठ नियोजनामुळे संबंधित घटक, पाठासाठी कोणते अध्ययन अनुभव दयावयाचे आहे, कोणते दृक-श्राव्य साधने, चित्रे, प्रतिकृती वापरायचे आहे त्याबाबत निश्चिती करता येते.

**३) दिशा मिळते :**

पाठ नियोजनामुळे शिक्षकाला निश्चित दिशा मिळते. चुका टाळता येतात. आत्मविश्वासपूर्वक कार्य करता येते.

**४) वेळेची बचत :**

वर्गाध्यापनापूर्वी प्रत्यक्ष अध्यापन करतांनाच्या कृतींची निश्चिती झाल्यामुळे वेळेची बचत होते. शिक्षकांची वेळेवरची धावपळ होत नाही.

**५) मूल्यमापन :**

पाठ नियोजनाचे मूल्यमापनाच्या दृष्टीने महत्त्व आहे. विद्यार्थ्यांचे मूल्यमापन कसे करावे व काय प्राप्त झाले याबाबत पडताळा करुन स्वत:चे मूल्यमापन करता येते. काही बदल आवश्यक असल्यास त्वरीत बदल करता येते.

♦ **पाठ नियोजनातील महत्त्वाच्या बाबी :**

१) पाठ नियोजनात विद्यार्थ्यांच्या कृतीशिलतेला वाव असावा.

२) पाठ नियोजनात लवचिकता असावी. योग्य ठिकाणी बदल आवश्यक वाटल्यास बदल करता आला पाहिजे.

३) नवीन अध्यापन पध्दती, तंत्रे इत्यादींचा समावेश करता आला पाहिजे.

४) विविध कृतींचा समावेश पाठ नियोजनात असणे आवश्यक आहे. यांत्रिकपणा टाळून नाविण्यपूर्ण कृतींचा समावेश केलेला असावा.

५) विद्यार्थ्यांचे पूर्वज्ञान, भौगोलिक, सामाजिक परिस्थिती, स्तर इत्यादी बाबींचा विचार पाठ नियोजनात असावा.

♦ **पाठ नियोजनाच्या पध्दती :**

पाठ नियोजनाच्या खालीलप्रमाणे पध्दती आहेत-

१) हर्बार्टची पंचपदी

२) ब्लुमचे पाठ नियोजन

यापैकी संपूर्ण भारतात हर्बार्टच्या पंचपदीचा वापर करुन पाठ नियोजन केले जाते. हर्बार्टच्या पंचपदीत पुढील गोष्टींचा समावेश असतो.

१) प्रस्तावना

२) हेतुकथन

३) विषय प्रतिपादन

४) पुनरावलोकन/पूनर्भरण

५) गृहपाठ/स्वाध्याय

प्रत्येक पायरीचे विश्लेषणपूर्वक माहिती पुढीलप्रमाणे-

**१) प्रस्तावना :**

वर्गाध्यापन करतांना शिक्षक पाठाची/तासिकेची सुरुवात करतो ती म्हणजे प्रस्तावना. पाठ नियोजनाची ही प्रथम पायरी होय. विद्यार्थ्यांच्या पूर्वज्ञान, अनुभव विश्वाला अनुसरुन, त्याचा वापर करुन विद्यार्थ्यांचे संबंधित पूर्वज्ञान जागृत करण्याची ही पायरी होय. यामध्ये विद्यार्थ्याला ज्या गोष्टी, बाबी माहिती आहेत त्याबाबत प्रश्न विचारुन, त्या संबंधीची चर्चा करुन जो विषय घटक अध्यापन करावयाचे आहे किंवा जी माहिती विवेचन करावयाची आहे त्या घटकाकडे विद्यार्थ्याला नेले जाते. प्रस्तावना फार लांबलचक नसावी. प्रस्तावनेत होय/नाही अशी उत्तरे असणारी प्रश्ने टाळावीत. प्रस्तावना ३-४ मिनिटाची असावी. प्रस्तावना आकर्षक व सहेतुक असावी. त्यासाठी चित्रे, तक्ते यांचा वापरासह ध्वनीफित, भाषणांच्या CDs, कॅसेट यासोबत प्रोजेक्टर, संगणक सारख्या साधनांचाही वापर प्रसंगी करावा.

प्रस्तावना नवीन विषयाकडे विद्यार्थ्यांना मार्गक्रमण करण्याच्या दृष्टीने महत्त्वाची असते.

**२) हेतुकथन :**

प्रस्तावना नंतरची पायरी म्हणजे हेतुकथन. पाठ नियोजनातील ही दुसरी पायरी होय. प्रस्तावना व विषयाचे प्रतिपादन यामधील जोडणारा दुवा म्हणजे हेतुकथन होय. हेतुकथनाचा उद्देश आपण काय शिकणार आहोत किंवा पाठयांशाचा उद्देश काय आहे हे स्पष्ट करणे होय. प्रस्तावना माहिती असलेल्या भागावरुन अज्ञात भागाकडे नेणाऱ्या विषय प्रतिपादनाच्या मधला टप्पा म्हणजे हेतुकथन. पूर्वज्ञानाचा नवीन ज्ञानाशी संबंध जोडण्याची कळी म्हणजे हेतुकथन होय. हेतुकथनाद्वारे शिक्षकाने पाठयांशाद्वारे काय अध्ययन करावयाचे आहे हे वक्तव्य करणे अपेक्षित असते.

शिक्षकाने स्पष्टपणे एका वाक्यात हेतुकथन करावे.

**३) विषय प्रतिपादन :**

विषय प्रतिपादन पाठ नियोजनाची तिसरी पायरी होय. प्रत्यक्ष कोणता विषयभाग, पाठयांश शिकवायचा आहे तो भाग म्हणजे विषय प्रतिपादन होय. या पायरीत शिक्षक विषयांश, पाठयांश घटक मुद्दे यांचे स्पष्टीकरण करतो. त्यासाठी विविध दृकश्राव्ये साधनांचा वापर करतो, विद्यार्थ्यांकडून कृती करुन घेतो,

त्याचबरोबर अपेक्षित कृती होत आहे किंवा नाही याबाबीचे निरीक्षण करतो. विषय प्रतिपादन हा पाठाचा गाभा आहे. शिक्षकाचे विषय प्रतिपादन जेवढे प्रभावी होईल तेवढयाच प्रमाणात पाठाची उद्दिष्टे सफल होईल. शिक्षक विषय प्रतिपादन प्रभावी होण्याच्या दृष्टीने स्पष्टीकरणार्थ किंवा माहिती प्रतिपादन करण्यासाठी प्रभावी साहित्यांचा, प्रतिकृती, चित्रे, ध्वनीफित इत्यादींचा वापर करतो. सध्याच्या काळात संगणक, प्रोजेक्टर यासारख्या साधनांचाही अध्यापक वापर करतात.

विषय प्रतिपादन करतांना शिक्षकाची भाषा सहज, सोपी असावी. कोणत्याही प्रकारची संदिग्धता नसावी स्पष्टीकरणात सुस्पष्टता, सुसूत्रता असावी, मुद्देसूदपणा असावा, आवश्यक फलक लेखन कार्य असावे. फलकावर मुद्दे, उपमुद्दे लेखन करावे. पाठयांशाचे स्पष्टीकरण करतांना विद्यार्थ्यांच्या अवधानाकरीता अधूनमधून प्रश्न विचारावे. पाठयांशाच्या दृष्टीने २० ते २२ मिनिटांमध्ये विषयाशांचे स्पष्टीकरणाचे नियोजन करावे. विद्यार्थ्यांकडून कृतीयुक्त सहभाग घ्यावा. त्यामुळे पाठ कंटाळवाणा होत नाही.

तात्पर्य विषय प्रतिपादन करतांना शिक्षकाने सर्व बाजूंनी समन्वय साधून पाठयांशाचे स्पष्टीकरण करावे.

**४) पुनरावलोकन किंवा संकलन :**

पाठ नियोजनातील ही चौथी पायरी असून या पायरीमध्ये विद्यार्थ्यांना अध्यापन केलेल्या भागाचे आकलन कितपत झाले हे पडताळा करावयाचे असते. विषय प्रतिपादन केलेला भाग विद्यार्थ्यांना कितपत समजला हे तपासणे म्हणजे पुनरावलोकन होय. पुनरावलोकनात ४-५ प्रश्न विचारतात. नकाशा भरवून घेणे, रिकाम्या जागा भरा यासारख्या प्रश्नोत्तराद्वारे परंतु होय किंवा नाही असे प्रश्न टाळून शिक्षक पुनरावलोकन करु शकतात. पुनरावलोकन करण्यापूर्वी फलकलेखन कार्य पुसावे. नकाशे, चित्रे, पुस्तके, वह्या इत्यादी बंद करावे. पाठाची, उद्दिष्टांची कितपत पूर्ती झाली यादृष्टीने मूल्यमापनात्मक प्रश्न विचारणे पुनरावलोकनात अपेक्षित असते.

**५) गृहपाठ/स्वाध्याय :**

ही पाठ नियोजनाची शेवटची पायरी होय. या पायरीमध्ये अध्यापन केलेल्या पाठयांशाच्या आधारे विद्यार्थ्यांनी स्वयंअध्ययन करावे असे अपेक्षित असते. स्वाध्याय म्हणजे स्वत: अभ्यास करणे होय. यासोबतच विद्यार्थ्यांना घरी अभ्यास करण्यासाठी गृहपाठ देतात. स्वाध्याय, गृहपाठ क्रमिक पुस्तकासोबत क्रमिक पुस्तका बाहेरील विद्यार्थ्यांच्या अनुभव विश्वाशी अनुरुप असू शकतो. स्वाध्याय व गृहपाठामुळे विद्यार्थ्यांची उजळणी व सराव होतो. विद्यार्थ्यांनी अध्ययन केलेल्या माहिती मिळवलेल्या बाबीवरुन स्वत: अध्ययन करावे व शिकलेल्या बाबींचे सरावासह जीवनात उपयोग करावा अशी अपेक्षा असते.

स्वाध्याय फार लांबलचक, माहितीचा भरणा असलेला नसावा. स्वाध्याय, गृहपाठ करतांना विद्यार्थ्यांना गोडी, रुची वाटली पाहिजे. स्वाध्याय अपेक्षित उद्दिष्टपूर्तीसाठी पूरक असावा. गृहपाठ, स्वाध्याय शिक्षकाने आवर्जून तपासले पाहिजे. चुकांची दुरुस्ती करुन योग्य मार्गदर्शन केले पाहिजे.

स्वाध्याय व गृहपाठ कृतीयुक्त असावा. विद्यार्थ्यांना परिणामकारक अध्ययन करण्यासाठी स्वाध्याय व गृहपाठाची भूमिका महत्त्वाची ठरते.

पाठ नियोजनाचा नमुना तक्ता पुढीलप्रमाणे -

**पाठ नियोजन**

**इयत्ता - आठवी**

**विषय - इतिहास** वेळ ३५ मि.

घटक : इतिहासाची साधने

उपघटक : भौतिकसाधने, लिखित साधने

पाठ साहित्ये : साधनाच्या वर्गीकरणाचा तक्ता,

भौतिक साधनांची चित्रे

पूर्वज्ञान : विद्यार्थ्यांना नाणी, नोटा बाबत माहिती आहे.

वस्तू, साधने माहित आहे.

| पाठाच्या पायऱ्या | अध्यापन मुद्दे | उद्दिष्टे व स्पष्टीकरणे | शिक्षककृती | विद्यार्थीकृती |
|---|---|---|---|---|
| प्रस्तावना | परिचित नाणी, नोटा | पूर्वज्ञान जागृत करणे. पाठानुकूल वातावरण निर्मिती करणे. | शिक्षक व्यवहारातील नाणी, जुनी नाणी इत्यादी बाबत चर्चा व प्रश्नोत्तर कृतीचे आयोजन करतील. जुन्या काळातील नाणी, नोटा, वस्तूंबाबत प्रश्न विचारतील.<br>प्रश्न : इतिहासा बाबत माहितीचे माध्यम कोणते? | विद्यार्थी लक्षपूर्वक ऐकतील. प्रश्नांची उत्तरे देतील.<br>उत्तर : आधार साधनांद्वारे माहिती मिळते. |
| हेतुकथन | | | आज आपण इतिहासाची साधने याबाबत माहिती पाहूया. | |
| विषय प्रतिपादन | इतिहासाच्या<br>➢ साधनांचे वर्गीकरण<br>➢ भौतिक साधने- | **ज्ञान :**<br>१) इतिहासाच्या साधनांची नावे सांगतो.<br>२) इतिहासाच्या भौतिक साधनांची | इतिहासाची साधने वर्गीकरणाचा तक्ता दाखवतील. त्याचे निरीक्षण करण्यासंबंधी सूचना देतील.<br>भौतिक साधनांबाबत माहिती सांगतील.<br>भौतिक साधनांमधील उदाहरणे वस्तू, वास्तूशिल्प, | विद्यार्थी माहिती श्रवण करतील. तक्त्याचे निरीक्षण करतील.<br>वास्तू, नाणी, पदके इत्यादी |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | पुतळे, स्मारके, नाणी, इमारती, वास्तू<br>➢ महत्त्व | नावे सांगतो.<br>**आकलन :**<br>१) इतिहासाच्या साधनांचे वर्गीकरण करतो.<br>२) भौतिक साधनांचे महत्त्व स्पष्ट करतो.<br>**उपयोजन :**<br>परिसरातील भौतिक साधनांची यादी गोळा करतो. | पुतळे, इमारती, स्मारक, नाणी यांबाबत माहितीचे स्पष्टीकरण करतील. मुद्यांचे फलकलेखन करतील.<br>चित्रे, प्रतिकृती दाखवतील संबंधित घटना, स्थापत्यशास्त्र इत्यादीबाबत माहिती देतील, प्रश्न विचारतील.<br>१) इतिहासाच्या साधनांची नावे सांगा.<br>२) पुतळे व स्मारकाचे महत्त्व सांगा.<br>३) भारतातील संग्रहालयाची नावे सांगा. | बाबींचे महत्त्व समजून घेतील.<br>प्रश्नांची उत्तरे देतील.<br>१) भौतिक, मौखिक व लिखित साधने<br>२) पुतळयामुळे महापुरुषांबाबत माहिती मिळते घटनांचे महत्त्व कळते.<br>३) पुणे आगाखान पॅलेस, अंदमान येथील संग्रहालय, नागपूरचे संग्रहालय |
| पाठयांशाधारित माहितीचे पुनरावलोकन | | प्राप्त ज्ञानाचे दृढीकरण करणे. | पाठयांशाधारित माहितीचे संकलन करुन प्रश्न विचारतील.<br>१) नकाशामध्ये पुणे शहर दाखवा.<br>२) इमारतीमध्ये कोणकोणत्या वास्तूंचा समावेश होतो ?<br>३) पुतळे व स्मारकांचे इतिहासातील महत्त्व काय ? | विद्यार्थी प्रश्नांची उत्तरे देतील.<br>नकाशामध्ये पुणे शहर दर्शवतील.<br>विद्यार्थी वहीत मुद्यांचे लेखन करतील. |
| स्वाध्याय / गृहपाठ | | स्वयंअध्यनाची सवय निर्माण करणे. | शिक्षक फळयावर स्वाध्याय लिहून देतील.<br>प्रश्न : तुमच्या परिसरातील एका प्राचीन वास्तूचे चित्र रेखाटन करा. त्यासंबंधी माहिती गोळा करा. | विद्यार्थी वहीत स्वाध्याय प्रश्नांचे लेखन करतील. |

## नमुना फलक लेखन

इयत्ता आठवी

दिनांक : विषय : इतिहास वेळ : ३५ मि.

घटक : इतिहासाची साधने

पाठयांश : साधनांचे प्रकार, भौतिक साधने

♦ **इतिहासात साधनांचे महत्त्व :**

साधनांचे वर्गीकरण



भौतिक साधने लिखित साधने मौखिक साधने

♦ **स्वाध्याय :**

१) भारतातील ऐतिहासिक संग्रहालयाची यादी तयार करा.
२) पुतळे व स्मारकांचे महत्त्व स्पष्ट करा.

भौतिक साधने
१) इमारती
२) वास्तू
३) पुतळे
४) स्मारके
५) संग्रहालय
६) नाणी
७) पदके

*****

# प्रकरण - १४

# इतिहास अध्यापनातील साहित्ये

शिक्षणाचे उद्दिष्ट विद्यार्थ्यांचा सर्वांगिण विकास होय. त्यासाठी अभ्यासक्रमाचे नियोजन करतात. अभ्यासक्रमाच्या व्यापक स्वरुपावरुन संबंधित वयोगट व इयत्तेनुसार, विषयानुसार पाठ्यक्रम तयार केला जातो. पाठ्यक्रमाच्या नियोजनानंतर संबंधित विषयाची पाठ्यपुस्तके तयार करतात. त्यानुषंगाने वार्षिक, घटक व पाठ नियोजन करतात. शिक्षणाची उद्दिष्ट पूर्तीसाठी दैनंदिन क्रिया म्हणजे पाठ नियोजन व दैनंदिन अध्यापन. विद्यार्थ्यांचे अध्ययन परिणामकारक होण्यासाठी अभ्यासात रुची निर्माण होण्यासाठी त्यांना विविध शैक्षणिक अनुभव देणे गरजेचे आहे.

♦ **अध्ययन-अध्यापन साधने :**

शिक्षण प्रकियेच्या तीन अंगामध्ये शैक्षणिक उद्दिष्टे ठरल्यानंतर त्याच्या प्राप्तीसाठी विविध शैक्षणिक अनुभूती देणे गरजेचे असते. त्याचे स्वरुप विविधांगी असते. अनुभव प्राप्तीनंतर संबंधित घटकाचे आकलन सुलभ होते. अध्यापन मनोरंजक करण्यासाठी, अध्ययनास प्रवृत्त करण्यासाठी ह्या अध्ययन अनुभूती देण्याकरीता विविध साधनांचा वापर करतात त्यांनाच शैक्षणिक साधने म्हणतात.

♦ **शैक्षणिक साहित्याचे प्रकार :**

अ) दृक साधने

ब) श्राव्य साधने

क) दृक-श्राव्य साधने



त्यांच्याबाबत सविस्तर माहिती पुढीलप्रमाणे-

**अ) दृक साधने :** जी साधने प्रत्यक्ष पाहून निरीक्षण करुन विद्यार्थ्यांना अनुभूती होते त्यांना दृक साधने म्हणतात. या साधनामध्ये प्रत्यक्ष पाहता येणाऱ्या वस्तूचा समावेश होतो.

दृक म्हणजे दृश्य- अर्थात डोळयांनी पाहता येणाऱ्या व अनुभव घेता येणाऱ्या वस्तू होय. यामध्ये फळा, चित्रे, तक्ते, आलेख, मॉडेल, नकाशे, सारणी यांचा समावेश होतो.

या प्रत्येक साधनाचे महत्त्व व उपयोग पुढीलप्रमाणे-

**१) फळा :**

फळा हा शिक्षकाचा उत्कृष्ट मित्र आहे असे म्हटले जाते. त्यामुळे पाठ अध्यापन नियोजनाच्या पायरीत फलक लेखनाचा समावेश असतो. इतिहास विषयाचे अध्यापन करतांना फळा शिक्षकास फार सहाय्यभूत ठरतो. शिक्षकाला इतिहासाचे अध्यापन करतांना पाठयांशातील मुद्दे, उपमुद्दे लेखन करणे, महत्त्वाचे शब्द, घटना फळयावर लिहून विषय भागाचे स्पष्टीकरण करता येते. फळ्यावर एखादी घटना तिच्या अनुषंगाने महत्त्वाची स्थळे, सन, कालखंड, कालपट, महत्त्वाच्या व्यक्ती इत्यादी बाबींचे लेखन करुन विद्यार्थ्यांना ते टिपण वहीत लेखन करता येते. पाठातील मुद्यांचे स्वरुप विद्यार्थ्यांच्या व शिक्षकांच्या डोळयासमोर फलक लेखनाद्वारे असल्यामुळे विद्यार्थ्यांना पाठयांश समजून घेण्यास व शिक्षकाला समजावून देण्यास सहाय्य होते. यासोबतच विद्यार्थ्यांना फळयावर स्वाध्याय, गृहकार्य सुध्दा दिले जाते.

शिक्षकाने फळ्याचे दोन भाग करुन लेखन करावे. अक्षरे विद्यार्थ्यांना दिसतील व समजतील अशा आकाराची व वळणदार



असावीत. फलक लेखन मुद्देसूद असावे. अक्षरे सरळ असावे. पाठ

नियोजन करतांनाच फलक लेखनाचा विचार करावा. रंगीत खडूचा वापर केल्यास फलक लेखन आकर्षक दिसते. फलक लेखनातील मुद्यांचा क्रम विकसित असावा. ते परस्पर संबंधित असावे.

इतिहास शिक्षकासाठी फळा खडू हे अतिशय सहाय्यकारी साधने आहे. विद्यार्थ्यांना अध्यनासाठी, मुद्दे टिपण्यासाठी फळा हे उपयुक्त साधन ठरते.

फळा हा शिक्षकाच्या दैनंदिन वापरातील महत्त्वाचे दृक साहित्ये आहे ज्याचा परिणामकारकपणे वापर शिक्षकाने विद्यार्थ्यांच्या दृष्टीने केला पाहिजे.

**२) चित्रे:**

लहानांपासून वृद्धांपर्यंत सर्वांना चित्रे आवडतात. कोणत्याही पुस्तकाचे वाचन करतांना, हाताळतांना सर्वांना आकर्षित करतात ती चित्रे. चित्रे ही महत्त्वाची दृक साहित्ये आहेत. डोळयांनी ८०% ज्ञान प्राप्त होत असल्याने चित्राद्वारे विद्यार्थ्यांना सहजपणे ज्ञान प्राप्त होते. पाहिलेली चित्रे विद्यार्थ्यांच्या डोळयासमोर सदैव उभी राहतात. स्मरणात राहतात. चित्राद्वारे दिलेली माहिती समजण्यास सहाय्य व चिरकाल स्मरणात राहणारी असते.

**♦ चित्रांचे प्रकार पुढीलप्रमाणे** -

**अ) साधी चित्रे :**

ही चित्रे साधी रंगीत असून छोट्या गटातील विद्यार्थ्यांसाठी उपयुक्त ठरतात. ज्या घटना, प्रसंग आहेत त्यानुषंगाने चित्रे पाठ अध्यापनादरम्यान दाखवून माहितीचे स्पष्टीकरण करतात. स्वातंत्र्यपूर्व भारतातील वर्तमानपत्रांचे मुखपृष्ठ, प्राचीन नाणी, वास्तूंचे चित्र, इमारती,

वस्तू चित्रांचा समावेश यामध्ये होतो. हडप्पा, सिंधू संस्कृतीचे अवशेष, गुप्तकालीन मूर्त्यांचे चित्र, अशोककालीन स्तंभ इत्यादींचे चित्र.

अमूर्त व अनाकलनीय बाकींचे आकलन सोपे करण्यासाठी चित्रे सहाय्यभूत ठरतात.

**ब) प्रासंगिक चित्र :**

सदर चित्रे इतिहासातील घडलेल्या घटनेच्या अनुषंगाने साकारलेली असतात. सदर चित्राद्वारे त्या घटनेचे समग्र आकलन करणे सोपे जाते. सदर चित्राद्वारे प्रसंगाचे घटनेचे महत्त्व कळते. सदर चित्रांमध्ये शिवाजी महाराजांच्या राज्यभिषेकाचे प्रसंगचित्र, जालियनवाला बाग हत्याकांडाचे चित्र, दांडीयात्रा, भारत छोडो आंदोलनातील प्रासंगिक चित्रांचे उत्तम नमुने आहेत.

**क) रेखाचित्रे :**

रेखाचित्राद्वारे केलेले स्पष्टीकरण सुध्दा इतिहासात उपयुक्त व परिणामकारक ठरतात. रेखांच्या सहाय्याने काढलेली ही चित्रे असतात. शिक्षक वेळप्रसंगी फळ्यावर सदर चित्रे काढू शकतो. प्राचीन काळातील नाणी, शिवछत्रपतींच्या काळातील हत्यारे व साहित्ये अशी चित्रे या प्रकारातील उत्तम उदाहरणे आहेत.

**ड) व्यंगचित्रे :**

एखादया घटनेवर उपरोधिक केलेली टीका चित्रांच्या सहाय्याने दर्शविली जाते ती म्हणजे व्यंगचित्रे होय. व्यंगचित्रे मनोरंजनासह त्या मधील मर्म दर्शवितात. त्यामधून बोधसुध्दा मिळतो. जुन्या रुढी, परंपरेवर आघात करण्यासाठी केलेली व्यंगचित्रे. आजच्या काळातही वर्तमानपत्रात



अशी व्यंगचित्रे प्रकाशित होत असतात. आधुनिक काळात दोन

राष्ट्रांमधील संबंध दर्शविणारी अनेक व्यंगचित्रे प्रकाशित झालेली दिसून येतात. ही व्यंगचित्रे किशोर गटातील विद्यार्थ्यांना उपयुक्त ठरतात.

**इ) प्रतिकात्मक चित्रे :**

या चित्रांमध्ये कोणत्यातरी वस्तू, साहित्यांचा, व्यक्तींचा, प्रतीकात्मक वापर करुन घटनेचा अर्थ सखोलपणे रंगवलेला असतो. या चित्राचे निरीक्षण काळजीपूर्वक करावे लागते. यासोबत अन्वयार्थ लावतांना संबंधित प्रतिकांचाही अन्वयार्थ लावावा लागतो. चित्रकाराच्या कल्पनाशक्तीचा वापर येथे केलेला असतो. याचा अर्थ समजून घेतांना आनंद प्राप्त होतो.

इतिहास विषयाच्या अध्यापनात विषय घटक भाग सोप्या पध्दतीने समजावून देण्यासाठी चित्रे अतिशय उपयुक्त ठरतात.

चित्रांबाबत काही काळजी घेणे आवश्यक असते-

१) चित्राचा आकार वर्गातील सर्व विद्यार्थ्यांना दिसेल एवढा असावा.

२) विषय घटकाच्या प्रसंग, पाठयांश अनुरुप चित्रे असावीत.

३) चित्रे आकर्षक व घटकांचे निरुपण करणारी असावीत.

४) चित्र वापरासंबंधी शिक्षकाने पूर्व नियोजन केलेले असावे.

५) चित्र निरीक्षण व हाताळण्यासंबंधी विद्यार्थ्यांना पुरेसा अवधी दयावा.

६) चित्रे उद्दिष्टानुरुप व उद्दिष्टे साध्य करण्याच्या दृष्टीने निवडलेली असावीत.

**३) नकाशे :**

इतिहास व भूगोल विषयात नकाशाला खूप महत्त्व आहे. इतिहास विषयाचे कालखंडाबरोबर स्थळांचेही महत्त्व आहे. संबंधित

घटना, प्रसंग कोणत्या कालखंडात घडले, याबरोबरच भौगोलिक दृष्टया

कुठे घडले याबाबतही नोंद केली जाते. त्यादृष्टीने नकाशा हा इतिहास विषयाला पूरक दृक साहित्य आहे.

मानवी उत्क्रांतीच्या इतिहासापासून तर आधुनिक कालखंडापर्यंत मानवी जीवनातील प्राचीन काळात, मध्ययुगीन काळात व आधुनिक काळात घटना, प्रसंग घडलेले आहेत. युद्ध, तहासोबत विविध महत्त्वाच्या घटनांची नोंद झालेल्या आहेत. त्यादृष्टीने स्थळ निर्देश करण्यासाठी इतिहासात नकाशाचा उपयोग महत्त्वपूर्ण ठरतो.

इतिहासाच्या दृष्टीने पाहिल्यास विविध सत्तांनी आपली साम्राज्ये निर्माण केली. कित्येक साम्राज्ये लयाला गेली. सत्तांच्या सीमा कुठपर्यंत विस्तारीत होत्या, महत्त्वाची शहरे कोणती, प्राचीन काळातील महत्त्वाच्या बाजारपेठा, उदयोग केंद्राची शहरे, शिक्षणाची केंद्र, कित्येक हौशी प्रवाशांनी जगाचा विविध ठिकाणी प्रवास केला, प्रवासाचे मार्ग कोणते, महत्त्वाच्या नदया, बंदरे, किल्ले या सर्व बाबीं नकाशाद्वारे दर्शविता येतात.

जसे सम्राट अशोकाचे साम्राज्य विस्तार, गुप्तकालीन भारत यासारख्या इतर साम्राज्यांची सीमा विस्तार, शिक्षणाची प्राचीन केंद्रे तक्षशिला सारख्या विद्यापीठांची स्थाने, फाहियान, युवान श्वांग, कोलंबस, वास्को-द-गामा सारख्या प्रवाशांचे प्रवास मार्ग व अजिंठा, वेरुळच्या लेण्यांसह महत्त्वाचे किल्ले इत्यादी नकाशाद्वारे दाखवता येतात.

नकाशामुळे स्थळ, सीमा इत्यादीची माहिती मिळते. नकाशाच्या सहाय्याने संबंधित घटना, प्रसंग, बाबींची माहिती कमी वेळात देता येते. नकाशा विषय विवेचनास सहाय्यभूत ठरते. विद्यार्थ्यांना नकाशाद्वारे दिलेली माहिती समजण्यास सोपी तथा परिणामकारक ठरते.

♦ **नकाशाबाबत पथ्ये :**

१) नकाशे वर्गातील सर्व विद्यार्थ्यांना दिसतील एवढया आकाराची व रंगीत असावीत.

२) नकाशात प्राचीन नावांसह नवीन नावे दयावीत. उदा. मद्रास (चेन्नई), कोलकाता (कलकत्ता), सिलोन (श्रीलंका), म्यानमार (ब्रम्हदेश)

३) घटकभाग, विषयभागानुसार नकाशाची निवड केलेली असावी.

४) नकाशाच्या वापराचे योग्य नियोजन करावे.

५) प्रमाणित नकाशांचाच वापर करावा.

उपरोक्त विवेचनातून नकाशा हा इतिहास शिक्षकांचा चांगला मित्र आहे हे दिसून येते.

**४) तक्ते :**

इतिहास अध्यापन करतांना विविध घटनांचा उल्लेख येतो. त्या घटनांचा क्रम, विविध साम्राज्याचा विस्तार व ऱ्हास, वंशावळी इत्यादी बाबी सोप्या पध्दतीने समजावण्यासाठी तक्ते अत्यंत उपयुक्त ठरतात. मराठा साम्राज्याचा उदय व सत्तेचा अस्त दाखवतांना शिवाजी महाराजांचे आजोबा बाबाजी भोसले ते सातारा व कोल्हापूर या गादीचे वारस, पेशव्यांच्या कालखंड व वंशावळी दाखवतांना बालाजी विश्वनाथ पासून नानासाहेब पेशव्यांपर्यंतचा वंशवृक्ष तक्त्याद्वारे सोप्या पध्दतीने समजावून सांगता येतात. भारतीय स्वातंत्र्य चळवळीबाबतच्या महत्त्वाच्या घटनांचा क्रम तक्त्याद्वारे दर्शवितात येतात. महात्मा गांधीचे स्वातंत्र्य चळवळीतील योगदानाबाबत तक्ते उपयुक्त ठरतात. यासोबतचे स्वराज्य संस्था त्याची समिती कार्ये, रचना इत्यादी बाबत, संसद, संसदेची रचना, कार्ये, अधिकार इत्यादी बाबत तक्ते अत्यंत उपयुक्त ठरतात.

♦ **उदाहरण स्वरुप तक्ता :**




विद्यार्थ्यांना तक्त्याद्वारे घटनेचे समग्र आकलन करणे सोपे होते. तक्त्यांद्वारे अध्ययन-अध्यापन प्रभावी व परिणामकारक ठरते. तक्त्यामुळे विषय घटक स्मरणात ठेवणे सोपे जाते.

**५) आलेख :**

अध्यापनाच्या वापरातील दृकसाधनापैकी एक प्रभावी साधन म्हणजे आलेख होय. महत्त्वाच्या घटना, महापुरुषांचे जीवनपट इत्यादी करीता आलेख उपयोगी ठरतो. आलेखाचे रेषालेख व स्तंभालेख असे दोन प्रकार आहेत.

**अ) रेषालेख :**

रेषारुप आलेखामध्ये आडव्या अक्षात कालखंड दर्शविला जातो तर उभ्या स्तंभात संबंधित कालखंडातील विस्तार, प्रगती घटनांची नोंद असते. या आलेखात रेषांचा वापर करतात म्हणून याला रेषारुप आलेख म्हणतात. रेषारुप आलेखाद्वारे गुप्तकालीन राजांचा कालखंड मौर्य कालीन वंशावळी, मराठा साम्राज्याची वंशावळ, पेशव्यांची वंशावळ इत्यादींबाबत माहिती दर्शवता येते.

**ब) स्तंभालेख :**

या आलेखात स्तंभाचा वापर केला जातो. यामध्ये विशेषत: संबंधित साम्राज्याची लोकसंख्या, चढउतार इत्यादी बाबींची माहिती

दर्शवणे उपयुक्त ठरते. आलेखातून समग्र चित्र एका दृष्टीक्षेपात कळते. तात्पर्य आलेखाद्वारे शिक्षकांना अध्यापन व विद्यार्थ्यांना माहिती समजून घेण्यास सोपे जाते. विषयाची माहिती तोंडी प्रतिपादनापेक्षा आलेखाद्वारे लवकर समजून घेता येते.

♦ **आलेखाबाबत घ्यावयाची काळजी :**

१) आलेखात प्रमाणाला महत्त्व आहे. आलेख प्रमाणशीर असावे.

२) आलेख स्वच्छ व सुस्पष्ट असावेत.

३) आलेखातील मापे अचूक असावीत.

४) आलेख उद्दिष्ट पूर्तीनुसार, घटक भागानुसार असावे. आकार योग्य असावा.

**६) कालपट व कालरेषा :**

मानवी इतिहासाच्या विकासाचे निश्चित टप्पे केलेले आहेत. घटनांचा काळानुरुप त्यांचे टप्पे पाडलेले आहेत. इतिहासातील महत्त्वाच्या घटनांचा क्रम त्यांचा कालखंड विद्यार्थ्यांना माहिती करुन देणे गरजेचे असते. इतिहासातील अश्मयुग, पाषाणयुग, धातूयुग त्यामधील ताम्रयुग इत्यादी, प्राचीन संस्कृतीचा कालखंड, गुप्तकालखंड, मौर्यसाम्राज्य, सातवाहन, परकीय सत्तेचे आक्रमण, खिलजी कालखंड, मुघल कालखंड, मराठयांचा कालखंड इत्यादी भारतीय स्वातंत्र्य लढयातील टप्पे, १८५७ च्या उठावानंतर प्रबोधन कालखंड, जहालयुग, मवाळयुग, गांधीयुग अशा विविध घटनांचा टप्पा असतो, कालखंड असतो. त्या कालखंडांची माहिती देण्यासाठी कालपट व कालदर्शिकेचा वापर करतात. कालदर्शिका म्हणजेच कालरेषा होय. कालरेषा ह्या उभ्या व आडव्या असतात. इतिहासातील महत्त्वाच्या व्यक्ती, त्यांचे जीवन चरित्राचा कालरेषेवर

त्यांच्या जीवनातील घटनांचे वर्णन दर्शविता येते. कालपट, कालदर्शिका

द्वारे विशिष्ट घटना कोणत्या वर्षी घडल्या याबाबत माहिती मिळते. यासोबत इतिहासात सनावळींचे महत्त्व असल्यामुळे त्या लक्षात ठेवायला सोप्या जातात. कालपटाद्वारे काळाचे, घटनेचे आकलन लवकर व्यवस्थितपणे होते. कालपट व कालरेषाद्वारे दोन घटनांमधील कालावधी, घटनांशी संबंधित बाबींची माहिती होते.

इतिहासाच्या अध्यापनात कालपट व कालरेषाचे महत्त्व आहे.

**७) प्रतिकृती :**

प्रतिकृती हे महत्त्वाचे दृक साधन आहे. ऐतिहासिक काळातील वास्तू, इमारती, नाणी, वस्तू, प्रसंग याबाबींची प्रतिकृती तयार करुन दाखविल्यास विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष अनुभव मिळतो. अध्यापन प्रभावी होते. इतिहासातील किल्ले, ताजमहल, चारमिनार सारख्या वास्तू, मौर्यकालीन, मुगलकालीन, नाणी, वस्तू, वास्तूंच्या प्रतिकृती दाखविल्यास विद्यार्थ्यांना तत्कालिन काळातील खेळणी, वस्तू, वास्तू, इमारतीची कल्पना करुन प्रभावीपणे आकलन होते.

प्रतिकृतीचा आकार वर्गानुसार असावा. सहज विद्यार्थ्यांना हाताळण्याच्या दृष्टीने नाजूक नसाव्यात. प्रतिकृतीमुळे विद्यार्थी आकर्षित होतात. अभ्यासात रुची निर्माण होते. प्रतिकृती तयार करण्यासाठी खर्च येतो. असे असले तरी प्रतिृकतीचा वापर करणे गरजेचे असते.

**८) एपिडायस्कोप :**

हे दृक साधन असून यामध्ये चित्रे, आकृत्या, तक्ते, माहिती पडद्यावर दाखविली जाते. ऐतिहासिक घटना, प्रसंग, स्थळ, वास्तू, पुतळे, इमारती संग्रहालय इत्यादी बाबी दाखवून त्याविषयी माहिती सविस्तर देता

येते. दाखविण्यात येणारी चित्रे काही वेळ स्थिर ठेवून त्याबाबत माहिती

प्रतिपादन करतात. विद्यार्थ्यांचे अवधान टिकवणे. पाठाकडे आकर्षित करण्यासाठी उपयोगी आहे. एपिडायस्कोप हे खर्चिक साधन आहे.

**ब) श्राव्य साधने :**

जी साधने श्रवणाच्या अनुभूती देण्यासाठी वापरली जातात त्यांना श्राव्य साधने म्हणतात. विद्यार्थ्यांना माहितीचे श्रवण करवून देतात. त्याद्वारे अध्ययन अध्यापन अनुभव देतात. यामध्ये प्रत्यक्ष वस्तू किंवा माहिती दिसत नाही. ऐतिहासिक भाषणे, पोवाडा, गीत, ऐतिहासिक व्यक्तीचे विचार इत्यादी माहिती ऐकविता येऊन विद्यार्थ्यांना माहिती प्रभावीपणे समजू शकते.

यामध्ये टेपरेकॉर्डर, आकाशवाणी साधने यांचा समावेश होतो.

**१) टेपरेकॉर्डर :**

टेपरेकॉर्डर हे प्रभावी श्राव्य साधन आहे यामध्ये ऐतिहासिक भाषणे, भाषणाचा सारांश, प्राचीन गीत, आदिवासी संस्कृतीचे गीते, पोवाडे हे ऐकविता येते. शिक्षकांनी आपल्या आवाजात रेकॉर्डींग केलेले पाठाचे भाग, माहिती, चित्रवर्णन, प्रवास वर्णन, वास्तूचे किंवा ठिकाणाचे वर्णन विद्यार्थ्यांना श्राव्य करवून देता येते. तज्ञाची चर्चा, भाषणे, ध्वनिमुद्रीत रेकार्ड करुन ही ऐकविता येते. टेपरेकॉर्डर हे सहजपणे वापरता येणारे साधन असून कुठेही नेता येते. वीजेची सोय नसल्यास बॅटरीचा वापर करुन टेपरेकॉर्डरच्या साधनांचा वापर करता येतो. इयत्ता निहाय इतिहास विषयाची कॅसेट उपलब्ध आहेत. त्यांचा वापर सर्व विद्यार्थ्यांसाठी करता येतो. अध्यापन करतांना आवश्यक तेथे तो घटक वारंवार ऐकविता येते. त्यामुळे अध्यापन करतांना स्वतःच्या वापरानुसार टेपरेकार्डरचा वापर प्रभावी अध्ययन करण्यासाठी होतो.

**२) आकाशवाणी (रेडिओ) :**

सर्वसाधारणपणे सर्व खेडोपाडी पोहोचलेले हे श्राव्यसाधन होय. आकाशवाणीवरुन शालेय विद्यार्थ्यांसाठी विविध कार्यक्रमाचे प्रसारण होत असतात. नियोजनानुसार इतिहास विषयाबाबत कार्यक्रम प्रत्यक्षपणे वर्गात विद्यार्थ्यांना सादरीकरण करता येते. आकाशवाणीचे कार्यक्रम टेपरेकॉर्डर मध्ये रेकॉर्डींग करुन ते पुन्हा पुन्हा ऐकविता येतात. आकाशवाणीमध्ये पोवाडे, गीत, ऐतिहासिक बाबी, घटनांचे युध्दाचे सविस्तर वर्णन, शिक्षकांचे पाठ, नाटिका, केलेले कार्यक्रमाद्वारे विद्यार्थ्यांचे मनोरंजनातून शिक्षण मिळते. आताच्या आधुनिक काळात रेडिओचा वापर कमी झालेला दिसून येतो.

आकाशवाणीद्वारे विद्यार्थ्यांना जे कार्यक्रम ऐकावयाचे आहेत त्याचे नियोजन करुन ठेवणे आवश्यक असते. त्याचे मुद्दे फळयावर लिहून ठेवावे लागतात. ऐकलेल्या कार्यक्रमावर चर्चा घडवून विद्यार्थ्यांचे शंका निरसन केले पाहिजे. अशाप्रकारे आकाशवाणी अध्यापनात विद्यार्थ्यांच्या मनोरंजनासह नाविण्यता आणते.

**क) दृक-श्राव्य साधने :**

ज्या साधनांमध्ये दृक आणि श्राव्य दोन्हीचे मिश्रण असते त्यांना दृक-श्राव्य साधने म्हणतात. अध्यापनासाठी व अध्ययनास प्रेरीत करणारे हे सर्वात प्रभावी साधन मानले जाते. यामध्ये दूरदर्शन, चलचित्रपट, स्लाईड्स, ओव्हर हेड प्रोजेक्टर, व्हिडीओ, संगणक यासह मोबाईलचाही समावेश होतो.

**१) दूरदर्शन :**

दूरदर्शन हे महत्त्वाचे दृक-श्राव्य साधन आहे. यामध्ये चित्रासह श्रवणाची सोय असल्यामुळे विद्यार्थ्यांना मनोरंजनासह माहितीचे प्रभावीपणे

आकलन होते. दूरदर्शनचे पूर्वी काही मोजक्याच शैक्षणिक वाहिन्या होत्या. विशिष्ट कालावधीसाठी कार्यक्रम प्रसारित करण्यात येत होते. आजच्या आधुनिक काळात वाहिन्यांमध्ये वाढ झालेली असून नानाविध प्रकारचे शैक्षणिक कार्यक्रम प्रसारित होतात. इतिहासासंबंधी प्रसारित होणाऱ्या कार्यक्रमांची यादी अगोदरच प्राप्त करुन शिक्षकाने त्या कार्यक्रमासंबंधी पूर्वतयारी केल्यास दूरदर्शनचा शैक्षणिक साहित्य म्हणून प्रभावीपणे वापर करता येतो.

दूरदर्शनाद्वारे इतिहासाचे विषयभाग प्रभावीपणे सादरीकरण करता येते. विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष अनुभूती मिळते. विषयभाग लवकर समजतो. विद्यार्थ्यांना विषयभाग चिरकाळ स्मरणात राहतो. दूरदर्शनद्वारे ज्या वास्तूंना, इमारती किंवा ठिकाणे आपण भेटी देऊ शकत नाही त्या विषयभागाचे पाठयांशाची प्रत्यक्ष अनुभूती देता येते. दूरदर्शनवरील विषयभागाचे प्रकटीकरण करण्यापूर्वी प्रस्तावना किंवा विषयाची पार्श्वभूमी देणे गरजेचे राहते. दूरदर्शनवरील दाखविलेल्या विषय भागावर चर्चा घडवून आणणे, त्यावर विद्यार्थ्यांचे मत, विचार जाणून घेणे गरजेचे असते. दूरदर्शनवर प्रसारित होणाऱ्या तज्ञाची भाषणे, संसदेची कार्यपध्दती, इत्यादी माहिती दिल्यास अनाकलनीय बाबींचे प्रत्यक्ष दर्शन, माहिती विद्यार्थ्यांना मिळते. आजच्या काळात पुष्कळ शैक्षणिक वाहिन्या स्वतंत्रपणे वेगवेगळे विषय भाग प्रसारित करतात. त्या शैक्षणिक बाबींचे शाळेत प्रसारण दाखवले तर विद्यार्थ्यांना मनोरंजनासह निरीक्षण शक्तीत वाढ होवून शैक्षणिक वातावरण तयार होते. शिक्षकांच्या वेळेची बचत होते. दूरदर्शन महागडे साहित्य असले तरी आजच्या काळात प्रभावी शैक्षणिक साहित्य म्हणून उपयुक्त ठरते. शिक्षणात रुची निर्माण करण्यास दूरदर्शन सहाय्यकारी ठरते.

**२) स्लाईड :**

प्रभावी दृक-श्राव्य साहित्यापैकी एक म्हणजे स्लाईड. प्रोजेक्टरचा वापर करुन स्लाईड पडद्यावर दाखवतात. इतिहासामध्ये दौलताबादच्या किल्ल्यासारखे अनेक किल्ले, त्याची रचना, वास्तूशिल्पाचे महत्त्व, विविध प्राचीन लेणी, चित्रकलेचे नमुने, विविध सत्तांच्या साम्राज्य विस्ताराचे नकाशे इत्यादी प्रत्येक विषयभागावर स्लाईड बाजारात उपलब्ध आहेत. उपलब्ध नसल्यास स्वत: शिक्षक ते तयार करु शकतात.

स्लाईडद्वारे विषय प्रतिपादन केल्यास शिक्षकाच्या वेळेची व श्रमाची बचत होते. यासोबत विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष अनुभव मिळाल्यामुळे प्राप्त ज्ञान चिरकाळ स्मरणात राहते. स्लाईड पुन्हा पुन्हा दाखवून उजळणी घेता येते. यासोबतच स्लाईडला आवश्यक त्या ठिकाणी काही काळ थांबवून माहिती सांगता येते. स्लाईडचा उपयोग पाठ नियोजनाच्या सर्व पायऱ्या किंवा काही पायऱ्यांसाठी करता येतो.

स्लाईड खर्चिक साधन असले तरी ते वजनाने हलके असल्यामुळे कुठेही नेता येते. शैक्षणिक वातावरण निर्मितीसह प्रभावी अध्यापन व अध्ययनास सहाय्यकारी ठरते.

**३) व्हिडीओ व सीडी प्लेअर :**

आजच्या काळात व्हिडीओ कालबाहय होऊन त्याची जागा सी.डी., डी.व्ही.डी. यांनी घेतली. इतिहासातील विविध ऐतिहासिक स्थळे जसे दिल्लीतील संसद भवन, लाल किल्ला सारख्या ठिकाणाची माहितीवर आधारित व्हिडीओ निर्मिती करुन किंवा बाजारातील उपलब्ध व्हीडीओ, डी.व्ही.डी., सी.डी. विद्यार्थ्यांना दाखवून विषयाची माहिती दाखवता येते. यामध्ये जेवढा वेळ पाहिजे तेवढा वेळ सी.डी. चा वापर करुन प्रस्तावनासह, विषय प्रतिपादन व उजळणी करता येते. विद्यार्थ्यांना

व्हि.डी.ओ. द्वारे दाखवलेली माहिती प्रत्यक्ष अनुभव करुन देता येते. विद्यार्थ्यांचे मनोरंजनासह विद्यार्थ्यांना त्या विषयाचे आकलन लवकर होते. विद्यार्थ्यांना विषयभाग चिरकाळ स्मरणात राहतो. त्यासंबंधी शिक्षकाने व्यवस्थित नियोजन करणे गरजेचे असते. व्ही.डी.ओ. किंवा सी.डी. हे महागडे साधन असले तरी त्याद्वारे अध्यापन केलेला भाग प्रभावी ठरतो. विद्यार्थ्यांना अध्ययनात रुची निर्माण करण्यास सहाय्यकारी ठरतो. व्हिडीओमुळे शिक्षकाच्या श्रमाची व वेळेची बचत होते. विद्यार्थ्यांशी व्हिडीओच्या द्वारे दाखविलेल्या भागावर चर्चा केल्यास त्यांच्या समस्या दूर करता येतात. विषयांशाचे समग्र आकलन होते.

व्ही.डी.ओ., सी.डी. ह्या परिणामकारपणे सहाय्यभूत ठरणारे शैक्षणिक साहित्य आहे.

**४) संगणक :**

आजचे युग संगणकाचे युग आहे. जगभरातील ज्ञान आज संगणकाच्या माध्यमातून घरी बसल्या प्राप्त होते. ज्ञानाचा प्रचंड महासागर म्हणून संगणक ओळखले जाते. इतिहास विषय नव्हे तर सर्व विषयाचे ज्ञानाचे अथांग महासागर संगणक आहे. संगणकाद्वारे इतिहास विषयाच्या बहुतांश सर्व भागाबाबत माहिती देता येते. आधुनिक युगात संगणकाद्वारे शिक्षण ही संकल्पना रुढ होऊ लागलेली आहे. विद्यार्थ्यांना जगाच्या कानाकोपऱ्यात घडलेली माहिती क्षणार्धात प्राप्त होऊन अद्यावत राहता येते. संगणकाद्वारे शिक्षकाला encyclopedia, Wikipedia, इतिहासासंदर्भात विविध ebooks, journal, magazine इत्यादींचा प्रचंड साठा संदर्भ व विषय पुस्तक प्राप्त होतात. इतिहास विषयाचे अध्यापन करतांना विविध आधार स्त्रोतांची माहिती, अतिरिक्त संदर्भ ग्रंथ, पूरवणी वाचन यासाठी संगणक खूप उपयोगी पडतो.

इतिहासातील विविध विषयभागासंबंधी भरपूर माहिती चित्रासह मिळते. विविध शैक्षणिक व्हिडीओ, माहितीपट, चित्रफिती असल्यास विद्यार्थ्यांना इतिहास विषय भागाचे अध्यापन करतांना शिक्षकांच्या श्रमाची, वेळेची बचत होते. विद्यार्थ्यांना तो विषयभाग लवकरात लवकर आकलन होण्यास मदत होते. संगणकाद्वारे विविध विषयभागाची चित्रे, व्हिडीओद्वारे माहिती विद्यार्थ्यांचे अवधान टिकविण्यास, अध्ययनास गतीशिलता देते. याशिवाय त्या विषयात रुची निर्माण करते.

विद्यार्थ्यांना कोणत्याही विषयभाग जसे हडप्पा संस्कृती, त्यामधील इमारती, स्नानगृहे, नाणी लोकजीवन बाबत सविस्तर माहिती. चित्रे, व्हिडीओद्वारे देता येते. शिवाय अतिरीक्त माहितीसाठी संगणक उपयोगी ठरतो. विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष अनुभव मिळतो. अमूर्तबाबी मूर्त स्वरुपात विद्यार्थ्यांसमोर प्रकट झाल्याने त्यांना विषय सोपा वाटतो. स्वयं अध्ययनासाठी संगणक फार उपयोगी आहे. विषय प्रतिपादनासह सराव, उजळणी करीता सुध्दा संगणकाचा उपयोग होतो.

आज Digital classroom व e-learning ची संकल्पना सुध्दा रुजू लागलेली आहे. यामध्ये विद्यार्थ्यांना Laptop, tab इत्यादीसह विविध app download करुन त्यांना अध्यापन केले जाते. स्वयं अध्ययन, उजळणी, सराव यासोबत छोटया छोटया वस्तुनिष्ठ प्रश्नांच्या चाचण्यासाठी सुध्दा उपयोग करण्यात येत आहे.

ज्ञानार्जन करण्यासह प्रभावी अध्यापनाच्या दृष्टीने संगणक अत्यंत प्रभावी शैक्षणिक साहित्य असले तरी ते खर्चाच्या दृष्टीने महागडे आहे. त्याचा वापरासाठी इंटरनेटची गरज असते. वीजपुरवठा असणे

आवश्यक असल्यामुळे भारतातील खेडोपाडी पोहोचणे सध्याच्या काळात

पूर्णपणे शक्य नाही. तरीही संगणकाच्या युगात इतिहास अध्यापनाच्या दृष्टीने संगणकाचा अध्यापनात उपयोग करण्याची आवश्यकता आहे.

**५) मोबाईल/भ्रमणध्वनी :**

आजच्या काळात सर्वत्र, सर्व व्यापी व सर्वांजवळ आढळणारी वस्तू म्हणजे मोबाईल. आजच्या युगात नवनवीन तंत्रज्ञान विकसित होत आहे. आजच्या काळात मोबाईल हे शिक्षकास उपयुक्त ठरणारे प्रभावी दृक श्राव्य साधन आहे. मोबाईलमध्ये इंटरनेटच्या माध्यमाने इतिहासाशी संबंधित नवनवीन App download करुन त्याद्वारे इतिहासाच्या गाथांची माहिती देता येते. विविध Apps द्वारे विषयभागासंबंधी विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष अनुभूती देता येते. याशिवाय मोबाईल हे सर्वत्र आढळणारे एकप्रकारचे मिनी लॅपटॉप किंवा मिनी कॉम्पुटर आहे.

इतिहास संबंधित विविध व्ही.डी.ओ., You Tube किंवा इतर Apps मध्ये download असतात. त्यांचा शोध फक्त शिक्षकाने घेणे गरजेचे आहे. त्या व्ही.डी.ओ. चे चित्रीकरण वर्गात विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष दाखवून त्यांना अनाकलनीय बाबींचे प्रत्यक्ष यथार्थ दर्शन ठरवून अध्यापन प्रभावी करता येते. पाठ नियोजनातील प्रस्तावना, विषय प्रतिपादनासह उजळणी, सरावच नव्हे तर मूल्यमापनासाठी मोबाईलचा वापर करता येतो. ई-पुस्तके, जर्नल, संदर्भग्रंथ इत्यादींची माहिती मिळते.

मोबाईलद्वारे इतिहासाचे अध्यापन केल्यास विद्यार्थ्यांचे पाठात अवधान टिकून राहते. विद्यार्थ्यांना विषयात रुची निर्माण होते. दीर्घकाळ ते ज्ञान स्मरणात राहते. त्यांना स्वयं अध्ययनसुध्दा करता येते. आजच्या काळात मोबाईल वापर ही सर्वत्र आढळणारी गरजेची वस्तू बनलेली आहे.

शिक्षणातून अभ्यासक्रमाची उद्दिष्टे साध्य करण्यासाठी अध्ययन-अध्यापन प्रक्रिया परिणामकारक असणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने अध्यापन प्रक्रिया सहेतूक, परिणामकारक गुणवत्तापूर्वक दर्जाची करण्यासाठी विविध दृक, श्राव्य, दृक-श्राव्य तेही आधुनिक तंत्रज्ञानासह शिक्षकाला वापरणे गरजेचे असते. दृक-श्राव्य शैक्षणिक साहित्यामुळे अध्यापन प्रभावी, परिणामकारक अध्ययनपूरक ठरते. शैक्षणिक साधने शिक्षण प्रकियेला सुलभता व गती प्रदान करतात.

*****

# प्रकरण - १५

## मूल्यमापन

शिक्षणातून काही उद्दिष्टे निश्चित केली जातात. त्या उद्दिष्टांची पूर्तता, विद्यार्थ्यांमध्ये अपेक्षित वर्तनबदल साध्य झाले किंवा नाही या बाबींचा पडताळा होणे अपेक्षित आहे. ह्या पडताळा किंवा तपासणीलाच मूल्यमापन असे म्हणतात. मूल्यमापनास शिक्षण प्रक्रियेत महत्त्वाचे स्थान आहे.

♦ **अर्थ :**

मूल्यमापन ह्या शब्दासाठी इंग्रजी पर्यायी शब्द Evaluation हा आहे. Evaluation हा शब्द Evalulate या इंग्रजी धातूपासून तयार झालेला आहे. मूल्यमापन व परीक्षा कित्येकदा एकाच अर्थाने वापरले जाणारे शब्द आहेत. त्यामध्ये मात्र भरपूर फरक आहे. परीक्षा ही मर्यादित बाब आहे तर मूल्यमापन ही संकल्पना व्यापक आहे. मूल्यमापनाची व्याप्ती परीक्षा या शब्दाच्या अर्थाने फार मोठी आहे.

मूल्यमापन ह्या शब्दाची फोड केल्यास मूल्य आणि मापन हे दोन शब्द मूल्य ही बाब गुणात्मक असून मापन हे संख्यात्मक असते. मूल्यमापनात संख्यात्मक व गुणात्मक दोन्हीचे मोजमाप करणे अपेक्षित आहे.

जेव्हा विद्यार्थ्यांचे संख्यात्मक व गुणात्मक दोन्ही बाजूंनी सांगोपांग विश्लेषण करुन परीक्षण केले जाते. त्याला मूल्यमापन असे संबोधता येईल. मूल्यमापनात केवळ लेखी परीक्षाच महत्त्वाची नाही तर विद्यार्थ्यांमध्ये अपेक्षित बदल काय घडून आला या गुणात्मक बाबींचे सुध्दा

मूल्यांकन अपेक्षित असते. शिक्षणप्रक्रियेत विद्यार्थ्यांमध्ये ज्ञानात्मक, भावात्मक व क्रियात्मक या तिन्ही घटकांच्या अनुषंगाने विकासात्मक बदल आवश्यक असतो. यासोबतच विद्यार्थ्यांच्या आवडी निवडी, अभिवृत्ती, कल्पना, विचार, भावना, कौशल्ये, सवयी याबाबत काय बदल घडून आला व किती या बाबींचे मापनही मूल्यमापनात अपेक्षित असते.

♦ **मूल्यमापनाच्या व्याख्या :**

१) **वा. ना. दांडेकर यांचे मते-** "शैक्षणिक उद्दिष्टे किती प्रमाणात साध्य झाली हे ठरविण्यासाठी उपयोजिलेली सूत्रबद्ध पध्दती म्हणजे मूल्यमापन होय."

२) **न. रा. पारसनीस यांचे मते-** "शैक्षणिक उद्दिष्टे साध्य झालीत याचे अवलोकन करणे म्हणजे मूल्यमापन होय."

३) **ड्रिवन वंट यांच्या मते-** "मूल्यमापन ही परीक्षा नसून विद्यार्थ्यांत झालेल्या अपेक्षित बदलांचे मूल्यांकन करण्याचे तंत्र होय."

४) **मोफात यांचे मते-** "मूल्यमापन निरंतर चालणारी प्रक्रिया असून विद्यार्थ्यांमध्ये व्यक्तिमत्व विकास, भावनात्मक, क्रियात्मक तथा बोधात्मक विकासासंबंधित अपेक्षित वर्तनातून व्यक्त करण्याची प्रक्रिया होय.

५) **वेस्ले यांचे मते-** "मूल्यमापनात मापनांच्या क्षेत्रापेक्षा व्यापक दृष्टीने वस्तुनिष्ठपणे मापन करणे अपेक्षित आहे."

६) **क्विलिन व हन्ना यांचे मते-** "शाळांद्वारे विद्यार्थ्यांच्या वर्तनात आलेल्या परिवर्तनाचे विषयाच्या प्रमाणितपणे एकत्रीकरण करुन त्याचे चिकित्सक विश्लेषण करणे म्हणजेच मूल्यमापन.

शिक्षण प्रक्रियेची तीन महत्त्वाची अंगे व त्यांचा परस्पर संबंध-

शैक्षणिक उद्दिष्टे



शैक्षणिक अनुभव        मूल्यमापनाची साधने

वरील आकृतीस मूल्यमापनाचा त्रिकोण म्हणतात.

**१) शैक्षणिक उद्दिष्टे :**

शिक्षणातून कोणती ध्येये साध्य करावयाची आहेत यालाच शैक्षणिक उद्दिष्टे म्हणतात. शिक्षणाची उद्दिष्टे राष्ट्राच्या आशा, आकांक्षा, काळानुसार देशाच्या अपेक्षा नुसार असतात. त्यासाठी अभ्यासक्रमाचे नियोजन केले जाते. अभ्यासक्रमाच्या आखणी बाबतचे नियोजन करतांना, भौगोलिक परिस्थिती, विद्यार्थ्यांचे वयोगट, स्तर इत्यादी बाबींचा विचार केला जातो. अभ्यासक्रमातून कोणत्या बाबी साध्य करावयाच्या आहेत, विद्यार्थ्यांमध्ये कोणत्या कृती घडवून आणावयाच्या आहे, ज्या गोष्टीची साध्यता करावयाची आहेत त्यांना शैक्षणिक उद्दिष्टे म्हणतात. ह्या शैक्षणिक उद्दिष्टांची पूर्तता वर्ग अध्यापनातून करावयाची असतात. शैक्षणिक उद्दिष्टे ठरविल्यानंतरच अनुभवांची निवड करावी लागते. त्यानुसार मूल्यमापनाची साधने निश्चिती करावी लागतात.

तात्पर्य विद्यार्थ्यांमध्ये ज्ञानात्मक (बोधात्मक), भावात्मक व क्रियात्मक कोणते बदल व विकास घडवून आणावयाचे आहे, ह्यांची निश्चिती म्हणजेच शैक्षणिक उद्दिष्टे होय.

**२) शैक्षणिक अनुभव :**

शैक्षणिक उद्दिष्टे ठरविल्यानंतर त्या उद्दिष्टांच्या पूर्तीसाठी, शैक्षणिक प्रक्रिया, अध्यापन कार्य पूर्तीसाठी, परिणामकारक होण्यासाठी काही अध्ययन अनुभव द्यावे लागतात. अध्ययन-अनुभव शिक्षण प्रक्रियेला सुकर करते. अध्ययन अनुभव हे शाब्दिक, दृक, श्राव्य, दृक-श्राव्य, प्रत्यक्ष, अप्रत्यक्ष अशा विविध स्वरुपाचे असतात. अध्ययन अनुभवात अभ्यासक्रम, त्याच्या पूर्ततेसाठी तयार केलेले पाठ्यक्रम, त्यानुसार तयार झालेले पाठ्यपुस्तक, विविध साधने, अध्यापन पध्दती इत्यादी सर्व बाबींचा समावेश होतो.

शैक्षणिक अनुभवाची परिणामकारकता तपासण्यासाठी मूल्यमापन केले जाते.

**३) मूल्यमापनाची साधने :**

शैक्षणिक उद्दिष्टांची पूर्तता किती झाली हे तपासणे म्हणजे मूल्यमापन. उद्दिष्टे ठरविल्यानंतर त्या उद्दिष्टांच्या अनुषंगाने दिलेले अध्ययन-अनुभव किती परिणामकारक ठरले. उद्दिष्ट पूर्ती झाली काय या बाबीची तपासणी किंवा पडताळणी करण्यासाठी विविध मूल्यमापनाच्या साधनांचे नियोजन करण्यात येते. यामध्ये लेखी, तोंडी, प्रात्यक्षिक परीक्षा सोबत निरीक्षण, पडताळा सूची सारख्या साधनांचा वापर केला जातो.

उद्दिष्टांची पूर्तता झाली काय, अध्ययन अनुभव पुरेशी होती काय हे मूल्यमापनाद्वारे तपासल्यानंतर त्यासंबंधित काय परिणाम मिळाला याबाबतची फेरतपासणी करणे गरजेचे आहे. मूल्यमापनानंतर उद्दिष्टे पूर्तता जर झाली नसेल तर अध्ययन अनुभव बदलण्याची किंवा मूल्यमापन साधनांमध्ये बदल घडवून आणावी लागत असल्यास त्याबाबत पुनर्विचार

करणे सोपे जाते. या तिन्ही घटकामध्ये पुन्हा बदल घडवून आणून निश्चित उद्दिष्टांची पूर्ती करता येते.

शैक्षणिक उद्दिष्टे, अध्ययन अनुभव व मूल्यमापन ह्या तिन्ही प्रक्रिया परस्पर पूरक असून हे चक्र अविरत सुरु राहणारे आहे.

♦ **मूल्यमापनाची वैशिष्टये :**

१) शैक्षणिक उद्दिष्टांची साध्यता तपासणे.

२) मूल्यमापनासाठी अनेक साधनांचा वापर करावा लागतो.

३) लेखी परीक्षा, तोंडी, प्रात्यक्षिक परीक्षांसारख्या साधनांचा समावेश असतो.

४) मूल्यमापन ही सतत चालणारी प्रक्रिया आहे.

५) मूल्यमापनामुळे शिक्षणाची उद्दिष्टे साध्य झाली किंवा नाही हे तपासून प्रत्याभरण करता येते.

६) मूल्यमापन ही व्यापक दृष्टीकोनाची संकल्पना आहे.

७) गुणात्मक व संख्यात्मक दोन्ही दृष्टीकोनातून मूल्यमापन केले जाते.

♦ **मूल्यमापनाचे हेतू :**

१) विद्यार्थ्यांचे पूर्वज्ञान तपासणे.

२) अध्यापनाच्या उद्दिष्टांची निश्चिती करणे.

३) उद्दिष्टांच्या प्राप्तीसाठी विविध साधनांचे प्रयोजन करणे.

४) विद्यार्थ्यांच्या अपेक्षित वर्तनबदल तपासण्यासाठी विविध साधनांचे नियोजन करणे.

५) उद्दिष्टे साध्य झाली किंवा नाही याची तपासणी करणे.

६) उद्दिष्ट प्राप्ती झाली नसल्यास प्रत्याभरण करुन पुन्हा प्रयत्न करणे.

७) मूल्यमापनाद्वारे उद्दिष्ट प्राप्तीची फलश्रुती झाल्यास पुढील उद्दिष्टे ठरविणे.

♦ **मूल्यमापनाची साधने :**

शिक्षण प्रक्रियेत सतत परिवर्तन होत असतात. त्याचप्रमाणे शिक्षणात नवनवीन संकल्पनांचा समावेश होतो. मूल्यमापनाबाबत ही तसेच घडते. पूर्वीच्या शिक्षण पध्दतीत लेखी परीक्षा घेणे म्हणजेच मूल्यमापन होय अशी धारणा होती. विद्यार्थ्यांचा सर्वांगिण विकास म्हणजे फक्त ज्ञानात्मक विकास नव्हे तर भावात्मक व क्रियात्मक क्षेत्रातही विकास होणे अपेक्षित असते. त्यानुसार या तिन्ही क्षेत्राच्या प्रगतीचे मूल्यमापन होणे गरजेचे असते. त्यानुसार मूल्यमापन प्रक्रियेत विविध साधनांचा वापर करावा लागतो.

**मूल्यमापनाची साधने पुढील प्रमाणे आहेत-**



♦ **संख्यात्मक साधने :**

या साधनाद्वारे विद्यार्थ्यांचे संख्यात्मक मापन करण्यात येते. भारतात या साधनांचा वापर सर्रासपणे केला जातो.

**अ) लेखी परीक्षा :**

भारतीय शिक्षणपध्दतीत मूल्यमापनाची प्रचलित पध्दती म्हणजे लेखी परीक्षा होय. या पध्दतीचे वैशिष्ट म्हणजे एकाचवेळी जास्तीत जास्त विद्यार्थ्यांचे मूल्यमापन करता येते. या साधनाच्या वापरास कमी व ठराविक वेळ लागतो. शिक्षकास पेपर तपासणे इत्यादी कार्य सोपे जाते. लेखी परीक्षेत खालील प्रमाणे प्रश्नांचा समावेश होतो.

**१) निबंधवजा :**

प्राचीन परीक्षा पध्दतीपासून निबंधवजा प्रश्नास महत्त्व व प्राधान्य होते. विद्यार्थ्यांचे ज्ञान, आकलन, स्मरण इत्यादी बाबींचे मूल्यमापन निबंधवजा प्रश्नांतून केले जाते. विद्यार्थ्यांना उत्तरातून लिखाण पध्दती, मांडणी इत्यादीं बाबत माहिती होते. या प्रश्नांची उत्तरे साधारणत: ७० ते ८० ओळींच्या वर अपेक्षित असतात.

उदा. १) १८५७ च्या उठावाची कारणे स्पष्ट करा.

२) १८५७ च्या उठावाचे परिणाम स्पष्ट करा.

अशा प्रकारच्या प्रश्नांचे नियोजन करण्यात येते.

♦ **निबंधवजा प्रश्नांचे फायदे :**

१) निबंधवजा प्रश्नामधून विद्यार्थ्यांच्या विचार व्यक्त करणे, कल्पना करणे, लेखन कौशल्ये, लेखन क्षमतांची तपासणी केली जातो.

२) विद्यार्थ्यांची भाषिक कौशल्ये व लेखन क्षमतांचा विकास होतो.



३) विद्यार्थ्यांना आपले विचार व्यक्त करण्याची संधी मिळते.

४) निबंधवजा प्रश्नाद्वारे नवनवीन कल्पनांना वाव मिळतो.

५) विद्यार्थ्यांची स्मरणशक्ती वाढते.

६) प्रश्नांची संख्या कमी असते.

७) कागद, वेळ व छपाईची बचत होते.

**♦ निबंधवजा प्रश्नांची मर्यादा :**

**१) व्यक्तिनिष्ठता :**

निबंधवजा प्रश्नांच्या तपासणीत शिक्षकांची व्यक्तिनिष्ठता आड येते. दोन परीक्षकांद्वारे एकाच उत्तरांना वेगवेगळे गुणांकन मिळते. त्यामूळे मूल्यमापनात मर्यादा येते.

**२)** निबंधवजा प्रश्नांच्या बाबतीत विद्यार्थ्यांच्या उत्तरात व्यक्तिनिष्ठता येते. एकाच प्रश्नांच्या बाबतीत दोन विद्यार्थी वेगवेगळी दृष्टीकोन मांडू शकतात.

**३)** निबंधवजा प्रश्नांतून स्मरणशक्तीचे मूल्यमापन अधिकाधिक होते. ज्ञान व आकलन आधारित प्रश्नांचाच समावेश होतो. त्यामुळे उपयोजन, कौशल्ये इत्यादी बाबींना वाव राहत नाही.

**४)** प्रश्नांची संख्या कमी असल्यामुळे संपूर्ण अभ्यासक्रमावर प्रश्न विचारले जाण्याची शक्यता कमी असते. त्यामुळे विद्यार्थी संपूर्ण अभ्यास करीत नाही किंवा ती प्रवृत्ती कमी होते.

**५)** प्रश्नपत्रिका छपाई, वेळ कमी लागत असला तरी उत्तरांची तपासणी करण्यासाठी वेळ जास्त लागतो.

**६)** उत्तरात मोघमता असते. सुस्पष्ट, वस्तुनिष्ठता असण्याची शक्यता कमी असते. संदिग्धता जास्त असल्यामुळे मनातील कोणत्याही मुद्यांची मांडणी करुन काहीही उत्तरे लिहिण्याची प्रवृत्ती विद्यार्थ्यांमध्ये

वाढण्याची शक्यता असते. कित्येकदा प्रश्नांच्या अनुसरुन उत्तरे लिहिलीच जात नसल्याचे दिसून येते.

**२) लघुत्तरी प्रश्न :**

ज्या प्रश्नांची उत्तरे १ ते ७ ओळींत लिहावी अपेक्षित असते त्या प्रश्नांना लघुत्तरी म्हणतात. ह्या प्रश्नामध्ये स्पष्टता असते उत्तरही स्पष्ट असतात. १ ते ५ गुणांचे प्रश्न असल्यामुळे जास्तीत जास्त प्रश्न विचारता येतात. निबंधवजा प्रश्नांमध्ये लघुत्तरी प्रश्न विचारुन दोष दूर करता येतो. लघुत्तरी प्रश्नामध्ये टीपा लिहा, थोडक्यात उत्तरे लिहा, कारणे दया इत्यादी स्वरुपाची प्रश्ने विचारता येतात. लघुत्तरी प्रश्नाद्वारे विद्यार्थ्यांच्या ज्ञान व आकलनाचे मूल्यमापन करता येते.

**♦ लघुत्तरी प्रश्नांचे फायदे :**

१) प्रश्नांना कमी गुण असल्यामुळे जास्तीत जास्त प्रश्न विचारता येतात.

२) संपूर्ण अभ्यासक्रमावर आधारित प्रश्न विचारता येतात.

३) प्रश्न व उत्तर यामधे नेमकेपणा व स्पष्टपणा असल्याने गुणांकन, परीक्षण करतांना फारशी व्यक्तिनिष्ठता येत नाही.

४) प्रश्नपत्रिका काढणे, तपासणे सोपे जाते.

५) या प्रश्नांबाबत विश्वसनियता अधिक आहे.

**♦ लघुत्तरी प्रश्नांचे दोष :**

१) विद्यार्थ्यांना थोडक्यात आपले उत्तर लिहावयाचे असल्याने स्वत:चे विचार, कल्पना स्पष्टपणे मांडण्याकरीता संधी कमी मिळते.

२) भाषा शैली, लेखनशैली, लेखन क्षमता बाबत मूल्यांकन होऊ शकत नाही.



**प्रश्न :** थोडक्यात उत्तरे लिहा, टिपा दया, कारणे लिहा.

### ३) वस्तुनिष्ठ प्रश्न :

ज्या प्रश्नांची उत्तरे नेमकी, निश्चित असून स्थळ, काळ, व्यक्तीनुसार उत्तर व मूल्यांकनात बदल होत नसतो त्यांना वस्तुनिष्ठ प्रश्न म्हणतात. आधुनिक शिक्षणात मूल्यमापन अंतर्गत लेखी परीक्षेसाठी वस्तुनिष्ठ प्रश्नांच्या वापरात वाढ झालेली आहे. स्पर्धा परीक्षा, कित्येक अभ्यासक्रमाच्या पूर्व परीक्षा, संगणक आधारित परीक्षांमध्ये सुध्दा या प्रश्नांचा वापर झपाटयाने वाढल्याचे दिसून येते.

**♦ वस्तुनिष्ठ प्रश्नांचे फायदे :**

१) वस्तुनिष्ठ प्रश्नाचे उत्तर निश्चित असते. त्यामुळे मूल्यमापनात व्यक्तिनिष्ठता आड येत नाही.

२) पूर्ण अभ्यासक्रमावर भरपूर प्रश्न काढता येते.

३) प्रश्नांची रचना करणे सोपे असते.

४) प्रश्नांची उत्तर तपासणे सोपे असते.

५) ज्ञान, आकलन, उपयोजन स्तरावर प्रश्न विचारता येतात.

६) विद्यार्थ्यांना अशा परीक्षेबाबत, प्रश्नांबाबत सखोल सविस्तर अभ्यासाची सवय लागते.

**♦ वस्तुनिष्ठ प्रश्नांच्या मर्यादा :**

१) प्रश्नांची संख्या भरपूर असते. छपाई, कागद यासाठी वेळ लागतो.

२) प्रश्नांचा दर्जा गुणवत्तापूर्वक असल्यासच सदर प्रश्नांची परिणामकारकता ठरते.

३) पाठांतरावर, स्मरणावर भर देण्याची शक्यता असते.

४) विद्यार्थ्यांच्या स्वत:च्या विचारास, कल्पनाशक्तीत संधी मिळत नाही.

५) भाषा शैली, हस्ताक्षर, लेखनशैलीस वाव मिळत नाही त्याचे मूल्यांकन होत नाही.

६) पर्याय देतांना सर्व पर्याय सशक्त असावेत. उत्तर सूचित करणारे पर्याय असण्याची संख्या जास्त असू शकते.




**अ) प्रत्यास्मरणात्मक प्रश्न :**

या वस्तुनिष्ठ प्रश्नाच्या प्रकारात विद्यार्थ्यांना एका शब्दात उत्तरे लिहितांना ती आठवून लिहावयाचे असते. या प्रश्नाचे स्वरुप पुढीलप्रमाणे-

**प्रश्न : रिकाम्या जागा भरा.**

राष्ट्रीय काँग्रेसची स्थापना इ.स. ________ मध्ये झाली.

**प्रश्न : एका शब्दात उत्तरे लिहा.**

स्वामी विवेकानंदांचे गुरु = __________

**प्रश्न : पुढील विधान पूर्ण करा.**

औद्योगिक क्रांतीचा प्रारंभ __________ या देशात झाला.

**प्रश्न : पुढील तक्ता पूर्ण करा.**

| **कार्ये** | **ब्रिटीश व्यक्ती** |
|---|---|
| १) सतीबंदीचा कायदा केला. | ________ |
| २) राष्ट्रीय काँग्रेसच्या स्थापनेत पुढाकार. | ________ |

**ब) प्रत्याभिज्ञानात्मक :**

ज्या वस्तुनिष्ठ प्रश्नांची उत्तरे आठवून न लिहिता ओळखून लिहावयाची असतात, दिलेल्या पर्यायातून ठरवायची असतात त्यांना प्रत्यभिज्ञानात्मक वस्तुनिष्ठ प्रश्न म्हणतात. यामध्ये पुढील प्रश्नांचा समावेश होतो.

**१) व्दि पर्यायी प्रश्न :**

या प्रश्नप्रकारात उत्तराचे दोन पर्याय दिलेले असून त्यामधून एकाची निवड करावयाची असते. या प्रश्नांची रचना करणे सोपी असते यामध्ये गुणदान करण्यास सोपे असते, असे असले तरी अंदाजे उत्तर देण्याची संख्या जास्त असू शकते. दोनच पर्याय असल्याने सूचकांद्वारे उत्तरे देण्याची शक्यता असल्यामुळे यावर मर्यादा घेतात.

या प्रश्नांचे स्वरुप पुढीलप्रमाणे

**प्रश्न :** पुढील विधाने वाचून ती खरे किंवा खोटी ते लिहा.

**प्रश्न :** पुढील वाक्ये सत्य किंवा असत्य ठरवा.

**प्रश्न :** पुढील पर्यायापैकी एक पर्याय रिकाम्या जागी लिहा.

(ताराबाई शिंदे/ताराबाई मोडक) ______ यांनी स्त्री-पुरुष तुलना हा ग्रंथ लिहिला.

**२) बहु पर्यायी प्रश्न :**

या प्रश्नामध्ये ३, ४ पर्याय दिलेले असून त्यामधून अचूक उत्तर निवडावयाचे असते. लोकसेवा आयोग पूर्व परीक्षा, प्राध्यापक पात्रता चाचणी, आचार्य पदवी पात्रता पूर्व चाचणी सारख्या स्पर्धा परीक्षासाठी या बहुपर्यायी वस्तुनिष्ठ प्रश्नांचा कल वाढलेला आहे. यामध्ये सर्व पर्याय सशक्त असणे आवश्यक आहे.

♦ **बहु पर्यायी प्रश्नांचे फायदे :**

१) अंदाजे उत्तर देण्याच्या प्रवृत्तीत घट होते.

२) गुणदान करणे सोपे असते.

३) विद्यार्थ्यांना सखोल अभ्यासाची सवय लागते.

४) ज्ञान, आकलन, उपयोजन इत्यादी सर्व बाबींवर प्रश्न विचारता येतात.

५) ह्या पध्दतीला मानसशास्त्रीय आधार आहे.

♦ **बहु पर्यायी प्रश्नांच्या मर्यादा :**

१) बहुपर्याय देतांना सर्व पर्याय सक्षम असणे गरजेचे असते. ते जिकरीचे काम असून त्यासाठी तज्ञाची आवश्यकता असते.

२) ज्ञानाधारित प्रश्नांची संख्या जास्त असते.

३) लेखन कौशल्ये, भाषिक कौशल्याची तपासणी करता येत नाही.

यामध्ये पुढील प्रकारच्या प्रश्नांची रचना करता येते.

♦ **प्रश्न** : १८०२ मध्ये ---- पेशव्याने इंग्रजांशी तैनाजी फौजेचा करार केला.

अ) थोरले बाजीराव ब) सवाई माधवराव

क) पेशवे नानासाहेब ड) दुसरा बाजीराव

♦ **जोडया लावणे :**

या प्रश्नप्रकारात दोन स्तंभ असतात. पहिल्या स्तंभातील माहितीच्या आधारित दुसऱ्या स्तंभातील योग्य पर्यायाशी जोडी जुळवावी

लागते. पहिल्या स्तंभातील घटना, माहिती एवढेच पर्याय दुसऱ्या स्तंभात देतात. कधी कधी दुसऱ्या स्तंभातील पर्यायांची संख्या प्रश्नापेक्षा जास्तही असू शकते.

| **'अ' स्तंभ सन** | **उत्तरे** | **'ब' घटना स्तंभ** |
|---|---|---|
| १) १८५७ | [ ] | (अ) मराठी सत्तेचा उदय |
| २) १८१८ | [ ] | (ब) राष्ट्रीय उठाव |
| ३) १८८५ | [ ] | (क) मराठी सत्तेचा अस्त |
| | | (ड) राष्ट्रीय सभेची स्थापना |

♦ **फायदे :**

१) प्रश्नांची रचना करणे सोपे असते.

२) गुणदान करणे सोपे असते.

३) ज्ञान, आकलनासाठी प्रश्न प्रकार उपयुक्त आहे.

४) जास्तीत जास्त प्रश्न विचारता येतात. उत्तर तपासणीस वेळ कमी लागतो.

♦ **मर्यादा :**

१) या प्रश्नप्रकारात अंदाजे उत्तरे लिहिण्याची शक्यता नाकारता येत नाही.

२) याद्वारे स्मरणशक्तीचेच मूल्यमापन होते.

३) विद्यार्थ्यांच्या कल्पना शक्ती, विचार शक्तीस, लेखन शैलीस वाव मिळत नाही.

♦ **सूचीनुसार क्रम लावणे :**

या प्रश्न प्रकारात घटना दिलेल्या असतात. त्यांचा योग्य क्रम, प्रवाह जुळवणे अशा प्रकारचे प्रश्न असतात. विद्यार्थ्यांना त्या घटना व क्रम यांचा योग्य अंदाज घेऊन क्रम लावणे अपेक्षित असतात.

**प्रश्न : पुढील सामाजिक संस्थांचा काळानुरुप क्रम लावा.**

अ) ब्राम्हो समाजाची स्थापना.

ब) सत्यशोधक समाजाची स्थापना.

क) प्रार्थना समाजाची स्थापना.

ड) आर्य समाजाची स्थापना.

या प्रश्नाच्या बाबतीत विद्यार्थ्यांना आशयाचे ज्ञान, आकलन उत्तम प्रकारे करवून घेणे आवश्यक ठरते.

♦ **नकाशावाचन :**

इतिहासात नकाशाला महत्त्व आहे. त्यामुळे इतिहासातील घटना व त्यानुषंगाने तत्कालिन नकाशातील स्थिती याबाबत माहितीचे ज्ञान मूल्यमापन करण्याच्या दृष्टीने नकाशाधारित प्रश्नांचे आयोजन केले जाते.

या प्रश्नप्रकारात मार्ग दर्शवणे, प्रदेश रंगवणे इत्यादी प्रकारच्या प्रश्नांचे आयोजन करतात.

**प्रश्न** : १) भारताच्या नकाशात सम्राट अशोकाच्या कालखंडातील साम्राज्य विस्तार प्रदेश रंगवा.

२) भारतातील पहिली रेल्वे सुरु झालेल्या दोन ठिकाणांचा मार्ग दर्शवा.

**ब) तोंडी परीक्षा :**

प्राचीन काळापासून तोंडी परीक्षेचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. गुरुकुल पध्दतीत विविध विषयाचे ज्ञान देण्याच्या पध्दतीत तोंडी/मुखोद्‌गत पध्दती प्रचलित होती. मूल्यमापनसुध्दा तोंडी परीक्षेद्वारे घेण्यात येई. वेदमंत्र, संस्कृत श्लोक यांचे मुखोद्‌गत सर्वश्रुत आहे. कित्येक कविता अभंग, ओव्या प्राचीन काळापासून आजपर्यंत तोंडी माध्यमातून संक्रमित झालेल्या आहेत. आज शिक्षणपध्दतीत तोंडी कार्याला महत्त्व आहे. गणिती सूत्रे,

पाठेपाठांतर सारख्या बाबी तोंडी पध्दतीचे महत्त्व पटवून देतात. इतिहास विषयातही तोंडी परीक्षेचे महत्त्व आहे. विविध घटनांचा क्रम, मुगलकालीन बादशहाचा कार्यकाल, विविध घटना व त्यांचा कालखंड कित्येक शिक्षक व विद्यार्थ्यांना मुखोद्‌गत असतात. या बाबींमुळेच लेखी परीक्षेसह तोंडी परीक्षा आपले महत्त्वाचे स्थान टिकवून आहे. लहान वयोगटातील मुले व्यवस्थित लेखन करु शकत नाही. त्यासाठी तोंडी परीक्षा उपयुक्त ठरते. काही उद्दिष्टांची पूर्तता तोंडी परीक्षेद्वारेच करता येते.

ज्या बाबींचे मापन लेखी परीक्षेतून करता येत नाही त्यासाठी तोंडी परीक्षा फायदेशीर ठरते.

♦ **तोंडी परीक्षेचे फायदे :**

१) विद्यार्थ्यांच्या तोंडी परीक्षेतून भाषा शैली, सभाधीटपणा विकसित होते.

२) लेखी परीक्षेवरील भार कमी होतो. लेखी परीक्षेएवढा ताण तोंडी परीक्षेत दिसत नाही.

३) ज्ञान, आकलन व उपयोजनाधारित प्रश्नांसाठी तोंडी परीक्षा उपयुक्त ठरते.

४) ज्यांची लेखनकौशल्याबाबत अडचण आहे त्यांच्या शैक्षणिक प्रगतीबाबत तोंडी परीक्षा फायदेशीर ठरते.

५) लहान मुलांसाठी तोंडी परीक्षा उपयुक्त आहे.

६) इतिहासातील घटना, प्रसंगाचे वर्णन, सन इत्यादी तोंडी परीक्षेद्वारे अभिव्यक्त करता येतात.

७) तोंडी परीक्षा वैयक्तिक पणे घेत असल्यामुळे प्रत्येकाचे व्यवस्थित मूल्यमापन करता येते.

८) वस्तुनिष्ठ प्रश्न, चित्रवर्णन, नकाशा वर्णन यासारख्या प्रश्नांसाठी उपयुक्त ठरते.

♦ **तोंडी परीक्षेच्या मर्यादा :**

१) तोंडी परीक्षेला वेळ जास्त लागतो.

२) उत्तरे नोंदवण्याची सोय नसते. त्यामुळे प्राप्त गुणांची फेरतपासणी करता येत नाही.

३) एकदा व्यक्त केलेले मत, घटना प्रसंग वर्णनची जशीच्या तशी वर्णन पुन्हा विद्यार्थी करेल याबाबत साशंकता असते.

४) तोंडी परीक्षेपूर्वी वातावरण निर्मिती करण्याची आवश्यकता असते. मानव विरहीत वातावरण निर्माण होईलच याची शक्यता नसते.

५) तोंडी परीक्षेतील गुणांकनात व्यक्तिनिष्ठता येण्याची शक्यता असते.

६) संपूर्ण बाबीचे तोंडी परीक्षेद्वारे मूल्यमापन होत नाही.

७) विद्यार्थी संख्या जास्त असल्यास परीक्षकास कंटाळा येतो व यांत्रिकपणा येण्याची शक्यता असते.

८) स्मरणाधारित प्रश्न पाठांतर वृत्तीत वाढ होते.

या मर्यादा असल्या तरी तोंडी परीक्षेचे इतिहास विषयाच्या मूल्यमापनातील महत्त्व कमी होत नाही.

**क) प्रात्यक्षिक परीक्षा :**

एखादी कृती केली की ती चिरकाल स्मरणात राहते. शिक्षणात कृतीद्वारे शिक्षण दिले की त्या गोष्टी विद्यार्थ्यांना लवकर समजतात. विद्यार्थ्यांच्या सर्वांगिण विकासाच्या दृष्टीने क्रियात्मक विकासाचे मूल्यमापन करण्यासाठी प्रात्यक्षिक परीक्षा उपयुक्त ठरते.

प्रात्यक्षिक परीक्षेद्वारे विशिष्ट कौशल्याची तपासणी होऊ शकते. गणित, विज्ञाना सारख्या विषयात प्रात्यक्षिक परीक्षेला महत्त्व आहे.

इतिहास विषयामध्ये सुध्दा प्रात्यक्षिक परीक्षेचा वापर करता येतो.

नकाशामध्ये प्रदेश, स्थळे, मार्ग दाखवणे. नकाशा भरणे किंवा रंगवणे. यासारख्या कृती सोबत विविध वास्तू, किल्ले इत्यादींचे रेखाटन करणे, प्रतिकृती तयार करणे, चित्रे काढणे इत्यादी बाबींची प्रात्यक्षिक परीक्षा घेता येते.

प्रात्यक्षिक परीक्षमध्ये विद्यार्थ्यांकडून गीत, पोवाडे इत्यादी गायन करुन घेता येते. यासोबतच नाटयीकरण, पोवाडा, गीत गायनावर अभिनय सुध्दा करवून घेता येते. अशाप्रकारे इतिहासामध्ये प्रात्यक्षिक परीक्षेचे आयोजन करता येते.

♦ **प्रात्यक्षिक परीक्षेचे फायदे :**

१) क्रियात्मक विकासासाठी प्रात्यक्षिक परीक्षा उपयुक्त ठरते.

२) लहान मुले लेखनामध्ये मागे असणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रात्यक्षिक परीक्षेतून संधी मिळते.

३) प्रत्यक्ष कृती करावयाची असल्यामुळे मुलांना आनंद मिळतो. ते कृती करतात.

४) विद्यार्थी स्वत: कार्य करतात त्यामुळे त्यांच्या अडचणी वैयक्तिकपणे दूर करता येतात.

♦ **प्रात्यक्षिक परीक्षेचे दोष :**

१) प्रात्यक्षिक परीक्षेकरीता वेळ जास्त लागतो.

२) प्रात्यक्षिकांकरीता साहित्यांची गरज असते. म्हणून खर्चिक आहे.

३) प्रात्यक्षिक परीक्षेमध्ये व्यक्तिनिष्ठता येण्याची शक्यता असते.

४) विद्यार्थ्यांच्या सर्व बाबींचे मूल्यमापन होत नाही.

५) सर्व घटकांवर प्रात्यक्षिक परीक्षा घेता येईल असे नाही.

लेखी परीक्षा, तोंडी परीक्षा, प्रात्यक्षिक परीक्षांव्यतिरिक्त इतिहास विषयामध्ये निरीक्षणात्मक साधनतंत्रे, आत्म निरीक्षणात्मक साधनतंत्रे

इत्यादी गुणात्मक साधनतंत्राचा योग्य ठिकाणी अध्यापकाने आपल्या कौशल्यानुरुप वापर करावा.

**♦ घटक चाचणी :**

घटक नियोजन करतांना त्या घटकामधून ठरवलेली उद्दिष्टे, अध्ययन निष्पत्ती प्राप्त झाली काय, संबंधित घटक भाग कितपत समजला या बाबींची तपासणी करण्यासाठी घटक चाचणीचे आयोजन केले जाते. मूल्यमापनात घटक चाचणी महत्त्वपूर्ण ठरते. घटक चाचणी म्हणजे लेखी परीक्षेसारखी विशिष्ट घटकांवर आधारित कसोटी होय.

**♦ गरज :**

१) घटक नियोजनातील निश्चित केलेला घटक, त्यामधील उपघटक विद्यार्थ्यांना कितपत समजला यांची तपासणी घटक चाचणी द्वारे होते.

२) संबंधित घटकांची उद्दिष्टे प्राप्त झाली काय हे ठरवता येते.

३) विद्यार्थ्यांनी अपेक्षित अध्ययन स्तराची प्राप्ती केली काय याबाबत माहिती होते.

४) विद्यार्थ्यांचे अध्ययनातील उणीवा, दोष कच्चे दुवे निश्चिती होते. परिणामकारक अध्ययनासाठी नियोजन करता येते. उपाययोजना करता येतात.

५) शिक्षकांना आपल्या वर्गातील विद्यार्थ्यांच्या संपादणूकीचा स्तर कळतो. त्यानुसार अध्यापन पध्दती, अध्ययन अनुभव, उपचारात्मक अध्यापन इत्यादी बाबींत सुधारणा करता येते.

६) विद्यार्थ्यांच्या प्रगतीचे चित्र स्पष्ट होते. त्यांना योग्य मार्गदर्शन करता येते.



अशाप्रकारे घटकचाचणी विद्यार्थी व शिक्षकांसाठी गरजेची ठरते.

♦ **आराखडा :**

घटक चाचणी ही शास्त्रशुध्द, विश्वसनीय, वस्तुनिष्ठपणे विद्यार्थ्यांचे मूल्यमापन करणारी असावी. त्यादृष्टीने घटक चाचणीचे नियोजन करतांना आराखडा तयार करणे गरजेचे ठरते.

♦ **आराखडयातील महत्त्वाच्या बाबी :**

**१) उद्दिष्टांनुसार गुणविभागणी :**

संबंधित घटक शिकवण्यामागील उद्दिष्टे काय आहेत हे ठरवलेली असतात संबंधित उद्दिष्टांनुसार मापन करताना गुणांची निश्चिती करणे आवश्यक असते.

**२) उपघटकानुसार गुण विभागणी :**

संबंधित घटकात कोणकोणते उपघटक अंतर्भूत आहेत, त्या उपघटकांच्या महत्त्वानुसार त्यांना किती गुण दयायचे हे ठरवावे लागते. त्यानुसार गुणांची विभागणी करतांना उपघटकांचा प्रामुख्याने विचार करावा लागतो.

**३) प्रश्नप्रकारानुसार गुण विभागणी :**

घटक चाचणी एक प्रकारची लेखी परीक्षाच होय. यामध्ये विविध प्रश्नांचा समावेश असणे गरजेचे असते. त्यानुसार कोणत्या प्रकारचे प्रश्न असावे, प्रश्न प्रकारानुसार किती गुण ठरवावे, प्रश्नांची संख्या किती असावी या सर्व बाबींचा विचार घटक चाचणीत करावा लागतो.

प्रश्नांच्या प्रकारानुसार घटक चाचणीत वस्तुनिष्ठ, लघुत्तरी, निबंधवजा तिन्ही प्रकारच्या समावेश असणे अपेक्षित असते.

♦ **काळजी :**

१) उद्दिष्टे, उपघटक, प्रश्न प्रकारानुसार घटक चाचणी तयार केलेली असावी.

२) प्रश्नांची भाषा सुस्पष्ट असावी. संदिग्धता नसावी.

३) गुणांची विभागणी न्यायिक असावी.

४) घटक चाचणी उद्दिष्ट पूर्तीस सहाय्यभूत ठरणारी असावी.

५) संविधान तक्त्यानुसार घटकचाचणी असावी.

६) उत्तरसूची तयार करुन ठेवावी.

♦ **संविधान तक्ता :**

मूल्यमापन प्रकियेत लेखी परीक्षा असो किंवा घटक चाचणी यामध्ये चाचणीचे नियोजन करतांना संविधान तक्ता सर्वप्रथम तयार करणे महत्त्वाचे ठरते.

संविधान तक्ता म्हणजे Blue Print. उद्दिष्टांनुसार, उपघटकानुसार, प्रश्नांच्या प्रकारानुसार तीन आराखडे तयार केले जातात. त्याचे एकत्रित संकलित चित्र म्हणजे संविधान तक्ता होय. याला त्रिमितीपत्रक असेही म्हणतात. संविधान तक्त्यामुळे चाचणी तयार करण्याचे काम सोपे होते.

**घटकचाचणी आराखडा**

**इयत्ता ८ वी** **घटक — ब्रिटीश सत्ता व भारत**

**एकूण गुण : २५**

♦ **तक्ता क्र. १ उद्दिष्टांनुसार गुण विभागणी**

| **अ.क्र.** | **उद्दिष्टे** | **गुण** | **शेकडा गुण** |
|---|---|---|---|
| १ | ज्ञान | १० | ४०% |
| २ | आकलन | ०८ | ३२% |
| ३ | चिकित्सक विचार | ०७ | २८% |
| | **एकूण गुण** | **२५** | **१००%** |

♦ **तक्ता क्र. २ उपघटकानुसार गुण विभागणी**

| **अ.क्र.** | **उद्दिष्टे** | **गुण** | **शेकडा गुण** |
|---|---|---|---|
| १ | ब्रिटीश सत्तेचे परिणाम | ०८ | ३२% |
| २ | १८५७ चा स्वातंत्र्य लढा | १२ | ४८% |
| ३ | सामाजिक व धार्मिक प्रबोधन | ०५ | २०% |
| | **एकूण गुण** | **२५** | **१००%** |

♦ **तक्ता क्र. ३ प्रश्न प्रकारानुसार गुण विभागणी**

| **अ.क्र.** | **प्रश्नप्रकार** | **प्रश्नसंख्या** | **गुण** | **शेकडा गुण** |
|---|---|---|---|---|
| १ | वस्तुनिष्ठ | ०८ | ०८ | ३२% |
| २ | लघुत्तरी | ०३ | ०७ | २५% |
| ३ | निबंधवजा | ०२ | १० | ४०% |
| | **एकूण गुण** | | **२५** | **१००%** |

♦ **संविधान तक्ता**

| **अ. क्र.** | **उपघटक** | **ज्ञान** | | | **आकलन** | | | **चिकित्सक विचार** | | | **एकूण** | | | **एकूण** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | **व** | **ल** | **नि** | **व** | **ल** | **नि** | **व** | **ल** | **नि** | **व** | **ल** | **नि** | |
| १ | ब्रिटीश सत्तेचे परिणाम | ३ | | | | | ५ | | | | ३ | - | ५ | ८ |
| | | (३) | | | | | (१) | | | | (३) | - | (१) | (४) |
| २ | १८५७ चा स्वातंत्र्य लढा | ४ | | | | ३ | | | | ५ | ४ | ३ | ५ | १२ |
| | | (४) | | | | (१) | | | | (१) | (४) | (१) | (१) | (६) |
| ३ | सामाजिक व धार्मिक प्रबोधन | १ | | | | २ | | | २ | | १ | ४ | - | ५ |
| | | (१) | | | | (१) | | | (१) | | (१) | (२) | - | (३) |
| | एकूण | ८ | | | | ५ | ५ | | २ | ५ | ८ | ७ | १० | २५ |
| | | | | | | (२) | (१) | | (१) | (१) | (८) | ३ | (२) | (१३) |

(कंसातील आकडे प्रश्न संख्या दर्शवितात)

## नमुना घटक चाचणी

**इयत्ता आठवी      एकूण गुण : २५**

**विषय : इतिहास      वेळ : ४० मि.**

**प्रश्न १ ला रिकाम्या जागी योग्य शब्द लिहा. (४)**

१) रामकृष्ण मिशनची स्थापना ---------- यांनी केली.

२) भारतातील संस्थाने खालसा ------- या गव्हर्नर जनरलने केली.

३) स्वातंत्र्यवीर सावरकरांनी १८५७ च्या उठावाला ---- हे नाव दिले.

४) इ.स. १८०२ मध्ये ------- या पेशव्याने तैनाती फौजेचा स्वीकार केला.

**प्रश्न २ रा. योग्य जोडया जुळवा. (४)**

| 'अ' गट | | 'ब' गट |
|---|---|---|
| १) लॉर्ड कॉर्नवालिस | (  ) | अ) दुहेरी राज्यव्यवस्था |
| २) राबर्ट क्लॉइव्ह | (  ) | ब) पहिला गव्हर्नर जनरल |
| ३) लॉर्ड डलहौसी | (  ) | क) मुलकी नोकरशाही |
| ४) वॉरन हेस्टिंग | (  ) | ड) दत्तक विधान नामंजुर |

**प्रश्न ३ रा थोडक्यात उत्तरे लिहा. (३)**

१) १८५७ च्या राष्ट्रीय उठावाची तत्कालिन घटना स्पष्ट करा.

**प्रश्न ४ था कारणे लिहा. (४)**

१) समाज सुधारकांनी स्त्री शिक्षणाची सुरुवात केली.

२) इंग्रजाविरुध्द पाईकांनी सशस्त्र उठाव केला.

**प्रश्न ५ वा खालील प्रश्नांची सविस्तर उत्तरे लिहा. (१०)**

१) १८५७ च्या स्वातंत्र्य लढयाचे परिणाम लिहा.

२) ब्रिटीश सत्तेमुळे भारतात सुधारणा झाली काय? तुमचे मत व्यक्त करा.

### ♦ नैदानिक चाचणी :

निदान हा डॉक्टरी म्हणजे वैद्यकीय व्यवसायाशी निगडीत शब्द आहे. ज्याप्रमाणे आजार झाल्यानंतर रोगी व्यक्ती डॉक्टरकडे जातो, डॉक्टर त्याला तपासून विविध बाबींचे निरीक्षण करुन, प्रश्न विचारुन त्या रोगाची निश्चिती करतो. आवश्यकता असल्यास विविध तपासणी चाचणी करण्यास सांगतो. रोगाचे निदान करतो. औषधी देतो व रोग बरा होण्यासाठी प्रयत्न करतो. वेळ प्रसंगी शस्त्रक्रियासुध्दा करतो. रोगी व्यक्ती रोगमुक्त होण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करुन रोगापासून व्यक्तीला व्याधीमुक्त करतो हिच प्रक्रिया शिक्षण क्षेत्रामध्ये घडत असतात.

विद्यार्थ्यांची प्रगती व्हावी हे प्रत्येक शिक्षकाचे ध्येय, उद्दिष्टे असते. वर्गात अध्यापन करतांना सर्वच विद्यार्थी सारख्या संपादणूक स्तराचे नसतात. त्यामध्ये विविधता असते, अध्यापन करतांना विषय भाग स्पष्टीकरण देतांना विविध अध्ययन-अनुभव अध्यापक देतो. त्याद्वारे विषयभाग त्यांना समजेल यासाठी प्रयत्न करतो. तो विषयभाग सर्वांना लगेच समजेल किंवा सर्वांना अध्ययन प्रभुत्व प्राप्त होईल असे नाही. काही विद्यार्थी तो घटक लगेच समजून घेतात तर काहींना वेळ लागतो. दिलेले अध्ययन अनुभवाद्वारे काही विद्यार्थ्यांना तो घटक मात्र समजत देखील नाही. त्यामुळे त्यांना प्रगती करता येत नाही. अध्ययन-अध्यापन प्रक्रियामध्ये दिलेले अध्ययन अनुभव जरी सर्वांना दिले तरी ते काही विद्यार्थ्यांना पुरेसे सुध्दा ठरणार नाही. अशा स्थितीत त्यांना संपादणूकीचा अपेक्षित स्तर गाठता येणार नाही ते मागे राहतात. या सोबतच व्यक्तिभेदामुळे सुध्दा काही विद्यार्थी अभ्यासात मागे राहतात. विषय घटक भाग समजून घेण्यास अडचणी निर्माण होतात. त्यामुळे विद्यार्थी अध्ययन

करण्याचा आत्मविश्वास गमावतात. अशावेळी अध्यापकाला विद्यार्थ्यांच्या नेमक्या अडचणींचा शोध घेणे गरजेचे ठरते. अध्ययनातील कच्चे दुवे, अध्ययनाच्या समस्या, प्रगती न होण्याच्या कारणांचा शोध घेण्यासाठी चाचणी घ्यावी लागते. त्याद्वारे योग्य निदान करण्याचे ठरवावे लागते यालाच नैदानिक चाचणी म्हणतात.

नैदानिक चाचणी/कसोटयांचे दोन प्रकार आहेत.

१) निरीक्षण पध्दती २) परीक्षा पध्दती

**१) निरीक्षण पध्दती :**

या पध्दतीत शिक्षक विद्यार्थ्यांच्या चुकांचे, उणीवांचे निरीक्षण करतो. लहान वयोगटातील विद्यार्थ्यांसाठी ही पध्दती फारच उपयुक्त आहे. पध्दतीत व्यक्तिनिष्ठता येण्याचा संभव असतो. विश्वसनियता सुध्दा कमी आहे.

**२) परीक्षा पध्दती :**

चाचणीच्या आयोजनाद्वारे या पध्दतीने निदान करतात. या पध्दतीतून समस्या शोधून त्यावर निदान करतात. त्यासाठी निदानात्मक कसोटया तयार करावी लागतात.

**♦ नैदानिक कसोटी तयार करण्याच्या पायऱ्या :**

१) उद्दिष्टे ठरवणे, आशय घटक भाग ठरवणे.

२) आशय, उपघटक, भागाचे क्रमबद्ध पृथक्करण करणे.

३) अध्ययन मुद्दयांची क्रमागत मांडणी करणे.

४) कसोटींचा अंतिम आराखडा तयार करणे.

५) कसोटीची उत्तरसूची तयार करणे.

६) उपचारात्मक अध्यापनाबाबत नियोजन करणे.


७) वेळोवेळी निरीक्षणसुध्दा करणे.

अशाप्रकारे नैदानिक चाचणी तयार करुन, चाचणी विद्यार्थ्यांद्वारे सोडवून घेऊन त्यामधून त्यांच्या समस्या, उणीवा, चुका शोधून त्यावर उपचारात्मक अध्यापन करावे लागते. मागे असणाऱ्या विद्यार्थ्यांना अपेक्षित अध्ययन स्तरावर आणावे लागते.

**♦ इतिहास विषयात विद्यार्थी प्रामुख्याने खालील प्रमाणे चुका करतात.**

१) इतिहासात सनावळी, कालखंडाला विशेष महत्त्व आहे. विद्यार्थ्यांना नेमकी सन व घटना या लक्षात राहत नाही. कोणती घटना कोणत्या कालखंडात घडली याबाबत विद्यार्थी चुका करतात. इ.स.पूर्व, इ.स. नंतर यामध्ये गोंधळ होतो. घटनांचा क्रम लक्षात राहत नाही. इतिहासातील सनावळया म्हणजे विद्यार्थ्यांना जड ओझे वाटते.

२) इतिहास विषय विद्यार्थ्यांना मूळातच रुक्ष वाटतो. त्यामुळे त्या विषयात आवडीने अध्ययन करण्याची मूळात अडचण निर्माण होते.

३) इतिहासातील घडलेल्या घटनांचा चिकित्सक अर्थ, त्याचे बहुअंगी विश्लेषण करतांना विद्यार्थी चुका करतात.

४) इतिहास विषयाची व्याप्ती खूप मोठी असल्या कारणाने घडलेल्या घटनांची यादी लांबलचक असते. एवढया बाबी विद्यार्थ्यांना लक्षात ठेवणे कठिण असते.

५) सर्वंकष माहिती विद्यार्थ्यांना मिळत नाही. अशा बाबतीत विद्यार्थी इतिहास विषयात चुका करतात.

**♦ उपचारात्मक अध्यापन :**

विद्यार्थ्यांच्या अध्ययनातील समस्या, कच्चे दुवे, दोष शोधून काढल्यानंतर विद्यार्थ्यांना पुन्हा अध्यापन करतात. यालाच उपचारात्मक अध्यापन म्हणतात. यामध्ये अध्यापन पध्दतीत बदल, अध्ययन अनुभवांची विपूलता इत्यादी बाबीमध्ये बदल घडवून आणून विद्यार्थ्यांच्या

अध्ययनातील समस्या, उणीवा, दोष दूर केले जाते. विद्यार्थ्यांच्या उपचारासाठी हे विशेष स्वरुपाचे अध्यापन असते.

### ♦ उपचारात्मक अध्यापनाची कार्ये :

१) अध्ययनात मागे असणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी अध्यापन करणे.

२) स्वत:च्या अध्यापनात शिक्षकांनी बदल करणे.

३) विद्यार्थ्यांसाठी विविध अध्ययन-अनुभवांचे आयोजन करणे.

४) मागे असणाऱ्या विद्यार्थ्यांना इतर विद्यार्थ्यांच्या बरोबरीत आणण्यासाठी अध्यापन करणे.

५) शिक्षण प्रक्रियेची उद्दिष्टे साध्यतेसाठी उपराचात्मक अध्यापन करणे.

६) गट करुन किंवा वैयक्तिकपणे विद्यार्थ्यांना अध्यापन करणे.

७) यथायोग्य वेळोवेळी मार्गदर्शन करणे.

### ♦ उपचारात्मक अध्यापनाच्या पायऱ्या :

उपचारात्मक अध्यापनाच्या सहा पायऱ्या पुढीलप्रमाणे.

**पायरी (१) :**

उत्तरपत्रिका, निरीक्षणाद्वारे विद्यार्थ्यांचे चुकांचे, उणीवांचे निदान केले जाते.

**पायरी (२) :**

विद्यार्थ्यांच्या चुकांचे निदान केल्यानंतर सामुहिक आढळणाऱ्या चुका, विशिष्ट चुका असे चुकांचे वर्गीकरण केले जाते. ही दुसरी पायरी होय.

**पायरी (३) :**

या पायरीमध्ये ज्या चुका जास्तीत जास्त विद्यार्थ्यांकडून झालेल्या आहेत. त्या चुकांमागील कारणांचा शोध घेतला जातो. त्या कारणांमध्ये अध्यापनाची पध्दती, अध्ययन अनुभवाची कमतरता इत्यादी बाबी सोबत विद्यार्थ्यांचे कौटुंबिक सामाजिक बाबींचा ही समावेश असू शकतो. याबरोबर काही मोजके विद्यार्थी वेगळ्या चुका करु शकतात. त्यांच्या कारणांचाही शोध घेतला जातो.

**पायरी (४) :**

उणीवा, चुकांच्या कारणांची निश्चिती केल्यानंतर सामुहिक चुका असणाऱ्यांचा गट करुन त्यांना गटनिहाय अध्यापन करावे लागते. त्याचे नियोजन केले जाते. त्यांना उपचारात्मक अध्यापन करतांना शिक्षकाला आपल्या अध्यापन पध्दतीत सुधारणा करणे, विद्यार्थ्यांकडून ज्यादा सराव करुन घेणे, विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या अध्ययन अनुभवात बदल करुन विपुलता आणणे इत्यादी बाबींचा समावेश करण्यात येतो. ज्या चुकांची विद्यार्थी संख्या कमी असेल त्यांना वैयक्तिकपणे अध्यापन केले जाते. त्यासाठी पुन्हा अध्यापन सुध्दा केले जाते. उपचारात्मक अध्यापन चुकांच्या कारणांनुसार ठरविण्यात येते.

**पायरी (५) :**

या पायरीमध्ये उपचारात्मक अध्यापनाचा कालबध्द कार्यक्रम आखण्यात येतो. विद्यार्थ्यांच्या अध्ययनाबाबतच्या दोषानुसार त्या दोषांची कारणे, उपाययोजना, इत्यादी बाबत कालबध्द कार्यक्रम आखून त्याची परिणामकारकता पहावी लागते.

**पायरी (६) :**

ही शेवटची पायरी असून या पायरीमध्ये प्रत्यक्ष कार्यवाही करुन विद्यार्थ्यांचे दोष दूर झाले काय, मागे असलेले विद्यार्थी इतर विद्यार्थ्यांच्या बरोबरीत आले काय, अध्ययनाबाबतच्या समस्या, कच्चे दुवे दूर झाले काय या सर्व बाबींची तपासणी करणे अगत्याचे ठरते.

उपचारात्मक अध्यापन शिक्षणाची उद्दिष्टे प्राप्तीसाठी व विद्यार्थ्यांना अपेक्षित अध्ययन स्तर गाठण्यासाठी उपयुक्त ठरते.



*****

# संदर्भ ग्रंथसूची

## मराठी


१) डॉ. अलोनी अर्चना (२००६) शैक्षणिक तंत्रविज्ञान व व्यवस्थापन

२) अहेर हिरा (१९९५) उदयोनमुख भारतीय समाजातील शिक्षण व शिक्षक

३) डॉ. करंदीकर सुरेश, डॉ. मंगरुळकर मीना (२००४) इतिहास आशय अध्यापन पध्दती

४) कुंडले म.बा. (१९६२) अध्यापन शास्त्र आणि पध्दती

५) चितळे शं.दा., मांडके वि. (१९७१) इतिहास कसा शिकवावा

६) डोंगरे दे.दी., पाटील (१९९१) इतिहास-नागरिकशास्त्र

७) डॉ. दुनाखे अरविंद (२०००) इतिहासाचे अध्यापन

८) देशपांडे वसंत, करंदीकर सुमन (१९८३) सुक्ष्मअध्यापन एक प्रभावी शिक्षण पध्दती.

९) प्रा. देशपांडे स्वाती (२००७) इतिहास अध्यापन पध्दती

१०) दांडेकर वा.ना. (१९७४) शैक्षणिक मूल्यमापन

११) पारसनीस न.रा. (१९९५) शिक्षकांचे प्रशिक्षण

१२) पारसनीस न.रा., प्रा.धारुरकर म.ज. (१९७१) इतिहासाचे अध्यापन

१३) बेदरकर कृ.ह. (१९७६) इतिहासाच्या अध्यापनाच्या दिशा

१४) भटनागर, सक्सेना (२००४) इतिहास शिक्षण

१५) सप्रे निलीमा, पाटील प्रीती (२००२) अध्यापनाची प्रतिमाने

१६) तिवारी सी.म. (१९९१) इतिहास अध्यापन पध्दती

१७) त्यागी गुरुसरनदास (२००४) इतिहास शिक्षण

१८) महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे इयत्ता सहावी ते दहावी पाठयपुस्तक

१९) राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखडा २००५

२०) राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखडा २०१०

२१) आंतरजाल वरील माहिती स्त्रोत

## इंग्रजी

1) R.P. Singh (2006) Teaching of History

2) N.R. Saxena (2006) Teaching of Social Science
B.K. Mishra
R.K. Mohanls

3) V.D. Ghate (2006) The Teaching of History

4) S.K. Kochhar (2006) The Teaching of History

5) B.C.Rai Teaching of History

6) NCERT, New Delhi Teaching History in Secondary School

7) Wikipedia & Internet Source

# परिशिष्टे

## १) लेणे



वेरुळ चे कैलास लेणे



बराबार चे लेणे

## २) नाणी



समुद्रगुप्त कालीन



कनिष्क कालीन

# ३) नकाशा




मौर्यकालीन भारत

# ४) वृत्तपत्र


बहिष्कृत
भारत

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे वृत्तपत्र

# ५) मुद्रा







हडप्पा कालीन

मौर्यकालीन

## ६) शिल्प



अजातशत्रू – शिल्प

## ७) QR Code

